कादंबरीमय पेशवाई

# पेशवाईचें दिव्य तेज



१६



लेखक. विठ्ठल वामन हडप



त्या स्वारानें आपला भाला आवेशानें धनाजीच्या पाठींत फेंकला, त्या-सरसा धनाजी प्राणांतिक वेदनांनीं किंचाळत खालीं कोसळला. (पृ. ६७)



कादंबरीमय पेशवाई

१६

# पेशवाईचें दिव्य तेज





लेखक

विठ्ठल वामन हडप





★

१९४०

परचुरे, पुराणिक आणि मं.
मुंबई नं. ४





किंमत दीड रुपये

किंमत

## "कादंबरीमय पेशवाई" मधील आजवरच्या कादंबऱ्या

पेशवाईचें पुण्याहवाचन
पेशवाईची प्राणप्रतिष्ठा
पेशवाईचें ध्रुवदर्शन
पेशवाईचा ध्रुव ढळला ?
पेशवाईचा पुनर्जन्म
पेशवाईचें पुनर्वैभव
पेशवाईचा दरारा
पेशवाईतील दुर्जन
पेशवाईतील पश्चिमदिग्विजय
पेशवाईतील धर्मसंग्राम
पेशवाईतील उत्तरदिग्विजय
पेशवाईवरील गण्डान्तर
पेशवाईचे मन्वंतर
पेशवाईचा पुनर्विकास
पेशवाईचा मध्यान्ह
पेशवाईचें दिव्य तेज



---

प्रकाशक-**बळवंत विष्णु परचुरे**, परचुरे पुराणिक आणि मडळी, बुकसेलर्स व पब्लिशर्स, माधवबाग, मुबई न. ४
मुद्रक-**विठ्ठल वामन हडप**, आदर्श मुद्रणालय, सातारा सिटी.

# भूमिका

**'पेशवाईचें दिव्य तेज'** ही 'कादबरीमय पेशवाई' मालेंतील सोळावी कादबरी होय. आग्रे व पेशवे याच्यातील कलह व त्याचे परिणाम हा या कादबरीचा प्रतिपाद्य विषय आहे पेशवाईच्या इतिहासात एकदर पेशवाई राजकारणाला उणेपणा अणणारे आणि मराठी स्वराज्याचा अभिमान असणाऱ्या मराठ्यालाच काय पण कोणाही स्वाभिमानी हिंदपुत्राला हळहळ लावणारे जे काहीं अगदीं थोडे प्रसग आहेत, त्यापैकीं आग्रे आणि पेशवे याचा कलह हा प्रमुख प्रसग होय हा कलह पेशव्याच्या उदयापासूनच सामान्यत सुरू झाला, व आग्र्याचा समूळ नाश पेशवाई कारभारात पेशव्याच्या पुढाकारानें होईपावेतों टिकला. जेव्हा जाळावयाला काहीं शिल्लकच उरलें नाहीं, तेव्हा तो कलहाग्नि विझला

मराठशाहीची पश्चिम बाजू जो समुद्रकिनारा, तिकडील रक्षणाचें काम आग्र्यानी उचलले होते कान्होजी आग्र्यानतर त्याचे मुलगे सेखोजी व सभाजी यानीं बापाचें काम पुढें चागलें चालविलें. पण त्याच्या मृत्यूनतर मानाजी व तुळाजी आग्रे या भावात कलागती लागून पेशव्यानें मानाजीची बाजू घेऊन आग्र्याचा उत्तर कोंकणातील बराच मुलूख हस्तगत केला. वसईच्या मोहिमेनतर पेशव्यानीं उत्तर कोंकणात आपला नवीन सुभा करून थोडें आरमारही ठेवलें. कामाच्या सोईच्या दृष्टीने पाहता कोकणचा सर्व किनारा ही राज्याची एक सरहद्द असल्याने हा सर्व टापू एकाच माणसाच्या अधिकारात असणे इष्ट होते पोर्तुगीज, इग्रज, सीद्दी वगैरे आरमारी सत्ताना तोंड देऊन मराठशाहीचें एका बाजूनें रक्षण करण्यास आग्र्याइतका अनुभवी व पराक्रमी सरदार दुसरा नव्हता.

असे असताही पेशवे घराण्याचें मूळापासूनच आग्रे घराण्याशीं सख्य नव्हतें. पेशव्यानीं आग्र्याना आपल्या ताटाखालील माजर बनवू पाहावें ही त्या कलहाची एक अतिरेकी बाजू, तर पेशव्याची

हुकमत मुळींच न मानण्याकडे आग्र्याचा कल असे ही दुसरी अतिरेकी बाजू होय. तथापि राजवटीच्या हिताहिताच्या व एकदर राजकारणाच्या दृष्टीनें सर्वच पेशव्यानीं आग्र्याचा नाश करण्याचा विडा उचलला ही फार मोठी चूक केली नानासाहेब पेशवा इतका चतुर व राजकार्यधुरधर, त्याच्या हातून तर ही अक्षम्य चूक झाली, असें 'रिसायतकार' सरदेसायासारखे मानवत इतिहासकारही म्हणतात.

थोरल्या बाजीराव पेशव्याच्या कारकीर्दीत आग्रे आणि पेशवे याच्यातील कलहाग्नि प्रथम खरा भडकला. त्यावेळीं आग्र्याच्या दौलतींत कान्होजी आग्र्याच्या मुलात भाऊबदकी माजली असताना पेशव्यानीं मुद्दाम असत्पक्षाचा पुरस्कार केला त्यानीं आग्र्याच्या औरसपुत्राविरुद्ध दासीपुत्राला हातार्शी धरलें, हाच केवळ असत्पक्षाचा पुरस्कार असाच केवळ त्याचा अर्थ नव्हे. पण औरस पुत्र सभाजी आग्रे हाच खरा बलवान व मराठी राजवटीच्या पश्चिम सरहद्दीच्या सुरक्षितपणाच्या दृष्टीनें अधिक उपयुक्त असताना तें बावनकशी सोनें लाथाडून पेशव्यानीं डाकलग सोनें मराठशाहीच्या पदरीं बाधलें! आणि सभाजी आग्र्याचा नि पात केला तोही इग्रजासारख्या परक्या आक्रमकाची मदत घेऊन! याच रोमहर्षण प्रसगावर विराचिलेली **'पेशवाईतील पश्चिम दिग्विजय'** ही कादबरी या मालेंतून पूर्वी प्रसिद्ध झाली आहे

प्रस्तुतच्या सोळाव्या कादबरींत पेशव्याचा विरोधनायक तुळाजी आग्रे सरखेल हा आहे त्याच्याच कारभाराच्या गाड्यात खीळ ठोकण्यासाठीं मानाजी आग्रे वजारतमाब, व आग्र्याचे इतर सरदार याचा उपयोग पेशव्यानीं केला. पेशव्याचा कोंकणातील सुभेदार रामाजी महादेव बिवलकर हा ह्या कथानकातील ऐतिहासिक खलनायक होय. 'रियासतकार' सरदेसाई याच्या शद्बात या पाताळयत्री पुरुषाचें वर्णन करावयाचें तर ". रामाजी महादेव बिवलकर हा महादीर्घसूत्री मनुष्य पेशव्याचा कोंकणातील सुभेदार असून नानासाहेबाच्या अत्यत विश्वासातला होता. तीस चाळीस वर्षेंपर्यत कोंकणच्या कारभाराचीं एकून

एक छिद्रे व सूत्रें त्यास अवगत झालीं होतीं. साष्टी, वसई, ठाणें व कुलाबा हे प्रात रामाजीच्या हद्दींतले असून त्याचें वास्तव्य कल्याणास होतें. ठाणे एथील कौपिनेश्वराचें देवालय रामाजीनें बाधले. तुळाजीच्या विरुद्ध इंग्रजाचें कारस्थान घडवून आणणारा रामाजी महादेवच होय. बहुधा याचें व तुळाजीचें प्रत्यक्ष वाकडें असावें. कारण तुळाजीविरुद्ध चाललेला एकदर व्यूह या रामाजीने रचिलेला आहे. रामाजीचे ठिकाणीं जास्त उदार बुद्धीचा व दूर दृष्टीचा मनुष्य कोंकणचे कारभारावर असता तर कदाचित् या आंग्र्याचे प्रकरणाचा निकाल अन्य तऱ्हेनें लागला असता. मराठ्याचे कारभारात आपला हात शिरकविण्यास मुबईकर इंग्रज अत्यत उत्सुक होते; आणि या रामाजीपतास त्यानीं वश करून आंग्र्याचें आरमार नाहींसें करण्याचा आपला फार दिवसाचा उद्देश अल्पावधींत सिद्धीस नेला.' *

त्याप्रमाणेच तुळाजी आंग्रे व पेशवे याचें परस्पर वर्तन, स्वभावविशेष व त्याच्या वर्तनाचे दूरगामी परिणाम या सर्व दृष्टींनी विचार करावयाला नुसता पुढीलही उतारा पुरेसा आहे.

'तुळाजी आंग्र्याचें नाव मराठ्याच्या इतिहासात चिरस्मरणीय झालें आहे. त्याच्यासारखे धाडसी व करारी पुरुष विरळा निपजतात. त्यानें आपल्या हयातींत इंग्रजाना शारखें थरकापात ठेविले. त्याचा काटा काढून टाकणें एकट्या इंग्रजास शक्य नव्हतें. तुळाजीसारखा पराक्रमी मोहरा नानासाहेबासारख्या मनुष्यस्वभाव जाणणाऱ्या पुरुषानें फुकट घालविला आणि राष्ट्रकार्यात त्याचा उपयोग करून घेतला नाहीं. ही गोष्ट पेशव्याच्या कीर्तीस कालिमा लावते. एकवार तरी स्वतः भेट घेऊन त्याचें हृद्गत समजून घेणें हें मराठशाहीचा सर्वाधिकार चालविणाऱ्या पेशव्याचें कर्तव्य होतें. तुळाजी उद्दाम असेल, पेशव्याचा अधिकार मानीत नसेल, चित्पावन ब्राह्मणाचा त्यानें अतोनात छळही केला असेल, वगैरे सर्व गोष्टी खऱ्या मानूनही पेशव्याच्या वर्तनाचें समर्थन करता येणार नाहीं. प्रतिनिधि, दमाजी गायकवाड,

*मराठी रियासत, मध्यविभाग २—सरदेसाई.

रघूजी भोसले, वगैरे व्यक्तींशी ज्या तऱ्हेने वागून पेशव्यानें त्याचा समूळ नाश न करता त्यास राष्ट्रकार्यात गोवून घेतले, तशी गोष्ट तुळाजीच्या बाबतींत झाली नसती असें वाटत नाहीं पाश्चात्याना आरमारी युद्धात तोंड देऊन झगडणारा प्रथम कान्होजी व पुढें तुळाजी हे दोनच पुरुष हिंदुस्थानात निर्माण झाले अशा तुळाजीचा नाश इंग्रजाच्या काव्यास बळी पडून नानासाहेबाने केला हें त्याच्या मुत्सद्दे-गिरीस अत्यत कमीपणा आणतें. शिवाजीने प्रथमपासूनच दूरदृष्टीनें आरमार स्थापून जोरात आणून ठेवलें, ते या कृत्यानें पेशव्यानीं बुडविलें व मराठशाहीची एक बाजू कायमची लगडी करून घेतली. असें नवीन आरमार तयार करणे त्यास शक्य नव्हतें मराठ्याचें स्वातत्र्य जाण्यास हीच गोष्ट मुख्यत्वेंकरून कारणीभूत झाली यात सशय नाहीं.*

पूर्वोलिखित ऐतिहासिक घडामोडी, हाच प्रस्तुतच्या सोळाव्या कादबरींतील कथानकाचा गाभा होय ह्या कादबरींतील तुळाजी आंग्रे, लक्ष्मीबाई व जिजाबाई आंग्रे, रामाजी महादेव बिवलकर याखेरीज जावजी गवळी, खड्डूजी माणकर, दुर्लभजी माने, कर्णाजी शिंदे, रुद्राजी धुळप, आनदराव धुळप, सुभानजी सोडकर, वगैरे बहुतेक कमी अधिक महत्त्वाचीं पात्रे ऐतिहासिक आहेत. त्याचे उल्लेख **पेशवे दप्तररांतून निवडलेले कागद भाग २४** यातील अनेक पत्रात आलेले आहेत. जिज्ञासूनीं त्याचा पाडताळा पाहावा.

या मालेंतील यापुढील कादबरी **'पेशवाईवर सावट'** ही यथाक्रम प्रसिद्ध होईल. इ. स. १७६१ मधील पानिपतच्या सग्रामाच्या पार्श्वभूमीवर अर्थात् सग्रामपूर्व कथानकावर ह्या रोमहर्षण कथानकाची उभारणी झाली असून सत्ताधारी अथवा सत्ताभिलाषी अशा बळी लोकाच्या ताडवनृत्यात चिरडल्या जाणाऱ्या तत्कालीन गरीब जनतेच्या दुःखाना वाचा फुटलेली त्या कादबरींत दिसेल.

आदर्श वाङ्मय प्रकाशन,
सातारा

**विठ्ठल वामन हडप**

---

* नानासाहेब पेशवे याचे चरित्र : सरदेसाई.

# पेशवाईचें दिव्य तेज

## प्रकरण पहिलें

## भाऊबंदकीची आग

इसवी सन १७५५ मधला कोंकणातील हिंवाळा जरी प्रतिवर्षी येणाऱ्या हिंवाळ्याहून भिन्न नव्हता, तरी त्या हिंवाळ्याला मागच्या वर्षीची कोंकणपट्टी काहीं त्या वर्षी दिसली नाहीं. मागच्या वर्षी कोंकणपट्टींत तुळाजी आग्रे सखवेल यांचा दरारा आग्र्यांच्या उभ्या दौलतींत गाजत होता. त्या दौलतीचे सस्थापक रणशूर दर्यासारग कान्होजी आग्रे याच्या निधनानतर जरी त्याच्या मुलांच्या आपसांतील भाऊबदकीमुळें त्या दौलतीचीं धड एकीकडे आणि शीर एकीकडे अशीं दोन शकलें झालीं होतीं, तरी त्या दोन शकलाना पुन्हा पालवी फुटून थोड्याच दिवसात त्यानाच पाळें मुळें उगवू लागलीं, व आजला त्या पाळामुळानीं बराच जोमाचा जीव धरला होता. श्रीमत बाजीराव पेशव्याच्या कारकीर्दींत कान्होजीच्या पश्चात् त्याच्या दौलतीला औरस पुत्र संभाजी आग्रे आणि दासीपुत्रांपैकीं वडील पुत्र मानाजी आग्रे याच्यात दौलतीचा तटा विकोपाला गेला, व पेशव्यानीं मध्यें पडून त्या दोघा भावाना वडिलार्जित दौलतीची वाटणी करून दिली. त्यात उत्तरेकडे कुलाब्यापासून दक्षिणेकडे बाणकोट पावेतों पश्चिमेकडून आरबी समुद्रापासून पूर्वेकडे सुमारें पन्नास साठ मैल रुदीचा प्रदेश मानाजी आग्र्याच्या वाट्याला गेला, आणि बाणकोटापासून दक्षिणेकडील आग्र्यांची दौलत—पश्चिमेकडून पूर्वेकडे सुमारें तितक्याच रुंदीचा प्रदेश संभाजी आंग्र्याला मिळाला. याप्रमाणें दौलत जिवंत राहिली; पण भाऊबंदकीही त्याबरोबरच जिवंत राहिली, व एका देहाचे दोन हात एकमेकांवर वार करण्यासाठीं

नेहमी स्फुरू लागले. आणि तें वैमनस्य सतत धुमसत राहण्यालाही तेव्हाची परिस्थिति अनुकूल होती. सभाजी आंग्रे आणि मानाजी आंग्रे या दोघात सभाजी जास्त पाणीदार, तापट, करारी व पराक्रमी असल्यानें कान्होजीनें पेशवाईच्या प्रारभापासून उपऱ्या पेशव्याशीं बाकानें वागण्याचें जें धोरण ठेविलें होतें, तेंच पुढें चालू ठेविलें. तें पेशव्याना कसे सहन होणार? तशात छत्रपति शाहू महाराजाचा पेशव्यावर पूर्ण विश्वास व मराठशाहीची सारी सूत्रें त्याच्या हाती. अशा स्थितीत पेशवे आंग्र्याचा शिरजोरपणा का म्हणून चालू देतील? त्यातूनही आंग्र्याच्या दौलतीत भाऊबंदकी! मानाजी आंग्रे हा देखील शूर व पराक्रमी नव्हता असें नाही, पण तो कान्होजी आंग्र्याचा दासीपुत्र असल्याने पिचलेल्या बागडीची सौभाग्यालकारात जशी काही किंमत नाहीं, तसें आंग्र्याच्या दौलतीत कान्होजीचा औरस पुत्र सभाजी आंग्रे हा कर्तबगार असताना त्याच्यापुढें मानाजीचें तेज पडेना. पण दौलतीचा मोह कोणाला सुटला आहे? मानाजीला जेव्हा आपलें सभाजीशी काही चालत नाही असें दिसून आलें, तेव्हा त्यानें पेशव्याशीं सगनमत केलें, आणि आंग्र्याचा नक्षा उतरण्याच्या कामी पेशवेही मानाजीचा वरच्याप्रमाणें उपयोग करून घ्यावयाला चुकले नाहीत.

आणि पेशव्यानीं आपल्या दौलतीत मुद्दाम बखेडा उत्पन्न करून तिची शकलें केली, या समजुतीनें पेशव्याशी प्रच्छन्नपणें शत्रुत्व करण्याला सभाजीही चुकला नाही.

पुढें सभाजी आंग्रे कालवश झाल्यावर तुळाजी आंग्रे—मानाजी आंग्र्याच्या धाकटा भाऊ संभाजी आंग्र्याच्या मागें सरखेलीचा कार भार मालकी हक्कानें पाहू लागला त्याबरोबर मानाजी आंग्र्याची भाऊबंदकी सभाजीशीं सुरू होती, तिचें पुनश्च हरिः ॐ झालें. तशात तुळाजी आंग्रे हा स्वभावतःच सभाजीसारखा शूर, पराक्रमी व वृत्तीनें त्या याहून कडवा—इतका कडवा होता कीं कधी कधीं त्याचा क्रूरतेतही अतिरेक होई. पेशव्यानीं आपल्या दौलतीचा नाश केला

असें पूर्वीच्या उदाहरणावरून त्याच्या मनानें पक्कें घेतलें असल्यानें तो पेशव्याना पाण्यात पाहावयाचा, आणि ‘ इद्राय तक्षकाय स्वाहा ’ या न्यायानें मानाजी पेशव्याचा पक्षपाती म्हणून त्यालाही पाण्यात पाहावयाचा म्हणूनच मनाजीनें आपल्या दौलतीची आबादी-आबाद राखण्यासाठी पेशव्याच्या तोंडाकडे पाहावें, आणि पेशव्यानीं त्याला पाठीशी घालून तुळाजीकडे सदा रागानें डोळे वटारून पाहावें.

श्रीमत बाळाजी बाजीराव ऊर्फ थोरले नानासाहब पेशवे याच्या कारकीर्दींत—त्यातही विशेपतः छत्रपति शाहूमहाराजानी मराठशाहीचे सर्वाधिकार नानासाहेबाना अर्पण करून देह ठेवल्यावर हा बेबनाव वाढता वाढता इतका वाढला की, आता तुळाजीला नामशेष केल्या-खेरीज गत्यतर नाही असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें.

रामाजी महादेव बिवलकर या नावाचा महाधूर्त, कारस्थानी व कलिपुरुषाच्या वृत्तीचा गृहस्थ नानासाहेब पेशव्याचा आत्मलिगवत् आवडता होता. त्याला कोंकणची सुभेदारी मिळल्यापासून तर पेशवे व तुळाजी आग्रे याच्यातील बेबनावाची आग जास्तच भडकू लागली. हा सुभेदार समजस वृत्तीचा असता तर—पण तसले तर्क करण्यापासून फायदा तरी काय? रामजीपत काही तसा समजस माणूस नव्हता. तो कारस्थानी होता, पण स्वार्थी व तितकाच अप्रामाणिकही होता. शिवाजीमहाराजानी आरभिलेलें हिंदवी स्वराज्याचें रोप जें थोरल्या नानासाहेब पेशव्याच्या वैभवशाली कारकार्दीत हिंदुपदपाद-शाही या थोर नावाला साजेसें जोपासून वाढलें होतें, त्या वृक्षाचीं पाळेंमुळें खोल रुजून आसेतुहिमाचल त्याचा विस्तार वाढावा, आणि त्याच्या प्रशात सावलीखाली हिंदुस्थानचें जीवन सर्वतोपरी सुखाचें व्हावें, हें ध्येय जर रामजीपतानें तेव्हां आपल्या डोळ्यासमोर ठेवून कोंकणांत कारभार केला असता, तर खानदानी कर्तबगाराची मोठीच गरज आहे या दृष्टीनें त्यानें लोकसग्रह दृष्टीनें त्याच्याशीं जुळतें घेतलें असतें. परतु त्याला पेशव्यांच्या हितरक्षणाबरोबर—किंबहुना त्याच्याही पूर्वी स्वार्थ साधावयाचा होता. त्या अनुरोधानें त्यानें कारस्थानें

करण्याला प्रारभ केला. त्याला तुळाजीचा विरोध होऊ लागल्यामुळें मूळच्या आग्रे आणि पेशवे याच्या बेबनावाच्या अग्नींत आग्रे आणि बिवलकर याच्यातील बेबनावाचें तेल ओतलें जाऊन ती आग जास्तच भडकू लागली.

व्रण दिसला कीं तिथें कावळा येऊन चोंच मारणारच. आग्रे हेच काय ते कोंकणपट्टीच्या आरबी समुद्रात आपल्या आरमाराच्या जोरावर एखाद्या सार्वभौमासारखी सत्ता गाजविणारे दर्यासारग असल्यामुळें दर्यावर्दीपणाच्या जोरावर आपलें व्यापारी वैभव हिंदुस्थानात वाढविण्यासाठी झटणाऱ्या इग्रजाना आग्र्याची त्यातल्या त्यात तुळाजी आग्र्याची मोठीच अडचण भासू लागली. तुळाजी त्याना कोंकणपट्टीच्या समुद्राकिनाऱ्यावर सुखानें फिरकू देखील देईनासा झाला. त्याच्या व्यापारी जहाजाची लूटमार करू लागला व सापडतील त्या इंग्रज लोकांचा छळ करू लागला. त्याना कैदेंत डाम्बू लागला. हा सारा छळ इतके दिवस इग्रजांनीं सहन केला. आंग्रे हा महाराष्ट्रशाहींतील एक बलिष्ठ मानकरी—सांबाच्या पिंडीवरचा विंचू असेल. पण रामजीपतासारखा त्या सांबापुढचा नदी साबाला शिंगें मारून त्याला कोपायमान करायला लागल्यावर विचवाचा कितीसा टिकाव लागणार! प्रथम काहीं दिवस पेशव्यानीं कर्नाटकातील वगैरे इतर व्यापामुळें तुळाजीच्या अरेरावी वर्तनाकडे आणि त्याविषयींच्या रामजीपताच्या तक्रारींकडे काना डोळा केला. पण कोणत्याही कारणामुळें का असेना ! रामजीपताच्या कृष्णकारस्थानानीं चिडल्यामुळें असो, की काही असो, पेशवे हे चित्पावन आणि रामजीपत हाही चित्पावन म्हणून तुळाजी चित्पावनावर दात धरू लागला.—पिंडीवरचा विंचू पिंडीवरच नागी मारू लागला. पेशव्याची जन्मभूमि कोकणात होती ती देखील त्याच्या स्वाधीन करावयाला तो तयार होईना. तेव्हा पेशवे चिडले. ठरल्याप्रमाणें हुजुरच्या नेमणुकीचा ऐवज देखील तुळाजी देईना, तेव्हा त्याला शरणचिठी लिहून द्यावी तरी, अथवा त्याचें पारिपत्य करून त्याला होता कीं नव्हतासें करून टाकावें तरी, यापेक्षा

अन्य मार्गच नाहींसा झाला झाला. तरी देखील त्यांनीं तिकडे लक्ष दिलें नसतें. तुळाजीची अरेरावी मोडण्यापेक्षा जास्त महत्वाचीं अशी इतर अनेक कामें पेशव्याच्या मागें होती हें एक आणि दुसरें, आंग्र्याच्या आरमारी सामर्थ्याशीं टक्कर देण्याइतके आरमारी बळ पेशव्यांच्या पाठीशीं कुठें होतें?

पण तोही प्रश्न रामाजीपताच्या कारस्थानी डोक्यानें सोडविला. त्यानें परस्पर मुंबईकर इंग्रजांशीं आंग्र्यांचा नाश करण्याबाबतच्या वाटाघाटी पूर्ण करून त्याचें पूर्ण साह्य घेण्याचें ठरविलें, आणि सारें कारस्थान पूर्णपणें शिजून तयार झाल्यावर नुसतें उदक सोडावयाचें काम तेवढें पेशव्यासासाठीं बाकी राहिलें. तें त्यानीं, परस्पर पाहुण्याच्याच हातून साप मरतो आहे तर मरेना का?—असा विचार करून तेव्हाच उरकलें. आरमारावर आरमार—आंग्र्यांवर इंग्रज—हाड्यावर्णाला गजकर्ण ही योजना पेशव्यांना सोळा आणे मानवली. त्यानीं त्या बाबतींत इंग्रजांशीं योग्य ते करारमदार करून तुळाजी आंग्र्याचा निःपात करण्याच्या कामीं रामाजीपताला मुखत्यारी दिली. आणि तिकडून इंग्रजांनींही रामाजीपताला लाच चारून मिंधा करून टाकलें.

उगवत्या सूर्याला नमस्कार करण्याची जी साऱ्या जगाची रीत, तिला कोंकणांतले जावजी गवळी, खड्डजी माणकर वगैरे सरदारही अपवाद ठरले नाहींत. ते आंग्र्यांचे अंकित खरे, पण आंग्रे मराठशाहीचे, आणि पेशवे मराठशाहीचे सर्वाधिकारी म्हणून पेशव्यांचेही अंकित. अर्थात् आंग्र्यांचें आणि पेशव्यांचें पटेनासें झाल्यावर त्या सरदारांनीं पेशव्यांच्याच—म्हणजे रामाजीपत बिवलकराच्या निशाणाखालीं उभें राहून लढण्याचें ठरविलें. अशी इकडे समोरासमोरच्या संग्रामाची तयारी झाली, आणि शिवाय आतून तुळाजीच्या गडकोटांना फितुरीचे सुरुंग लावण्याचें पाताळयंत्री काम रामाजीपतानें इतक्या बेमालूमपणें पार पाडलें कीं त्याचा या कानाचा त्या कानाला पत्ता लागला नाहीं.

ह्या ह्या म्हणता प्रथम तुळाजीच्या दौलतीतील आजूबाजूचे गडकोट रामाजीपताच्या चिथावणीवरून खडूजी माणकर व जावजी गवळी वगैरे सरदारानी काबीज केले, व असा चोहीकडून तुळाजीचा कोंड-मारा केल्यावर इंग्रजांचा सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग, मालवणचा सिंधुदुर्ग, व प्रतिनिधीचा रत्नागिरी किल्ला तुळाजीनें बळकावला होता तो, एवढे महत्त्वाचे गड तेवढे जिकावयाचे राहिले. ह्या मुख्य गडाच्या आजूबाजूला यशवतगड, देवगड वगैरे काही लहानसहान गडकोट व खारेपाटणासारख्यी ठाणी जिंकावयाची राहिली होती पण वृक्षच मुळापासून तोडले की त्याच्या फांद्या आपोआप खाली येतात, हें रामाजीपत पुरें ओळखून होता. म्हणून त्यानें पूर्वोक्त अजिक्य गड जिंकण्याच्या कामी तेवढी इंग्रजाची मदत मागितली.

हे सर्व प्रतिस्पर्धी एकदम गिधाडासारखे तुटून पडल्यावर त्यात तुळाजीसारख्या एकाड्या शिलेदाराचा कसा निभाव लागणार? तरीही तो हिंमतीनें लढला पण त्याला यश आलें नाही इंग्रजानीं पहिल्या सपाट्यात त्याचा दौलतीच्या पचप्राणापैकीं केवळ एक प्राण असा अजिक्य सुवर्णदुर्ग जिकला, व त्याबरोबरच आणखीही पाच सहा गड कोट जिंकले.

त्याच वावटळीत वास्तविक तुळाजी आग्र्याचा सत्यानाश कर-ण्याचा रामाजीपत बिवलकराचा बेत होता परतु तुळाजीनें प्रसग ओळखून पेशव्याशी नमतें घेण्याचें ठरविलें. शिवाय रामाजीपत ताबडतोब एका सपाट्यासरसा तुळाजीच्या दौलतीवर नागर फिर-वावा असा आग्रह इग्रजाचा त्या मोहिमेंतील आरमारी सेनापति कमाडर जेम्स याला पडला. असें असताही पाऊस डोक्यावर आल्यामुळें रत्नागिरीचा किल्ला जिंकून होतांच मुबईचा इग्रज प्रेसिडेंट बुर्शिअर यानें आपलें आरमार परत बोलावलें, म्हणून त्या रणकदनाला तेथें अर्धविराम मिळाला

पण तो अर्धविराम होता, पूर्णविराम नव्हता. त्या दरम्यान तुळाजी आग्रे जसा आपल्या परीनें पेशव्याशी नमतें घेऊन स्वसरक्षणाची

पराकाष्टा करीत होता, तसाच रामाजीपत बिवलकर बाह्यात्कारी तड-जोडीच्या लोणकढ्या थापावर तुळाजीला झुलवीत आतून आधारांत त्याच्या मर्मस्थानी घाव घालण्याची शिकस्तीची तयारी करीत होता. कारण, इंग्रजाना तुळाजी जिवत राहावयाला नको होता, व त्याचा नाश करून इंग्रजाकडून मिळणाऱ्या लाचवर रामाजीपताला गब्बर व्हावयाचें होतें.

आणि—आधार म्हटला कीं तो आधार! त्यात अभिलाष, फद-फितुरी, द्वेष, वैरभाव, कनक, कान्ता, सत्ता, सर्व काही असावयाचेंच. तें नसतें, तर पावसाळयाच्या तोंडाला इंग्रजी आरमार माघारे गल्या-मुळें तुळाजीवरची मोहीम आपोआप थाबली, व तुळाजाचे नाना वासु-देव आणि शिवाजी मोहिते हे दोघे वकील समेटासाठी दाती तृण धरून जावजी गवळी, खड्डूजी माणकर, रामाजीपत बिलवल्कर वगैरे माणकर प्रतिस्पर्ध्यांच्या मागे धावत गेले, तेव्हा सलोखा न होण्याचें काही कारण नव्हतें

पण—पावसाळा गेला, हिवाळा उजाडला, हिवाळा सपत आला, तरी पेशवे व आंग्रे यांच्या समेटाचें घोंगडें तसेंच भिजत पडलें होतें. का?

## प्रकरण दुसरें

# दोन म्हातारे

त्या हिंवाळ्यात एके रात्रीं रामाजीपंत बिवलकराचा बालेकिल्ला म्हणून तेव्हा ओळखल्या जाणाऱ्या ठाण्यात त्यांनींच बांधलेल्या कौपिनेश्वर मंदिराच्या पश्चिमेकडे सुमारें एका हाकेच्या अंतरावर असलेल्या एका झोंपडीचा दरवाजा नेहमींपेक्षा लौकर–पहाट होण्या-पूर्वींच उघडला गेला. लगेच एक म्हातारा आंतून खोकत खोकत काठी टेंकीत टेंकीत बाहेर आला.

बाहेर चांदणें दुधासारखें स्वच्छ पडलें होतें. त्या चांदण्यात उभें राहून त्या म्हाताऱ्यानें आकाशाकडे पाहिलें व मनात म्हटलें, "अरे! अजून चार घटका रात्र बाकी आहे कीं! इतक्या लौकर मी उगीच उठलों. पण आता झोंपून झोंप थोडीच येणार आहे! गुरें वासरें पाहून तरी येतों."

असें म्हणून म्हातारा घरापासून पंचवीस तीस पावलांवर असलेल्या गुराच्या गोठ्याकडे गेला.

गणोजी माने याची रोज झोंपून उठण्याची ही वेळ नव्हे. कर्नाळा किल्याचा पाडाव होऊन मुलगा व जावई कैद झाल्यावर तेथली सारी दौलत रसातळाला गेली, त्यामुळें गणोजी आपल्या लक्ष्मी ह्या एकुलत्या एक मुलीला बरोबर घेऊन जावजी गवळ्याच्या वशिल्यानें ठाण्यांत रामाजीपंताच्या आश्रयाला येऊन राहिला. तेव्हापासून आज चारपांच वर्षें त्याचा कार्यक्रम असा कीं कोंबडा आरवल्याबरोबर त्याला नुसती जाग यावयाची, पण अंथरुणांतून उठावयाचा नाहीं. थोडा वेळ तसाच बिछान्यावर खोकत पडावयाचा. अमळशानें उठून त्यानें खोकून खांकरून छाती अमळ हलकी झाल्यावर पडवींतील पडशावर

जाऊन बसावें, व गुडगुडी पेटवून चार झुरके मारावे. गुडगुडी पिणें झाल्यावर पुन्हा थोडा वेळ खोकून घसा साफ करीत त्यानें एकवार गोठयांतील गुरांचा समाचार घेऊन यावें. तेवढ्यात लक्ष्मीनें धारेचीं भाडीं आणून द्यावीं. गणोजीनें दुभत्या गाईची धार काढून दुधानें भरलेलें भाडें बाजूला ठेवावें. लक्ष्मीनें तेवढ्यात शेणगोठा करून गुरें सोडावीं व दूध घेऊन घरात जावें. मग कधीं गणोजी गुरें रानाच्या वाटेला लावण्यासाठीं काठी घेऊन जाई, तर कधी कधीं त्याची प्रकृति नीट नसल्यास लक्ष्मी जाई

परतु प्रकृति नीट नसल्यानें गोठयात जाऊन गाईची धार काढणें व गुरें पोंचविणें ह्या कामात जरी खड पडला, तरी गणोजी उजाडण्यापूर्वी कौपिनेश्वराचें दर्शन घेण्याला मात्र कधींच चुकत नसे. ज्या दिवशी तो स्वतः गाईची धार काढील त्या दिवशीं त्यानें स्वतः पावशेर दूध घेऊन कौपिनेश्वराला त्याचा नैवेद्य दाखवावा, व ज्या दिवशीं त्याची प्रकृति नीट नसेल त्या दिवशीं लक्ष्मीनें देवळात दूध नेऊन पोंचवावें. पण पावशेर दुधाचा नैवेद्य हा देवाला गेलाच पाहिजे. अर्थात् हा क्रम अलीकडे आठ दिवसापासूनचा होता. आज गणोजी रोजच्यापेक्षा लौकर जागा झाला, तो वाघाच्या धास्तीनें. गावांत गेल्या आठ दिवसापासून वाघ पिसाळला होता. ह्या आठ दिवसात असा एकही दिवस गेला नाहीं कीं वाघानें दिवसा अथवा रात्रीं, रानांत अगर कोणाच्या गोठयात रिघून एखादें तरी जनावर मारलें नाहीं. त्यामुळें सारे लोक हवालदिल झाले होते. तीच गत गणोजीचीही होती. तो एरव्हीं हाडाचा शूर गडी खरा. तरुणपणांत त्यानें विवलकराच्या पदरीं चागलीच शिपाईगिरी गाजविली होती, व वसईच्या वेढ्यात तर त्यानें असा अद्‌भुत पराक्रम केला होता कीं, खुद्द चिमाजीअप्पानीं त्याला एक सोन्याचें कडें व पागोटें देऊन त्याचा गौरव केला होता. ऐन उमेदीच्या आयुष्यात त्यानें रणागणांत शत्रूनाच लोळविलें होतें असें नव्हे, तर जिवत वाघाशीं रानावनांत एकट्यानें झुज खेळून कैक वाघाना ठार मारले होते. पण त्या झाल्या

तरुणपणातील गोष्टी त्याचें आज वयाच्या पचावन्नाव्या वर्षी काय होय? त्यातूनही वयाच्या पन्नासाव्या वर्षी कर्नाळ्यावर पेशव्याच्या वतीनें झालेल्या हल्ल्यात तुळाजी आग्र्याच्या बाजूनें एखाद्या पचवीस वर्षाच्या रणमर्दालाही लाजविण्याइतकी मर्दुमकी गाजविणारा हा गडी आज अवघ्या चार पाच वर्षात काठी टेंकीत चालण्याइतका शरीरदुबळा व्हावयाचा नव्हे पण सदरच्या कर्नाळ्याच्या वेढ्यात मुलगा व जावई हे दोघेही पकडले गेले व त्याच्या मुक्ततेची आशा उरली नाहीं, दौलतही गेगी व नाक मुठीत घेऊन रामाजीपताच्या आश्रयाला ठाण्यात येऊन राहावें लागलें, त्यामुळें बिचाऱ्याची प्रकृति काळजीनें व दुःखानें आजवर इतकी ढासळली होती नुसत्या पुत्रशोकानें इतकी हाय खाणारा कच्च्या दिलाचा तो होता अशातली मात्र गोष्ट नाही. तसें पाहिलें तर त्याच्या नदजी, पिलाजी व दुल्लभजी या तीन मुलापैकी नदजी बेपत्ता झाला तेव्हा दुसऱ्या दोघा जुळ्या मुलाचा जन्मही झाला नव्हता अर्थात् निपुत्रिक होण्याचा प्रसग गणोजीवर देवानें नदजीच्या वेळीच आणला होता. पण तें दुःख तेव्हा त्यानें धीरोदात्तपणाने गिळलें, किंबहुना पुत्रशोक मानलाच नाही. एका परीनें पोरटा तोफेच्या तोंडीं बळी गेला यात त्याला आनदच वाटला. जजिऱ्याच्या सिद्दीच्या हेरगिरीचे नीच कर्म करून नेकजात मराठ्याच्या नावाला काळोखी फासणाऱ्या व कुळाचें तोंड काळें करणाऱ्या असल्या देशद्रोह्याला तुळाजी आग्र्यानें तोफेच्या तोंडीं देऊन ठार मारलें, तें यथायोग्य झालें, असेंच त्यानें त्या वेळीं दुःखवटा देण्यासाठी येणाऱ्या आप्तेष्टाना बोलून दाखवावें. वसईचा वेढा संपल्यावर चिमाजीअप्पानी मर्दुमकीबद्दल कडेंपागे, टें बहाल करताना नदजीबद्दल दुःखाचे उद्गार काढून त्याचें शातवन करण्याचा प्रयत्न केला, तेव्हा "तो कारटा माझा पुत्रच नव्हे. घरबुडवा देशबुडवा देशद्रोही कुलागार तो, त्यानें जन्माला येऊन मायेची कूस व्यर्थ विटाळली. त्याचें श्रीमतानीं नावही घेऊ नये" असे बाणेदारपणाचे उद्गार गणोजींनें काढले होते.

परंतु नंदजीची वृत्ति निराळी, व त्याच्या निधनानंतर जन्माला आलेल्या पिलाजी व दुल्लभजीची वृत्ति निराळी. एकाच खाणींत हिरेही सापडतात व कोळसेही सापडतात, त्याप्रमाणें पिलाजी व दुल्लभजी हे गणोजीच्या पोटीं हिरे निपजले होते पण ते दोन हिरे दोन परींनी एका मागून एक हरपले. कर्नाटकच्या हल्ल्यांत कर्णाजी धुळप बेपत्ता झाला—कोणी म्हणत की तो फितूर होऊन कोठें निघून गेला. कोणी म्हणत त्याला धोंडजी शिद्यानें पोत्यांत बांधून समुद्रांत बुडवून ठार मारलें त्यांतलें काय खरें असेल तें असो पण तो जो बेपत्ता झाला, त्याचा आजवर पत्ता नव्हता एवढें मात्र खरें. आणि त्याची बायको—गणोजीची मोठी मुलगी सरस्वति ही देखील जी आपल्या दोन वर्षांच्या मुलासह त्या हल्ल्यांत माहेरीं सुरक्षित राहील या आशेनें कर्णाजीनें एका जहाजांतून पाठवून दिली, तिचाही तेव्हां-पासून आज पांच वर्षें पत्ता नव्हता कर्णाजीबरोबरच त्याचा मेहुणा—सरस्वतीचा भाऊ पिलाजी शत्रूच्या हातीं कर्नाळ्याच्या हल्ल्यांत ठार मारला गेला होता. राहता राहिला गणोजीचा एकटा पुत्र—एक डोळा दुल्लभजी. तो नुक्ताच रामजीपंत बिवलकर, जावजी गवळी वगैरे पेशव्यांच्या वतीच्या सरदारांनीं तुळाजीच्या खारेपाटण ठाण्यावर हल्ला करून तें ठाणें जिंकलें तेव्हां तेथला ठाणेदार कर्णाजीचा धाकटा भाऊ रुद्राजी धुळप याच्याबरोबरच प्रतिपक्षाकडून कैद झाला होता.

अशी आपल्या कुटुंबपरिवाराची वाताहात झाली म्हणून गणोजीनें इतकी हाय खाल्ली होती असेंही नव्हे. गणोजी तसें पाहू जातां खरा रणमर्द होता, व रणमर्दांना मरणाची पर्वा कधींच वाटत नसते. गणोजी वारंवार म्हणे कीं रणांगणावर धन्यासाठीं शौर्यानें लढतां लढतां मरून अमर होणाऱ्या पुत्रांना जन्म द्यावयाला पूर्व पुण्याची पदरीं लागत असते. त्या दृष्टीनें पिलाजीला कर्नाळ्याच्या हल्ल्यांत मरण आलें त्याचें त्याला यत्किंतूही दुःख वाटलें नाहीं. पण जावई कर्णाजी विजयी न होतां अथवा धारातीर्थीं बळी देखील न पडतां देंकूण कुठेंतरी पायाखालीं चिरडून नाहींसा व्हावा तशी त्याची गत

झाली, आणि दुल्लभजीचीही तीच गत झाली, याचें त्याला मरणप्राय दुःख होत होतें. त्यातच आणखी सरस्वति बेपत्ता झाल्याची भर पडलेली! लोकांनीं कर्णाजीविषयीं काय, सरस्वतीविषयी काय, अथवा दुल्लभजी-विषयीं काय, तोंडाला येईल ते दहा तोंडानी बोलावें. कोणी म्हणत कर्णाजीनें फितूर होऊन कर्नाळ्याचा किल्ला शत्रूच्या घशात लोटला, तर कोणी आणखी काहीं म्हणत कर्णाजी मेला असें देखील लोक म्हणण्याला तयार नव्हते. कोणी म्हणावें त्याला आपण मानाजी आंग्र्याकडे पळून जाताना पाहिलें, कोणी म्हणावे तो नशीब काढण्या-साठीं इंग्रजाकडे मुंबईला गेला, आणि कोणाकोणाची मजल तर तो जंजिऱ्याच्या सिद्दीच्या पदरी जाऊन बाटून नोकरीला राहिला आहे असें म्हणण्यापावेतोंही जात असे. तसेच जनापवाद सरस्वतीविषयीं देखील! असला दुर्लौकिक गणोजीसारख्या मानी म्हाताऱ्याला कसा ऐकवेल! त्याचा राहिलेला एकुलता एक मुलगा दुल्लभजी खारे-पाटणच्या वेढ्यातून रुद्राजी धुळपासह पराजय पावून कोठें पळून गेला हें त्याला ऐकावयाला देखील नको होतें त्यापेक्षा तो वेढ्यात ठार झाला, असें कोणीं त्याला सांगितलें असतें तर त्याला तें ऐकावयाला आनंद वाटला असता. लोकानी कोणीं विचारलें तर तो तसेंच सांगे, व दुल्लभजी मेला ही वार्ता सर्वत्र फैलावण्याचा प्रयत्न करी. त्याच्या दृष्टीने तो मेल्यातच जमा होता.

लक्ष्मी हें गणोजीचें शेंडेफळच म्हणावयाचें लक्ष्मी जन्माला आली आणि तिची आई इहलोक सोडून गेली. तेव्हापासून त्या मुलांची आईही तोच आणि बापही तोच. सरस्वति जरा मोठी झाल्यापासून घरकामात गणोजीला थोडा विसावा मिळे. पण तो मुलीकडून मिळ-णारा विसावा म्हणजे पळतें पीक. मुलगी मोठी झाली, वयांत आली व लग्न होऊन पतिगृही गेली, कीं तें पीक हातचें गेलें.

इतक्या कष्टानीं वाढवून लहानाचीं मोठी जी मुलें गणोजीनें केली, त्याची इतक्या परींनी परवड लागलेली पाहून गणोजीची कंबर खचल्यासारखी कशी बरें होणार नाहीं?

तरीही त्यातल्या त्यांत दुःखाचे उसासे सोडण्याला जागा म्हणून तरी जावजी गवळ्याचा आधार गणोजीला उपयोगी पडला. गणोजी हा मूळपासूनच आग्र्याचा पक्षपाती असल्यानें, व जावजीनें प्रथमपासूनच रामाजीपताच्या अर्थात् पेशव्याच्या-आग्र्याच्या प्रतिस्पर्धी पक्षाचा आंगिकार केला असल्यानें गणोजीचा नाश होण्याला अनेकाशीं जरी रावजीच कारण झाला असला, तरी खासगी नात्यानें रावजी व गणोजी हे परममित्र होते, व त्याच्या मैत्रींत राजकारण कोणत्याही प्रकारचा बिघाड करू शकत नसे. उलट पक्षीं कर्नाळ्यावरचा प्रसग गुदरल्यानतर रावजीनेंच रामाजीपतापाशीं मध्यस्थी करून ठाण्यात गणोजीच्या वास्तव्याचा जम बसवून दिला होता, व गणोजीची लक्ष्मी आपल्या मुलाला-श्रीपतीला करून घेण्याचेही ठरविलें होतें. वास्तविक लक्ष्मी आणि श्रीपति याचें लग्न यापूर्वीच व्हावयाचें. लग्नाची सर्व तयारीही झाली, वाङ्निश्चय झाला, वाङ्निश्चयाचा आहेर झाला, आणि पधरवड्यावर लग्नाचा मुहूर्तही ठरला, श्रीपतीच्या दारीं लग्नमंडपाची मुहूर्तमेढही रोवली गेली तोंच तिकडे सुवर्णदुर्गावरील लढाईचा नगारा वाजला. त्यामुळें तेव्हा तें लग्न लाबणीवर पडलें. तें गेल्या माघात आटोपून घेण्याचा विचार गणोजीनें मनात आणला देखील होता. पण जावजीनेंच म्हटलें कीं जरा आपण थाबू. त्या 'थाबू' म्हणण्यानें गणोजीचा गैरसमज होऊ नये म्हणून जावजीनें मुद्दाम गणोजीला भेटून त्याची समजूत केली होती, "रणागणावर माझा श्रीपति आज लढत उभा आहे. लढाई अजून सपली नाहीं; इतक्यातच पुन्हा बहुधा लढाईला तोंड पडेल. तुळाजी आग्रे आणि सुभेदार याच्यात तहाच्या वाटाघाटी चालल्या आहेत खऱ्या, पण त्यात काहीं अर्थ दिसत नाहीं. यासाठी मीं रणदेवतेच्या स्वाधीन केलेला माझा श्रीपति एकदाचा विजयी होऊन माघारा येऊंदे, मग आपण थाटानें लग्नसमारभ उरकून घेऊ. पुतळी तर मीं श्रीपतीच्या नांवची सूनबाईच्या गळयात बाधलीच आहे, आता त्याविषयीं शका घेण्याचें कारण उरलें नाहीं."

या कारणामुळें लक्ष्मी व श्रीपति याचें लग्न आजवर लाबणीवर पडलें होतें. तें आटोपल्यावर घरदार, शेतवाडी–सारी दौलत लेंक व जावई याच्या हवालीं करून आपण नरसोबाची वाडी अथवा पंढरपूर अशा क्षेत्राच्या ठिकाणीं जाऊन हरिहरि करीत बसण्याचा गणोजीचा मानस होता.

असो. गणोजी गुराच्या गोठयातून सर्व गुरें वासरें सुरक्षित आहेत असें पाहून त्याना गवतकाडी घालून बाहेर येतो, तों एक म्हातारा —त्याच्यापेक्षा जरा तरुण, पन्नाशीची झुळुक लागली आहे, किंवा नाहीं इतक्या बेताचा त्याला गोठ्यामागच्या मोठ्या रस्त्यानें जाताना भेटला.

"कोण, रगोबा?" गणोजीनें काठीच्या आधारावर टेंकून उभ्या उभ्यानें हाक मारली, "कुठें चालला इतक्या सकाळींच?"

'कुठें चालला' हा प्रश्न ऐकून रगोबा साटमानें स्वतःच्या मनाशीं 'अपशकून' असें म्हणून कपाळाला आठया घातल्या. पण चादण्याच्या मद प्रकाशात गणोजीला त्या दिसणें शक्य नव्हतें. त्यातूनही गणोजीच्या ऐवजी दुसरा कोणी असता, तर रगोबाला सताप आला असता. 'एवढें वय झालें तरी कामाला निघालेल्या माणसाला कुठें चाललास असें विचारू नये हें कळत नाहीं ना तुला?' असें म्हणायालाही त्यानें कमी केलें नसतें. पण इतर लोक निराळे आणि गणोजी निराळा. गणोजी हा त्याचा एक उपकारकर्ता तर होताच. शिवाय नातेवाईकही होता. तुळाजी आग्र्याच्या पदरीं त्याचा मुलगा बाबूराव हा देवगडचा किल्लेदार होता. ही तरी गणोजीचीच कृपा होती. आणि धाकटा मुलगा धनाजी आजला जरी रामाजीपताचा हुजऱ्या असला, तरी त्याचीही लौकरच–विजयदुर्ग पाडाव झाल्यावर तिकडील एखाद्या किल्ल्यावर नेमणूक व्हावयाची होती. गणोजीच्या शद्बाला मान देऊनच तुळाजीनें बाबूरावाला देवगडची किल्लेदारी दिली होती, व ती टिकावण्यासाठीं रगोबाची सारी धडपड होती.

तथापि इतकें कठोर बोलून गणोजीला दुखवण्याचें धैर्य जरी रंगोबाला झालें नाही, तरी आपण रामाजीपताच्या सागण्यावरून तुळाजी आग्र्यापाशी त्या कोणा सुभानराव सोडकराच्या कुळबिणीचा शोध करण्यासाठी चाललो आहों, व आपणाला आपल्या मुलाला फितूर करून देवगडावर तुळाजीची बाजू लगडी करावयाची आहे, हें आपल्या तिकडे जाण्यातील खरे कारण गणोजीला सागायलाही तो धजेना मुलगा असा फितूर झाल्यानें वढती व वैभव मिळेल ह्या आशेनें आपण हा आगलावा व हीन प्रतीचा उद्योग करावयाला तयार झालों आहों, हें निर्धोकपणें कबूल करण्याइतकें त्यानें ढुगणाचे सोडून डोकीला अजून गुडाळलें नव्हतें. तो काहीं तरी सागून वेळ मारून न्यावयाची ह्या इराद्यानें म्हणाला, "मी जरा लाबच्या पल्लयावर जातो आहें."

सुभेदाराचें काही काम दिसते आहे. पण काय रे, तू कालच पुण्याहून आलास आणि आज पुन्हा बाहेर चाललास, काय आहे काय प्रकार? पुण्यातली काय खबरबात? दोघा खाशाचा तटा आपसात मिटण्याचा काही रग आहे काय? "

"तसा रग अजून तर दिसत नाही बुवा!"

"का? श्रीमंत पेशवे तटा मिटवायला तयार नाहीत का? पुण्यात तू याच वाटाघाटी करवयाला गेला होतास तर?"

"खरें सागू? तटा एरव्ही मिटला असता. पण मध्येच नाहीं नाही ती खेकटी निघतात, आणि आकाश अधिकाधिक फाटत जातें तिथें काय करणार?"

"काय पुन्हा काय नवी खेकटीं उत्पन्न झालीं आहेत आणखी?"

"खेकटीं उत्पन्न झालीं आहेत, तीं सागायलादेखील लाज वाटते मला."

"इतकीं लाजिरवाणीं खेकटीं या भानगडींत उत्पन्न झालीं आहेत म्हणतोस, त्या अर्थी तीं मला वाटतें, सुभेदारांकडूनच उत्पन्न झालीं असतील."

"तसेंच काहीं म्हणवत नाहीं. पण नाही असेंही म्हणवत नाही. जिथून धूर निघतो तिथें आग नाही असें कोणीं कसें म्हणावें? पेशवे जरी असल्या भलत्या नादाला बळी पडत असले, तरी कोंकणपट्टींत आजकाल पेशवे सुभेदाराच्याच डोळ्यानी पाहतात. त्यावरून मला वाटतें कीं नसत्या कुरापती काढून भांडण वाढवून सरखेलाना हैराण करायची खुमखुमी पेशव्यापेक्षा सुभेदारानाच जास्त आहे."

"ती कशी काय?"

"त्याना जर तटा मिटवायचा असता, तर अमक्या व्यापाऱ्याचें मुंबईकर इंग्रजाकडून आलेलें व्यापारी गलबत तुमच्या लोकानीं लुटलें त्याचें नुकसान करून द्या, अमक्या तमक्याची कुळबीण पळून तुमच्या किल्ल्यावर कोणा शिलेदाराच्या आसऱ्याला आली आहे तिचा शोध करून ती परत पाठवून द्या,—काय, ह्या काय तडजोडीच्या अटी?"

"असल्या अटी? ही कुळबीण आहे तरी कोण कुठच्या राजाची राणी?" गणोजीनें सहज विचारलें. त्यालादेखील त्या अटी मोठ्या चमत्कारिक वाटल्या. त्यातल्यात्यात ती दुसरी अट ऐकून त्यानें स्पष्टपणें बोलूनही दाखविलें, "सुभेदाराच्या अमदानीत राजकारणात रांडा—पोरें—कुळबिणी याना इतकें महत्त्व मिळालें तर त्यात काही नवल नाहीं. सुभेदाराचा कारभार सर्वांना माहीत आहे. पण त्यानी श्रीमंत पेशव्यापाशींदेखील उघड उघड एका कुळबिणीचा कैवार घेण्याला तयार व्हावें?—मला तरी वाटतें, इथें काही तरी पदरगाठ असल्याखेरीज ते त्यात इतकें मन घालावयाचे नव्हेत. खरें ना?"

रंगोबाच्या मुखावाटे संकोचामुळें व भीतीनें उत्तर उमटेना. न जाणो, आपण काहीं बोललों आणि त्याचा बभ्रा झाला तर?

"खरें कीं नाहीं मी म्हणालों तें?" रंगोबा काहीं उत्तर देईना असें पाहून गणोजीनें पुन्हा विचारलें, "एरव्हीं कुणाच्या कुणा कुळबिणीविषयीं इतकी आस्था बाळगण्याइतका परोपकारीपणा सुभेदाराच्या आंगीं आहे का?"

"नाही खरा. पण काय आहे कोणास ठाऊक? आपणाला तर त्याच्याशीं काय करायचे आहे म्हणा! आली वाट्याला कामगिरी, तेवढी केली की मोकळे झाले." रगोबाला तो अप्रिय विषय टाळावयाचा होता. म्हणून त्यानें प्रसगावधान राखून पळवाट काढली. श्रीपति गवळी हा गणोजीचा भावी जामात मुद्दाम सुभेदाराच्या बोलावण्यावरून रात्रौ ठाण्यात आल्याचे त्याला कळलें होतें. त्या बातमीचा यावेळी त्याने नेमका उपयोग करून घेतला.

"खरे, गणोबा! तुला एक बातमी सागावयाची राहून गेली. तुझा जावई इथें आला आहे. तुला माहीत आहे?"

"मला नाही माहीत. केव्हा आला?"

इतक्यात लक्ष्मी धारेचें भाडें व कौंपिनेश्वराला दूध नेण्याची पितळेची पचपात्री घेऊन मागाहून आली. ती गणोजीच्या मागे येऊन उभी राहते, तों गणोजीचा प्रश्न तिला ऐकू आला. तिनें कुतूहलानें विचारलें, "कोण आला? कोण हो आला आहे बाबा?"

गणोजी लक्ष्मीच्या प्रश्नाकडे लक्ष्य न देता रगोबाला म्हणाला, "केव्हा आला? काल?"

"होय. काल रात्रौ आला असावा." रगोबा उतरला, "तुला नाहीं भेटला?"

"कोण—कोण हो रगोबा?" लक्ष्मीनें पुन्हा उत्सुकतेनें विचारलें.

"तुझा दादला!" रगोबा थट्टेच्या स्वरात उत्तरला.

लक्ष्मीला रगोबाचा थट्टेखोर स्वभाव माहीत होता. लहानपणापासून ती त्याच्या कटिखाद्यावर खेळलेली, तिला 'तुझा दालला' हे रगोबाचे प्रेमाचे विनोदी बोल वयाच्या पाचव्या वर्षापासून आज दहा अकरा वर्षे ऐकावयाला मिळत होते, ते परवापावेतों. ती अकरा बारा वर्षाची होईपावेतों माळावर शेळ्या मेंढ्या चारणारा म्हातारा जान्या धनगर, कौपिनेश्वराच्या देवालयाशेजारीं गेल्या वीस वर्षापासून रामाजी महादेव बिवलकरानीं तेथें कौपिनेश्वराचें भव्य मदिर बाधण्याच्या पूर्वीपासून विरक्त वृत्तीनें रहाणारा दाढीवाला विश्वभरबोवा,

तिच्या जन्मापूर्वीपासून गावात भिक्षा मागून पोट भरणारा वेडसर धाकभट यापासून तों एकदा तुळाजी आंग्रे कौपिनेश्वराच्या दर्शनाला आला असतांना त्यालादेखील रगोबानें थट्टेनें लक्ष्मीचा दादला बनवून सोडलें होतें. अलीकडे मात्र रगोबा तिची थट्टा करताना जरा जीभ आवरून बोले. तशी थट्टेखोरपणाची लहर म्हाताऱ्याला आज आली आहे अशी आपल्या मनाची समजूत करून घेऊन लक्ष्मी तिकडे दुर्लक्ष्य करून गणोजीला पुन्हा आग्रहानें विचारू लागली, "कोण हो आला आहे बाबा?"

"अग! खरेंच तुझा दादला!" रगोबा पुन्हा उत्तरला.

"ही काय हो तुमची मेली भलत्या वेळी थट्टा?"

"थट्टा नव्हे लक्ष्मी! खरोखरच—श्रीपती गवळ्याशी तुझें लग्न ठरलें आहे ना? तो आला आहे. भलत्याच वेळीं मी थट्टा कशी बरें करीन?" रगोबानें शातपणें हसत म्हटलें.

"मग जावईबुवाना जाऊन भेटावें का?" गणोजी म्हणाला.

"भेटावें तर? जरूर भेटावें." रगोबा उत्तरला.

"पण इतक्या तातडीनें तो इकडे कशाला बरें आला असावा?"

"माझी आपली कल्पना आहे, त्याच्या समेटाच्या वाटाघाटी चालल्या आहेत ना, त्या बाबतींत सुभेदाराना एखादी कामगिरी त्याला सांगायची असेल. तिकडे खारेपाटण—विजयदुर्गाच्या बाजूला खंडूजी माणकर, जावजी गवळी वगैरे सारे गुतून पडले आहेत, त्याना कांहीं एखादी मसलत कळवायची असेल. काय असेल तें त्याचें त्याना माहीत."

"त्याच बाजूला—विजयदुर्गाच्याच बाजूला चालला आहेस ना?"

"होय."

"मग एक काम करशील?"

"काय करू?"

"जावजीबाबा जर भेटला असला, तर त्याला म्हणावें, एकदांची पोरगी पदरांत घेऊन मला मोकळा कर ना! म्हणजे मी सुटलों."

"ठीक आहे. मी करतों तेवढें काम." असें म्हणून रंगोबा लक्ष्मीकडे पाहू लागला. लक्ष्मीनें श्रीपतीचें नाव पूर्वी ऐकलें होतें. पण त्याला अजून डोळ्यानीं पाहिलें मात्र नव्हतें. त्याच्याशीं आपलें लग्न ठरलें आहे एवढें तिला माहीत होतें. आपल्या लग्नाविषयींच ह्या दोघाचें सभाषण चाललें आहे असें तिनें पाहिलें, आणि रगोबा जेव्हा पुन्हा तिच्याकडे पाहू लागला, तेव्हा हा पुन्हा थट्टा करू लागणार हें हेरून ती लाजून ओशाळल्यासारखी खालीं मान घालून गोठ्याकडे वळली.

"आता का? आता का? आता कशी लाजली?" रंगोबा आनदी वृत्तीनें खादे उडवीत व मान डोलवीत म्हणाला," अग ए सुग्रणी! काहीं निरोप आहे का सासरी तुझ्या सागायचा?"

लक्ष्मीनें यावर नुसतें लचकत्या मानेनें स्मित करीत मागें वळून पाहिलें; व उजव्या हाताचा आगठा आणि जवळचें बोट याची चिमुट जुळवून "फार चागलें केलैंत. पुरे आता. तुम्ही तरी बरेच आहा कीं हो!" अशा आशयाची खूण करीत ती गोठ्यात गेली.

रगोबा निघून गेला, तेव्हा बहुतेक उजाडलें होतें. "एकदा सुभेदाराच्या वाड्यात जाऊन येतों. जावईबुवा जर भेटले आणि घरीं आले तर पाहतों." असें मनात आणून गणोजी लक्ष्मीला हाक मारून म्हणाला, "लक्ष्मी!"

लक्ष्मी आपल्याशींच आपल्या भावी ससाराचीं गोड कल्पनादृश्यें पहाण्यात दग होती. तिला गणोजीची हाक ऐकूच गेली नाहीं.

"अग ए पोरी!" गणोजी पुन्हा मोठ्यानें हाक मारून म्हणाला, "कुठें आहेस?"

"काय बाबा?" आतां मात्र लक्ष्मीला हांक ऐकू गेली, व ती ओ म्हणाली.

"मी जाऊन येतों जरा बाहेर. आज धार काढून कौपिनेश्वराला दूध तूं नेऊन पोंचविशील ना?"

"मी पोंचवीन,"

"आणि आज जांवईबुवा कदाचित् जेवायला येतील बरें का?"

यावर लक्ष्मी नुसती स्वतःशी हसली. तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. गणोजीनेंही तिच्यापासून उत्तराची अपेक्षा केली नव्हती. तो काठी टेंकीत टेंकीत प्रथम देवदर्शन करू व मग सरकारी वाड्याकडे जाऊ अशा विचारानें देवालयाकडे निघाला.

त्याला जर तेव्हा कोणी सांगितलें असतें कीं ज्या भावी जावयाला भेटण्यासाठीं तू इतक्या उत्सुकतेनें चालला आहेस, तोच जावई सूर्योदयापूर्वी तुझ्या नाशाला कारण होणार आहे, आणि तुझी लक्ष्मी त्याची हाडवैरीण होणार आहे, तर तें त्याला खरें वाटलें असतें का?

## प्रकरण तिसरें

# कौपिनेश्वराच्या देवालयांत

परंतु गणोजी देवालयापाशीं जाऊन पोंहोचतो तों तेथें त्याला दिसलें तें नवलच !

देवालयाचे दरवाजे रोज सकाळींच उघडत असत, व प्रथम काकडआरती होई. तेव्हापासून तों रात्रौ शेजारती होईतों देवालयात दर्शनेच्छु भक्ताची नेहमीं रीघ लागलेली असे. रामाजीपंताचा मुक्काम ठाण्यात असला, तर तो पूजेसाठीं पहाटेचाच येई. पण तेव्हांदेखील इतराना देवदर्शनाला कधींच अडकाठी नसे. आणि आज गणोजीनें पाहिलें तों देवद्वारावर हत्यारबंद पहारेकरी खडा !

"हें काय आज नवीनच प्रकरण? देवाच्या दरवाजावर हा हत्यारबंद पहारा कशाला बरें?" असें स्वतःला विचारीत तो मंदिराच्या पायऱ्या चढू लागला, तोंच पहाऱ्यावर असलेल्या धनाजीनें एकदम पुढें येऊन त्याला हटकलें, "कुठें चाललास? मागें फीर."

"का मागें फीर?" देवदर्शनाची बंदी का म्हणून?" गणोजीनें जागच्या जागीं थबकून हातातील काठीवर हनुवटी टेंकून जरा चिडून विचारलें

"मागें फीर अगोदर. आत सरकारस्वारी पूजेला बसली आहे." धनाजी उत्तरला.

"श्रीपति गवळी इथें आला आहे काय?" गणोजीनें धनाजीला विचारलें. बोलता बोलता त्याचें लक्ष्य मंदिरासमोर काढून ठेवलेल्या चढावांकडे गेलें. ते चढावही वाङ्निश्चयाच्या वेळीं अहेरात त्याने भावी जांवयाला दिलेले होते. ते तेथें दिसताच त्याला श्रीपति मंदिरात असल्याबद्दल शंकाच उरली नाहीं.

परंतु धनाजीनें मात्र स्पष्ट नकार दिला.

"नाहीं? श्रीपति इथें आलेला नाहीं?" गणोजीनें इथें कांहीं तरी विपरीत प्रकार आहे असें तर्कानें हेरून कडव्या भाषेंत प्रश्न केला. धनाजी शेजारी असून इतकें तोडून बोलतो, रंगोबाची लीनता याच्या अंगी नाहीं, हें पाहून तरुणपणीचा आवेश त्याच्या अंगात सचारूं लागला. मुरलेले व म्हातारपणामुळें गोठलेलें शौर्य त्याच्या नसानसातून सळसळूं लागलें. तेव्हां उषःकालाच्या संधिप्रकाशात कोणी त्याच्या मस्तकावरील पागोटें काढून पाहिलें असतें तर मस्तकावरचे पिकलेले केंस रणांगणावर जाण्यासाठीं सज्ज होणाऱ्या सैन्याप्रमाणें ताठ उभे राहूं लागलेले दिसले असते. धनाजीला रामजीच्या आरक्त नेत्रांकडे पाहून त्याच्या आरक्ततेचा पडताळा त्या निमआधाऱ्या वेळीं पटला नाहीं तरी वटारलेल्या डोळ्यांत गरगर फिरणारीं बुबुळें दिसलीं. इतका वेळ गणोजी हातातील काठीच्या टेकाव्यावर हनुवटी टेंकून उभा होता, तो प्रतिपक्षावर हल्ला करण्यासाठीं नाग ताठ उभा राहतो तसा उभा राहात धनाजीला विचारूं लागला! "धनाजी! खरें बोल. श्रीपति इथें आलेला नाहीं? रंगोबाचा लेक असलास तर खरें बोल."

धनाजी जरी ताज्या रक्ताचा तरुण होता, त्याच्या हातात जरी भाला होता, आणि समोर उभा असलेला गणोजी निःशस्त्र व काठीच्या टेकाव्यानें चालणारा दुबळा म्हातारा होता, तरी गणोजीचा आवेश पाहून तो मनात कचरला. त्याला म्हाताऱ्याची दुर्वास वृत्ति माहीत होती. गुहेंत वाघ असो अथवा नसो, ही वाघाची गुहा असें माहीत होताच जवळून जाणाऱ्या लोकांचें काळीज जसें भीतीनें धडधडूं लागतें, तशी धनाजीची गाळण उडाली. श्रीपति गवळी त्याला माहीत होता. त्यानेंच त्याला अर्ध्या घटकेपूर्वी झोपेंतून उठवून मंदिरांत आणलें होतें. पण एकदां 'नाहीं' म्हटल्यावर आता त्यानें 'हो' पुन्हा कोणत्या तोंडानें म्हणावें? बरें; सपशेल नकार देण्याची तर त्याची छातीच होईना. अशा प्रसंगीं त्यानें यथाशक्ति चतुराई लढवून उत्तर दिलें, "मला माहीत नाहीं."

" हा इथें त्याचा जोडा दिसतो आहे, ती त्याची घोडी आहे; आणि खोटें बोलतोस?" गणोजीनें पूर्ववत् कठोर भावेंत विचारलें.

"कोणी एक शिपाई गडी आत देवदर्शनाला गेला आहे खरा. पण तो श्रीपतीच कीं दुसरा कोणी आहे मला माहीत नाहीं." धनाजी-नें उडवाउडवीचें उत्तर देऊन पुन्हा पळवाट शोधण्याचा प्रयत्न केला.

" इतक्या सकाळींच देवदर्शन, आणि तें इतका वेळ?" गणोजी आपल्या मनाशीं विचार करू लागला, " इथें खास काहींतरी विपरीत आहे. काहींतरी काळेबेरे विचार त्या लबाड रामाजीपताच्या मनात घोळत असले पाहिजेत. पण श्रीपति त्याच्या तावडींत कसा सापडला? माणकर हे मराठशाहींतील सरदार अर्थात् पेशव्याचे अंकित खरे. व म्हणून ते पेशव्याच्या आज्ञेनुसार रामाजीपताच्या हाताखालीं आंग्र्याचा मुलूख जिंकून पेशवाईत सामील करण्यात गढून गेले आहेत यांत तितकेंसें कांहीं वावगें नाहीं. मी आंग्र्याचा शिलेदार म्हणून जसा मला माझ्या धन्यांविषयीं अभिमान वाटतो, तसा जावजी-ला पेशव्याचा व बिवलकराचा अभिमान वाटला तर त्यात वावगें कांहींच नाहीं. पेशवे व आंग्रे यांच्या वैरात खरा दोषी कोण हा विचार करण्याचा अधिकार आम्हां शिपाईगड्यांचा नाहीं तथापि हा बिवलकर केव्हां काय दगलबाजी करील याचा नियम नाहीं. हा पहिल्या प्रतीचा लांचखाऊ व विश्वासघातकी आहे. दुराचारी आहे. आणि नाहीं काय? विष म्हटलें कीं तें प्राणघातक आहे हें निराळें सांगण्याची काय गरज? परमेश्वरा! असलें भलतें कांहीं ऐकण्याचें ह्या गणोजी पडवळाच्या कपाळीं आणू नकोस. —मला आत्तांच्या आत्तां श्रीपतीची भेट घेतलीच पाहिजे, व त्याला वडीलपणाच्या नात्यानें सावधगिरीची सूचना दिली पाहिजे. तो मार्ग चुकत असेल तर त्याला मार्गावर आणलें पाहिजे, तो समजून उमजून आडमार्गाला जात असेल, तर त्याला तो नाद सोडायला लावला पाहिजे. तो जर रंगोबा म्हणाला त्याप्रमाणें बिवलकराच्या चक्रांत सांपडला असला, तर—त्या घरात लक्ष्मीला देण्यापूर्वी मला विचार करावा लागेल.

तो गवळी जर देशद्रोही असेल, तर त्यापेक्षा माझी लक्ष्मी माझ्या हातानें ठारदेखील करीन. पण तिला देशद्रोही दादल्याच्या नावानें बाटून नरकात जाऊ देणार नाही आधींच मीं माणकराशीं सोयरीक जोडली आणि माणकर आग्ऱ्याविरुद्ध बडाळी माजवीत आहेत, हें पाहून लोक मला हसत आहेत त्यांत आणखी हा प्रकार असला, म्हणजे हे विषारी सापाला सिंहाचे पंजे आणि गेंड्याचें शिंगच फुटलें म्हणावयाचें !—छे पण. इतका नादान श्रीपति असणें शक्य नाहीं. तो जावजी गवळ्याचा—मातृभूमीसाठी तळहातावर शीर घेऊन लढता लढतां प्राणाचीही पर्वा न करणाऱ्या जावजीचा पुत्र आहे. तुळशीच्या रोपाला भांगेची डहाळी कशी फुटेल? "

तोंच धनाजीनें 'तू उभा रहा' असा सवाल टाकला, त्याबरोबर गणोजीच्या विचाराचा धागा तुटला. त्यानें पूर्ववत् सशयी वृत्तीनें विचारलें, "तुझा तो शिपाईगडी देवदर्शन करून अजून माघारा का आला नाही?"

"असले तिढे प्रश्न तू मला विचारूं नकोस. त्याचा परिणाम नीट होणार नाही." धनाजी उत्तरला.

तो बेपर्वाईचे उद्गार ऐकताच गणोजीचें पित्त एकदम खवळलें व काटी उगारण्यासाठीं त्याचा हात सळसळू लागला. असले उपमर्द-कारक उद्गार कोणाच्याही तोंडून ऐकण्याची त्याला सवय नव्हती. परंतु त्यानें मनाला शांतवीत हात आवरला. कारण ह्या प्रसंगाशी त्याच्या एकुलत्या एका लाडक्या लक्ष्मीचे भवितव्य निगडित झालेलें होतें. यावेळीं जर पडतें घेतलें नाहीं तर सर्वच गाडें विस्कळित होईल असें ध्यानीं आणून, तो दिखावू शांतपणानें म्हणाला, "तू उगाच संशय घेतो आहेस व चावून चिकट ओढून बळकट करतो आहेस. मी गणोजी पडवळ. मला तू ओळखलें नाहीस? गावकऱ्याचीही ओळख तुला नाहीं? वाः!"

"मीं तुला ओळखलें. पण सरकाराची जिथें स्पष्ट आज्ञा आहे कीं पूजा होऊन बाहेर येईतों कोणी चिटपाखरूदेखील आत सोडा-

वयाचें नाहीं, तिथें मी काय करूं?" धनाजीनें नरमाईच्या भावनेनें विचारलें

"चिटपाखरूदेखील आत सोडावयाचें नाहीं काय? खास, आंत कसलें तरी कृष्णकारस्थान चाललें असलें पाहिजे. याचा छडा मला लावलाच पाहिजे" असें मनांत म्हणून धनाजीला गणोजीनें विचारलें, "मला आत नाहीं सोडणार तर सोडूं नकोस. पण श्रीपतीची आणि माझी भेट तरी करवून देशील की नाहीं? बाबारे! तो माझा जांवई होणार आहे. आता तरी तुला काहीं शका नाहीं ना?"

"काय; लक्ष्मीचें लगीन श्रीपतीशी ठरलें आहे?" धनाजीनें हसत हसत विचारलें, "कधींचा मुहूर्त?"

"मुहूर्त अजून ठरला नाहीं, पण लग्न मात्र ठरलें आहे खरें. मुहूर्त लौकरच ठरेल."

"आनदाची गोष्ट आहे."

"मग जाऊ? आत जाऊन त्याला भेटूं?"

"तो इतक्यात बाहेर येईलच कीं! इतकी घाई कशाला?"

गणोजीची पुरी खात्री झाली की काहींतरी गूढ भानगड आत चाललीच असली पाहिजे. ती काय, तें समजून घेण्यासाठीं त्याचा जीव तळमळू लागला. एकदा त्याच्या मनात आलें, 'ह्या सोट्यानें ह्या पहारेकऱ्याचा सोक्षमोक्ष करून बळजबरीनें आत जावें का?' पण दुसऱ्याच क्षणाला त्या विचाराची घातुकता त्याच्या मनाला पटली. 'श्रीपति बाहेर येईतों थाबावें का?—पण अशानें आंतील भानगडी कशा कळणार? पोरग्याला फितूर करण्यासाठीं आत नेण्यात आलें आहे, कीं तो फितूर होत नाहीं म्हणून त्याच्या जिवाला आत काहीं दगा फटका होणार आहे,—हो! रामाजीपत म्हणजे केवळ काळसर्प. तो केव्हा कोणाला कसा डसेल याचा काय भरवसा?—युक्तीनें आत जाऊन काय तें पाहिलेच पाहिजे. बाहेर थाबून भागावयाचें नाहीं. तो धनाजीला म्हणाला, "बरें तर, तू एवढें तरी कर, आंत जाऊन श्रीपतीला सांग कीं गणोजी पडवळ बाहेर आला आहे. तो तुम्ही

वाट पाहत बसला आहे. जातांना मला भेटावयाला विसरूं नकोस म्हणावें.—आज रंगपचमीचा सणासुदीचा दिवस, अनायासें जावयाला गोड घांस घालावा असें मनात आहे."

"आणि जावयाच्या पंक्तीला आम्हाला नाहीं का बोलावणार?" धनाजीनें हसत विचारलें.

"कां नाहीं बोलावणार? तू देखील ये." गणोजी उत्तरला.

"बरें आहे. तुझा निरोप त्याला सांगून येतों." असें म्हणून धनाजी आत गेला. त्याच्या मागोमाग त्याचा डोळा चुकवून गणोजीही आत घुसला.

## प्रकरण चौथें

# गणोजीवर प्राणसंकट

धनाजीची कल्पनाही नव्हती कीं मंदिरात आपणाला अशा प्रकारचें दृश्य पहावयाला मिळेल.

एक सुमारें पच्चावन वर्षांचा वृद्ध सोंवळें नेसून गाभाऱ्यात देवाला पचारती ओंवाळीत होता, व गाभाऱ्याच्या बाहेर एक सुमारें वीस एकवीस वर्षांचा मराठा तरुण उभा होता. त्या दोघाच्या मध्यें गाभाऱ्याच्या उंबरठ्यावर फुलाच्या परडींत बेलभंडार ठेवण्यात आला होता. गाभाऱ्यात देवासमोर पाजळलेल्या नंदादीपाचा प्रकाश गाभाऱ्या-बाहेरील सभामंडपातही फाकत असल्यानें त्या प्रकाशात त्या तरुणाची ओळखीच्या माणसाला ओळख पटण्यापुरतें त्याचें मुखमंडळ स्पष्ट दिसत होतें. अंगांत पांढराशुभ्र गोंडेदार आंगरखा, पांढरीशुभ्र सुरवार, डोक्यावर फेंटा, कमरेला कमरपट्टा व कमरपट्ट्यांत म्यान केलेली तरवार, कमरपट्ट्यावर जरतारी शेला गुंडाळलेला असून त्या शेल्याच्या व कमरपट्ट्याच्या आत खोंचलेला खंजीर, आणि हातांत भाला असा त्या तरुणाचा पेहेराव होता. त्याचा वर्ण निमगोरा, डोळे काळेभोर व पाणीदार, अणकुचीदार नाक, शरीरयष्टी फार स्थूलही नाहीं व सडपातळही नाहीं, चर्येवर शंभर टक्के सौंदर्य पसरलेलें नसलें तरी मोहकता मात्र कमालीची, अशा त्या तरुणाची कोणींही तेजस्वी तरुणांत गणना केली असती. पण का नकळे, आज त्याचें तेज लोपल्यासारखें दिसत होतें. तें गुलाबाचें उमललेलें फूल खरें; पण तें उन्हाच्या तिरिपेनें कोमेजून गेलें होतें. सूर्य खरा, पण तो मावळता व त्यांतही ढगांनीं व्यापिलेला. पोलादी तरवार खरी; पण गंज चढ-लेली. मूर्ति नयनमनोहर खरी; पण भंगलेली.

धनाजीनें दुरून जेव्हा त्या तरुणाकडे पाहिलें, तेव्हा आश्चर्यानें आपल्या मनाशीं म्हटलें, "हा गडी इतका चिंतातुर कां? आंत येतांना तर तो आनदी वृत्तीनें हसत होता, तो आनद व तें हर्षे अर्ध्या घटकेच्या आत पार कसें मावळलें? असें कोणतें अकल्पित सकट याच्यावर कोसळलें आहे कीं ज्यानें त्याचा हुरूप हिरवाच खाऊन टाकला? अशा कोणत्या जळत्या निखाऱ्यावर हें जाईचें फूल पडलें, कीं तें हा हा म्हणता कोमेजून गेलें?"

धनाजी अवघा दहा पाच पळें तेथें उभा राहिला, व तोही गाभाऱ्या-पासून पधरावीस पावलें दूर एका कोंपऱ्यात आरतीच्या वेळीं वाजविण्या-च्या मृदगाची घोडी उभी होती तिच्यामागें समोरचा तो विचित्र देखावा पाहून गणोजीचा निरोप श्रीपतीला सागण्याचें धैर्य काहीं त्याला होईना. 'निरोप सागितलास' असें गणोजीनें विचारलें तर खोटेंच सागून मोकळें व्हावें, असा पर्याय आपल्या मनाला पढवीत तो माजराच्या पावलानी तेथून निसटला.

गणोजी जो पहारेकऱ्यामागोमाग लपत छपत आत गेला, तो मृदगाच्या घोडीच्या मागें पाच हातावर पुराणिकबुवानीं रोज पुराण सागताना बसण्याचें व्यासपीठ हातें, त्याच्यामागें दडून बसला आंत उभा होता तोंवर गणोजीची गाभाऱ्यातील देखावा पाहाताना बरीच कुचबणा होत होती समोर ती घोडी, व तिच्या समोर देवालयाचे खांब असल्यानें व्यासपीठामागून बसल्या बसल्या त्याला गाभाऱ्यांत काय प्रकार चालला आहे हें काहीं दिसेना. गाभाऱ्याच्या आत एक व बाहेर एक असे दोन मनुष्य तेथें उभे आहेत एवढें त्यानें आंत शिरता शिरता पाहिलें. गाभाऱ्यातील दिव्याच्या लख्ख प्रकाशांत त्यानें सोंवळें नेसून देवासमोर पचारती ओंवाळणाऱ्या रामाजीपत बिवलकराला ओळखलें पण श्रीपतीला तो नीटसें ओळखू शकला नाहीं. तथापि त्याचा तर्क मात्र होता की ज्याअर्थी श्रीपतीचा घोडा व जोडा बाहेर आहे, त्याअर्थी तोच तो असावा.

तें पडताळून पाहण्याची सधी गणोजीला धनाजी बाहेर गेला तेव्हां

मिळाली. तो हलकेच व्यासपीठामागून भिंतीला सरपटत निघाला, तो गाभाऱ्यालगत असणाऱ्या खांबामागें जाऊन उभा राहिला.

रामाजीपतांनीं पचारती ओंवाळून झाल्यावर बाहेर तोंड फिरविलें व तेथें उभा असलेल्या तरुणाला विचारलें, "हं! श्रीपती! मग काय झाला विचार?"

"सरकार! त्या खलित्यात काय लिहिलें आहे हें कळल्याखेरीज मी तो खलिता सुवर्णदुर्गावर नेऊं शकणार नाही."

"का? मी म्हणतो, खलित्यात काही का असेना? तुला त्याच्याशीं काय करायचें आहे? सागितलेलें काम आपण करावें."

नुसत्या सागकाम्याप्रमाणे खलिते पावते करण्याचें काम यःकश्चित् हरकारूचें, तें ह्या श्रीपती गवळ्याचें काम नव्हे. तुमच्या खाद्याला खादा भिडवून आज इतके दिवस झगडणाऱ्या व आग्ऱ्याना रडतोंडी आणणाऱ्या जावजी गवळ्याचा मुलगा मी—माझी तुम्ही इतकीच योग्यता समजता काय?"

"आहे. पोरगा पाणीदार आहे. माझी निवड चुकली नाहीं." गणोजी स्वतःशी म्हणाला.

"श्रीपती! जावजी गवळ्याची व तुझीही योग्यता मी पूर्णपणें जाणतों, म्हणून तर ही अत्यत जबाबदारीची कामगिरी पार पाडणाऱ्या पहिल्या दर्जाच्या विश्वासू व कर्तबगार श्रीपतीला मीं ह्या कामगिरीवर योजिला. नाहींतर इथें ह्या ठाण्यात हरकारूना काय दुष्काळ आहे! जावजी आणि तू, दोघावरही माझा पूर्ण भरवसा आहे."

"तर मग खलित्यात काय आहे हें सागावयाला कोणती हरकत?"

"हरकत तशी कोणतीच नाही. पण श्रीमत पेशव्याचा तसा हुकूम—"

"असल्या सबबी मला ऐकावयाला नको आहेत."

"बरें; सबबी मी सागत नाही. ह्या लखोट्यात काय आहे तें तुला मी सागतों—"

"नुसतें सांगतों नको, मला तो माझ्या डोळ्यानीं वाचून पाहिल पाहिजे."

"वाचून पाहूला देतों, आणि मोहोर करीन. मग तर झालें ना?"

"द्या तर तो इकडे." असें म्हणून श्रीपतीनें उंबरठ्यावरचा लखोटा उचलला. तोंच रामाजीपतानें आपण सोंवळे देवाच्या गाभाऱ्यांत उभे आहों हें विसरून त्याच्या हातातून तो हिसकावून घेतला. वास्तविक तो सोंवळ्यात होता, शिवाशिवीच्या भयानें त्यानें श्रीपतीला गाभाऱ्याबाहेर उभें केलें होतें, व नेहमीं कोणाही ब्राह्मणेतराला गाभाऱ्यांत जाण्याला प्रतिबंध होता. पण यावेळीं त्याला त्याचें यत्किंचित भान राहिलें नाहीं.

"मी तुला सर्व कांहीं सांगतों व दाखवितों. तुम्हां बापलेकांच्या जिवावरच जर माझ्या साऱ्या मर्दुमकीची व राजकारणाची मदार, तर तुझ्यापासून गुप्तांतल्या गुप्त गोष्टी मी तरी कशा लपवून ठेवू शकेन? पण राजकारणाच्या भानगडी इतक्या नाजुक व महत्त्वाच्या असतात कीं पोटच्या पोरापाशीं, जिव्हाळ्याच्या मित्रापाशीं अथवा शेजेच्या बायकोपाशींदेखील त्यांची वाच्यता करणें धोक्याचें असतें.."

"मग?.... ."

"थाब. अगोदर माझें ऐक. मी तुला दाखवीत नाहीं असें कोठें म्हटलें? पण त्यापूर्वी ही कामगिरी विश्वासानें पार पाडीन अशी शपथ तूं घेतली पाहिजेस."

"आम्ही गवळी काय अथवा माणकर काय, सारे सेवक आंग्र्यांचे, व आंग्रे पेशव्याचे सेवक. पेशवे पडले छत्रपतींचे सेवक. अर्थात् छत्रपति हा आमचा परमेश्वर. त्या परमेश्वराशीं दगलबाजी करण्याचा प्रसंग जर——"

"शिव शिव! छत्रपतीशीं दगलबाजी? तूं काय बोलतोस हें! पेशव्यांच्या आज्ञेप्रमाणें मी वागत आहें; ते पेशवे छत्रपतीशीं दगलबाज आहेत काय?"

"मी तसें मुळींच म्हटलें नाहीं."

"मग?"

"हा खलिता पेशवे सरकारकडून आला आहे काय?"

"पेशवे सरकारांच्या आज्ञेवरून मीं हा खलिता लिहिला आहे, कौपिनेश्वराची शपथ घेऊन सांगतों. आता तरी तुझी खात्री झाली का?"

"तेवढ्यापुरती खात्री झाली. तुम्ही खोटी शपथ घेणार नाहीं इतका माझा तुमच्यावर विश्वास आहे. पण सुभेदार! मला अजूनही एक शंका आहे. विचारूं का?"

"अवश्य विचार."

"तुळाजी सरखेल आपणाशीं सख्य करायला इतके उत्सुक असतां-ना अजून सख्य होत नाहीं याचा अर्थ तरी काय? घोडें कुठें पेंड खातें आहे?"

रामाजीपतानें एकवार भेदक दृष्टीनें श्रीपतीकडे पाहिलें, व नुसती मान तुकावली.

त्या पाण्याच्या पोटीं विस्तव असेल असें श्रीपतीला वाटलें नाहीं. त्यानें पुन्हा विचारलें, "तुमची इच्छा तरी हें सख्य व्हावें अशीच आहे ना?"

"तू माझी परीक्षा पाहात आहेस का?" रामजीपतानें भुवया चढवून विचारलें.

"परिक्षा कशाला पाहू मी? पण मला जी शका आली, ती मीं तुम्हांला विचारली."

"तीच–तीच भानगड मिटविण्यासाठी ही सारी धडपड मीं चालविली आहे. आज तुला जी ही काममिरी मी सांगत आहें, ती त्यासंबंधींच आहे."

"जर सरखेलांच्या कल्याणाची एखादी गोष्ट मला करतां येणें शक्य झालें, तर मी स्वतःला मोठा भाग्यवान समजेन."

"तशीच ही गोष्ट मी तुला सांगतों आहें." रामाजीपंत बेलभंडार पुढें करीत म्हणाले, "अगोदर हा बेलभडार उचल, मग तुला सारें मी नीट समजावून सागतों. माझी खात्री आहे, तूं इमान सोडणार नाहींस अशी. तुम्ही काय, माणकर काय, माझे डावे उजवे हात

आहां. तुमच्या जिवावर मी हे दिवस पाहतों आहें. श्रीमंत पेशव्यांना-देखील मी वारवार लिहीत आलों कीं कोंकणपट्टीत इतक्या धडाडीनें आपणाला विजय मिळाला, याचें सारें श्रेय खड्डूजी माणकर, जावजी गवळी आणि त्याचा शूर पुत्र श्रीपति या तिघाना आहे. आणि श्रीमतदेखील वारवार मला लिहितात की काय वाटेल तें झालें तरी त्या त्रिमूर्तींना दुखवू नका. लोकाना नुसतें वाटतें की रामाजीपत बिवलकर काय पाहिजे तें स्वतःच्या हिंमतीवर करू शकतात. पण त्याना इतक्या थोराची मर्जी सपादून वागावें लागते, तेव्हा त्याचा पल्ला येतो.—मला तुझा बेलभडारदेखील अशासाठीं पाहिजे कीं मग एकजुटींत काहीं बाधें उरायला नको." आपण काय बोलत आहों याचें रामाजीपताला तरी तेव्हा भान होतें कीं नाही याची वानवाच. श्रीपतीला बेलभडार उचलावयाला लावून त्याला भाकेला गुतवून घ्यावयाचें, एवढाच त्याच्या मनातला हेतु तो साध्य होण्यासाठी त्यानें ही मिठास शद्बाची साखरपेर चालविली होती.

आणि श्रीपतीनें तरी लगेच बेलभडार उचलला तो सर्वस्वी रामाजी-पतावर विश्वासून उचलला असें मुळींच नाहीं उलट त्याचें कारणच शोधावयाचें तर—रामाजीपताच्या भयानेंच त्याच्या शद्बाला मान्यता देणें त्याला भाग पडलें. त्याला व्यक्तिशः रामाजीपताविषयी फारसा आदर अथवा विश्वास वाटत नव्हता. तथापि रामाजीपत कोंकणचा सुभेदार पडला, सत्ता त्याच्या हातीं व पेशव्याच्या दरबारी कोंकणपट्टीच्या बाबतींत तरी तो करील ती पूर्व, अशी स्थिति होती त्यासाठीं सर्व लोक भिऊन वागत तसा श्रीपतीही वागे. म्हणूनच त्यानें फारसा विचार न करता बेलभडार उचलून रामाजीपताचें समाधान केलें, व नंतर विचारलें, "मीं तुमच्या आज्ञेप्रमाणें बेलभडार उचलला. आतां तरी तुम्हाला ह्या खलित्याची फलश्रुति सागावयाला हरकत नाहींना?"

"हरकत काहीं नाहीं आणि नव्हतीही. दाखवू मी तुला खलिता वाचून? कीं मजकूर नुसता तोंडानेंच सागू? तू सागशील तसें करतों."

श्रीपतीच्या मनातून जरी तो खलिता वाचावयाचा होता, तरी

तो मी वाचणार असा आग्रह त्याच्याने धरवला नाहीं. त्यानें रामाजीपताला म्हटले, "सागा म्हणजे झाले."

"ऐक तर. श्रीमत पेशव्याचें मन फार दिवसापासून तुळाजी आंग्र्याविषयी जें विटले आहे, ते अद्यापि निवळलेलें नाहीं, आणि ते निवळणें शक्यही नाहीं."

"का? शक्य का नाही? सरखेलानीं इतक्या मनमोकळेपणाने समेटाची इच्छा दर्शविली असताही श्रीमताचें मन निवळणें शक्य नाहीं म्हणजे काय?"

"तें तुला इतक्यात कळावयाचें नाही. अनुभवाने कळेल. आज एक तुळाजी नरमपणाने वागू लागला, तरी तो त्याचा स्वभाव नाहीं. त्याच्या नेहमीच्या स्वभावाकडे दुर्लक्ष करून चालायला श्रीमत पेशवे तयार नाहीत."

"पेशवे तयार नाहीत तर —"

"माझें ऐक." श्रीपति आपल्या ताज्या सळसळत्या रक्तातील जोमानें लगाम तोडून पळणाऱ्या अवखळ वारूसारखा मर्यादेबाहेर जाऊ पाहत आहे असें दिसताच रामाजीपतानें त्याला तोंडचें वाक्य पुरें करू न देता म्हटलें, "पेशवे तयार नाहींत याचा अर्थ, त्याना तयार होता येणार नाही."

"का? त्याना भय कोणाचें?"

"त्याना भय इंग्रजाचें. इंग्रजानी ह्या मोहिमेंत साह्य केले, म्हणून तर आम्हाला सुवर्णदुर्ग जिकता आला, रत्नागिरीचा किल्ला जिकता आला! आणि आता आंग्र्याशी तह करावयाला इंग्रज काहीं तयार नाहींत. अशा स्थितींत कसें करावयाचें?"

"या बाबतींत मुंबईकर इंग्रजाची मनधरणी करणारा हा खलिता आहे काय?"

"मनधरणी असा त्याचा अर्थ नव्हे. राजकारणात नेहमींच दे वाण घे वाण करावें लागतें. इंग्रज कोणत्या अटीवर तह करावयाला तयार आहेत हें तरी नको का कळायला? नाही तर असें व्हायचें;

पेशव्यानी करार पाळला नाही म्हणून मुंबईकर इंग्रज नाराज व्हावयाचे, आंग्र्याचे गड कोट जे जिंकले गेले आहेत ते तेच सारे बळकावून बसायचे, आणि असें का असें पेशवे त्याना विचारू लागले की शत्रुत्व आले. मग आणखी असेही व्हायचा संभव कीं—आंग्रे आणि इंग्रज एक होऊन जर आमच्यावर उलटले, तर त्यांच्यासमोर आमचा टिकाव कसा लागणार?"

रामाजीपंत जें बोलत होता, तें आपलें सारें बुद्धिचातुर्य उपयोगात आणून बोलत होता. वास्तविक त्यानें तोंडानें जो मजकूर सांगितला त्यापेक्षाही निराळा व त्या दृष्टीनें भयंकर असा मजकूर त्या खलित्यात होता. बरें, एवढी जबाबदारीची कामगिरी श्रीपति गवळ्याला मुद्दाम बोलावून आणून त्याला सांगण्यातही त्याचा श्रीपतीविषयीचा अंदाज चुकला होता असें नाही. श्रीपति काय, त्याचा बाप जावजी गवळी काय, किंवा खड्डजी माणकर काय, हे पेशव्यांच्या बाजूने लढत असले तरी तुळाजी शिरजोरपणा सोडून समेटाला अनुकूल झाल्यापासून त्यांचा ओढा तुळाजीकडे जास्त आहे हें त्याला माहीत होतें. त्या साऱ्या आवळ्याची मोट बांधल्याखेरीज आंग्र्यांचा समूळ नाश करण्याच्या कामीं त्यांचा उपयोग आपणाला करून घेता येणार नाहीं हे ओळखून ही आवळ्याची मोट बांधण्याचा उद्योग रामाजीपंताने आरंभिला होता. एक श्रीपति आपल्या हातीं लागला, कीं जिकडे पुत्र तिकडे पिता या न्यायानें जावजी गवळीही हातीं लागेल, व जावजी गवळी हाती लागला की माणकराच्या मनातील विकल्प आपोआप दूर होईल, असा त्याचा हा डाव होता.

"पण इतकें, येरे कुत्र्या आणि खा माझा पाय, असें इंग्रजांच्या आहारी जायला श्रीमंत पेशव्याना सांगितलें होतें कोणीं? पेशवे आणखी अमळ सलोख्यानें व आपुलकीनें वागले असते, तर सरखेल त्यांच्याशी सरळपणें वागले नसते काय? आणि नसते वागले, तर त्याना ताळ्यावर आणायला आम्ही उपयोगी पडलों नसतों काय? असें पाहा, आज कोंकणपट्टीवर खरी सत्ता कोणाची आहे?"

"कोणाची आहे? आग्र्याची कीं पेशव्याची?"

"आग्र्याचीही नाही किंवा पेशव्याचीही नाही. खरी सत्ता तुम्हा आम्हा राजवटीच्या कर्तबगाराची आहे आणि आमची सत्ता म्हणजे तरी काय, तर रयतेचा आमच्यावरील विश्वास. आग्रे म्हणतील कीं या सर्व कर्तबगाराना गुडाळून ठेवून आम्ही हम् करोसो कायदा वागू तर तें शक्य नाहीं रयतेचा संतोष हीच धन्याच्या सत्तेची बळकटी होय. तुम्ही आम्हीं मनात आणले तेव्हा आग्र्याना मुलूख जिंकून त्याना हैराण करून सोडलेंच की नाही? आम्हाला न विचारता परक्या इंग्रजाना कोंकणपट्टीत आणून घुसविण्याचें पेशव्याना काय अडलें होतें, आता इंग्रज डोईजड झाले म्हणून ओरडतात ते?" श्रीपति पश्चात्तापाचा उसासा सोडून म्हणाला," मला काहीं ही लक्षणें ठीक दिसत नाहीत मला वाटतें, मी बेलभंडार उचलून फसलों."

"फसलों म्हणजे? आता तू वचनाला फिरणार काय? देवाच्या साक्षीनें बेलभंडार उचललास तो नरकात टाकणार काय? श्रीपति! तू जातिवंत मराठा आहेस. असले उद्गार जातिवंत मराठ्याला शोभत नाहींत." रामाजीपंत किंचित् खवळून म्हणाला. वाघ हलके हलके नखें बाहेर काढू लागला

"आणि जातिवंत ब्राह्मणाना मात्र असली कृष्णकर्मे शोभतात! इतके दिवस तुळाजी सरखेलाना आम्ही ब्रह्मछल केल्याबद्दल उगाच नावें ठेवली, व त्याच्याशी विरोध करून, त्याच्या मुलुखात पुंडावा करून त्याच्याशी उगाच वैर संपादन केले त्यानी ब्राह्मणाचा छळ केला, तें अगदीं यथायोग्य केलें तरी त्यानीं मी म्हणतों, काहीच छळ केला नाही. त्याच्या जागी मी असतों, तर त्याहीपेक्षा पाणी जाळलें असतें." असें म्हणून श्रीपतीनें तिरस्कारानें मान फिरविली.

रामाजीपंतही श्रीपतीइतकाच संतापला. यःकश्चित् एक आपल्या पदरचा शिपाई इतक्या उद्दामपणानें बोलू लागलेला पाहून, सबंध कोंकणपट्टीचा सुभेदारच काय पण सर्वाधिकारी असलेल्या व भाग्यानें ज्याला चांगलाच हात दिलेला आहे अशा, सर्वसमर्थ पुरुषाला संताप

आला नाही तरच आश्चर्य! तो डोळे वटारून श्रीपतीकडे पाहत गर्जून म्हणाला, " बस्स कर. आम्यानीं केलें तें बरोबर कीं चूक याचा विचार करायला आमचे धनी पेशवे समर्थ आहेत वाघाला रस्ता दाखविण्यासाठीं कावळ्यानें काव काव करण्याचें कांहीं कारण नाहीं. आज एक वेळ मी तुला ह्या उद्दामपणाबद्दल क्षमा करीत आहें. उच्छृंखल तरुणा ! तू हें विसरलास कीं तूं श्रीमत पेशव्याचा सेवक आहेस, स्वतः पेशवा नाहींस बेमुर्वतखोरपणें धन्याच्या कारभारात नसती ढवळाढवळ करणें हें स्वामिभक्तीचें लक्षण काय? पेशव्याना जर हा प्रकार कळला तर ते तुला तोफेच्या तोंडीं देतील. तू वडिलाचे नाव अशानें बुडवू पाहत आहेस. जावजीबाबा आजवर पेशव्याशीं एकनिष्ठपणें वागून मला त्याच्या हुकुमाबरहुकूम जिव्हाळ्यानें साथ देत आला, तो वेडा होता काय? त्या मुरलेल्या मर्दाला व मान्यतेच्या मुत्सद्याला पेशव्याचें जें धोरण पटलें, त्याची तू मुठीएवढा मुलगा अशी पायमल्ली करतोस? बापानें जीवाभावानें जो देव पुजला, त्या देवावर तू अशी लाथ मारतोस? एक वेळ मी सबूर करतों. आतां मला एक जबाब दे तू शपथ पाळणार कीं नाहीं? बेलभंडार उचललास त्याची प्रतिष्ठा राखणार कीं नाही?"

"मीं शपथ घेतली व बेलभंडार उचलला, मी फसलों—" श्रीपति न डगमगता म्हणाला.

"खबरदार ! ही तुझी दांभिकपणाची रडकथा मला ऐकावयाला नको आहे. माझ्या सरळ प्रश्नाचें सरळ उत्तर मला पाहिजे आहे. तू म्हणतोस कीं मी फसलों—"

"खरोखरच फसलों शपथ घेऊन आणि बेलभंडार उचलून मी भाकेला गुतून पडलों. आता यातून माझी सुटका नाहीं. मी जातिवत मराठा आहें, मी माझ्या वचनाला बाट प्राणातींही लावणार नाहीं हें जरी खरें—"

"आता बरोबर बोललास. अगदीं जातिवत मराठ्यासारखें बोललास. जावजीचा सुपुत्र तू आता मात्र शोभलास खरा. आतां

अवांतर काय बोलावयाचें तें खुशाल बोल." असें म्हणून किंचित् शांतपणें रामाजीपत गाभाऱ्यातील चौरगावर बसला.

"अवातर मला काहींच बोलावयाचें नाहीं. बोलायला मला आता तोंडच उरलेलें नाहीं. कन्या देऊनिया कुळ मग काय विचारावें? एकदा वचनाची बेडी हातापायात ठोकून घेतल्यावर हातपाय अवघडले म्हणून कुरकुर करण्यात काय अर्थ? पण सुभेदार! कौपिनेश्वराला स्मरून सागा, पेशव्याच्या जागीं जर तुम्ही पेशवे असता, तर घगात भाऊबदकी माजली म्हणून घरावर असा जळता निखारा ठेवून त्यावर तुम्हीं तेल ओतलें असतें काय?"

"गड्या! तू मला हा फार अवघड प्रश्न विचारलास. याचें उत्तर मी कोणत्या तोंडानें देऊ? मी तुझ्याशीं यावेळीं बोलत आहें हा रामाजीपत बिवलकर बोलत नसून श्रीमत पेशव्याचा आज्ञाधारक सेवक बोलत आहें. सेवकानें 'मी'पणा पूर्णपणें विसरून सेवाधर्माचें पालन करावयाचें असतें. म्हणूनच म्हणतात कीं सेवाधर्म हा योग्याना ही अगम्य असा परमगहन आहे. नाहींपेक्षा तूच विचार कर, आंग्र्याशीं माझी दावेदारी थोडीच आहे? तुळाजी आंग्र्यावर शस्त्र धरून त्याचा जो मुलूख किल्ले–कोटासह जिंकून आजवर मीं मराठशाहींत सामील केला, तो माझ्या पुत्रपौत्राना थोडाच मिळणार आहे? आणि कुठले कोण सहस्त्रावधि कोशावरून आलेले गोऱ्या पायाचे इंग्रज, त्याच्याशीं तरी माझा व्यक्तिशः काय सबध? त्याच्यापासून मला अशी कोणती दौलत मिळावयाची आहे? तसें पाहू जाता आंग्रेच आम्हाला इंग्रजापेक्षा व पेशव्यापेक्षाही जवळचे." रामाजीपत लाथ मारून पुन्हा नमस्कार करण्याचे डावपेंच बोलू लागला.

"अगदीं बरोबर बोललात. आंग्रे आमचे खरे धनी, आमचे मायबाप खरें पाहिलें असता ते. त्याच्याविरुद्ध आम्हीं शस्त्र उचलणें व शत्रूला सामील होणें, म्हणजे स्वामिद्रोहाचें महत्पातक जोडणेंच नव्हे काय?"

"एथें मात्र तू चुकतो आहेस."

"काय चुकतों? आग्रे आमचे धनी नव्हेत? तुमचेही धनी मूळचे आग्रेच नव्हेत? छत्रपति थोरल्या आबासाहेबाच्या मनगटाला मनगट भिडवून ज्या मराठ्यामावळ्यानी गोब्राह्मणप्रतिपालनार्थ आपल्या हाडाच्या विटा व रक्ताचा चिखल करून मराठी स्वराज्याचा पाया घातला, त्यापैकीं आग्रे घराणें प्रमुख होय, व तुम्ही आम्ही सारे त्याचे पायिक आम्ही पेशव्याच्या अथवा फिरग्याच्या कमरेचे थोडेच आहोंत? मीं म्हटले यात माझे काय चुकलें सागा "

गणूजीनें श्रीपतीचे ते बाणेदारपणाचे उद्गार ऐकून सतोषपूर्वक स्वतःशी म्हटले, "शाबास! याला म्हणतात अस्सल मराठी पाणी. लक्ष्मी! पोरी! तू खरोखरच मोठी भाग्याची आहेस, म्हणून देवानें असला तेजस्वी वीर तुला पति योजून दिला आहे."

"काय चुकलें सागू?" रामाजीपत उजवी माडी डाव्या माडीवर टाकून आरामशीर बैठक मारून म्हणाला, "तुम्ही सेवक आग्र्याचे व आग्रे सेवक छत्रपतीचे, हे तर खरें?"

"अर्थात्! तो सेवाधर्म आग्र्यानी कधीच सोडला नाहीं."

"माझें ऐक. पेशवेही छत्रपतीचेच सेवक ना?"

"पेशवेही छत्रपतीचेच सेवक खरे पण शाहू छत्रपतींनीं देह ठेवताना आपले सर्वाधिकार पेशव्याना दिले असल्यानें आता त्याची सेवाच आम्हाला करावयाची. आग्र्यानींही पेशव्याना मानावयाला हवें."

"आग्र्यानी पेशव्याना का म्हणून मानावें? आग्रे मराठशाहीचे एक पिढीजाद कारभारी आहेत व पेशवे कालपरवाचे आहेत. सास्वे पेक्षा सुनेचा मान मोठा काय? त्या सुनेला एवढें कळत नाहीं कीं आपली सासू पुत्र प्रसवली म्हणून आपण ह्या घरात आलों सून जर काल मेली आणि आज पितर झाली अशा थाटाने सासूचीही सासू बनू लागली–"

"जर आणि तर कशाला? कालची सून खरी, पण सास्वेच्या लेकाला मुठीत ठेवून बाईलवेडा बनवून सोडते ना? आणि सासूचीही

सासू बनून राहते ना? त्याला कोण काय करणार? तसेंच पेशवे जरी उपरे असले, तरी ते राजवटींत आले, छत्रपतीचे आवडते झाले, पराक्रमाच्या व चातुर्याच्या जोरावर पेशवे झाले, आणि आज तर छत्रपतीच्या मराठी साम्राज्याला जग मराठशाही अथवा हिंदुपद-पादशाही म्हणून ओळखण्यापेक्षा पेशवाई अथवा पेशवेपदपादशाही म्हणूनच ओळखतें आहे आग्रे आणि पेशवे याच्या चुरशीत अमुक एक बरोबर अथवा अमुक एक चूक असें आपण सेवकानी कसें म्हणावें मला साग बरें! दागिना हिणकस दिसला तर त्यात कांही गुण सोन्याचा असतो आणि काही सोनाराचा असतो एका हातानें टाळी कधींच वाजत नाही जाळणें हा अग्नीचा धर्म असला तरी त्याला ज्वालाग्राही पदार्थाची जोड मिळाल्याखेरीज नुसत्या दगड-धोंड्याची आग पेटून निखारे थोडेच पडणार आहेत! पण आपणाला त्या भानगडी घेऊन काय करायच्या आहेत! आपण पडलों हुकुमा-चे चाकर. बरें, जा तू लौकर आता!" असें म्हणून रामाजीपतानें प्रथम नदादीपाच्या वाती विझू लागल्या होत्या त्या सारून तेवत्या केल्या, व एका वातीवर लाखेचा तुकडा धरून त्या कटत्या लाखेची मोहोर लखोट्यावर करून तो लखोटा श्रीपतीच्या स्वाधीन केला. श्रीपतीनें विपण्ण हृदयानें तो लखोटा हातीं घेतला तेव्हा त्याचे हात भीतीनें थरथर कापत होते

यावेळी बाहेर उजाडलें होतें, व संधिप्रकाश हळूहळू मंदिरातही फांकू लागला होता. आपणाला रामाजीपंत पाहणार तर नाही ना, या भयाने गणोजी हलक्या चोरट्या पावलानी भितीसरपट रामाजी-पंत बाहेर येण्यापूर्वीच कोंपऱ्यातील व्यासपीठामागे जाऊन लपून बसला होता

"इतकी थंडी वाजते का? थंडीनें म्हाताऱ्यासारखे तुझे हात कापतात?" रामाजीपंतानें पळीपंचपात्री घेउन गाभाऱ्याबाहेर येता येता उगाच काही तरी विचारावयाचे म्हणून श्रीपतीला विचारलें.

"नाही सुभेदार! थंडीने माझे हात कापत नाहीत, तर पापाच्या

भयानें त्याना कापरें भरलें आहे. आग्रे कसे झाले तरी आमचे धनी, त्याच्या मानेवर आधारात घाव घालण्यासाठीं मुबईच्या परक्या गोऱ्याचे पाय मराठशाहींत पुन्हा रुजत घालणाऱ्या ह्या विषारी पत्राच्या स्पर्शानें ह्या हाताना भय वाटून कापरें सुटलें आहे "

रामाजीपत अर्ध्या सभामडपात आलेले तेथेंच थबकून मागें वळून पाहत म्हणाले, "तुझ्या हातून नसेल होत, तर दुसऱ्याला सागतों."

श्रीपति म्हणाला, "तें काही असलें तरी ज्या अर्थी मी भाकेला गुतून पडलों आहे, त्या अर्थी ही कामगिरी पार पाडीनच. त्याविषयीं कोणाला काळजी नको. पण सुभेदार! यापुढें मात्र माझी तुम्हाला दोन्ही हात जोडून अशी प्रार्थना आहे की असलीं पापें पुजण्याचा लाजिरवाणा सेवाधर्म माझ्या वाटणीला पुन्हा येऊ नये."

"ठीक आहे. ठीक आहे पुन्हा नाही असली कामगिरी तुझ्या वाट्याला येणार मग तर झालें ना?" असें म्हणून रामाजीपत पुढें चालू लागला तो बाहेर गेला, तेव्हा पहारेकऱ्याला बाजूला घेऊन हळूच म्हणाला, "कोणी आलें नाही ना?"

ती कुणकुण ऐकून गणोजी हळूच जाऊन दरवाजाच्या आड उभा राहिला.

"गणोजी माने आला होता."

"कशाला?"

"श्रीपतीला भेटायला. श्रीपति त्याचा भावी जांवई आहे असें तो म्हणत होता, व आज त्याला आपल्या घरीं मेजवानीला बोलावणार होता."

रामाजीपताच्या डोक्यात तेव्हां निराळाच विचार घोळत होता. त्याला श्रीपतीचा आता अधिकाधिक अविश्वास वाटू लागला होता. 'त्यानें जर आपली कामगिरी नीट बजावली नाही, वेळीच बाण कोटावर इग्रज अधिकाऱ्याना आग्रे व पेशवे याचें सख्य होण्याचा रग आहे हें कळलें नाहीं, तर ते तिकडे स्वस्थ राहतील, इकडे एकी होऊन जाईल, आणि आपल्या स्वार्थावर पाणी पडल्यासारखें होईल.

त्यापेक्षा ही बातमी इंग्रजाना कळविण्याची नवी काही योजना केली पाहिजे, व श्रीपतीचा ताबडतोब परस्पर काऱ्यानें काटा या कानाचें त्या कानाला न कळता निघाला पाहिजे. आपला संशयही कोणाला येतां कामा नये ' असें स्वतःशीं उद्गारून त्यानें श्रीपतीच्या नाशाची काहींतरी योजना मनात आखून तिची अमलबजावणी करण्यासाठी धनाजीला आपणाबरोबर बोलावून घेतलें ते दोघेही दृष्टीच्या टप्प्या-पलीकडे गेलेले पाहून गणोजी श्रीपति उभा होता तिथें आला तों श्रीपति देवासमोर गुढगे टेंकून बसला होता. मोहरबंद लखोटा त्याच्या पुढ्यात पडला होता. गणोजीनें हलकेच तो लखोटा उचलून घेतला, तरी श्रीपतीला त्याची दादही नव्हती

"ह्या मुलाचे अंतःकरण शपथेला गुतल्यामुळें करू नये ते करण्याचें कपाळी आलें म्हणून दुःखाने होरपळत आहे." असें स्वतःशीं बोलत गणोजीनें श्रीपतीला हाक मारली, "श्रीपती !"

श्रीपतीनें एकदम भानावर येऊन विचारलें, "कोण ?" तेवढ्यात त्याला गणोजीच्या हातातला तो लखोटा दिसला त्याबरोबर त्यानें एका झडपेसरसा तो लखोटा गणोजीच्या हातून हिसकावून घेतला, व त्रासून त्याला विचारलें, "म्हातारड्या ! थेरड्या ! देवाच्या द्वारीं येऊन चोरी करतोस, तुला शरम नाहीं वाटत ?"

## प्रकरण पाचवे

## व्याघ्र आणि हरिणी

त्या एका अपशद्वासरशी अपमानाची तिडिक गणोजीच्या मस्तका ला जाऊन झोंबली वास्तविक श्रीपतीनें त्याला न ओळखता तो शद्व उच्चारला होता पण गणोजीला वाटले की यानें जाणुन बुजून आपला अपमान केला त्यामुळें आपली ओळख आपल्या भावी जावयाला एकदम पटली नाहीं तर आपणच करून द्यावयाची व त्याला आपल्या घरी आज मेजवानीला बोलवावयाचे, त्यानें रामाजी-पतासमोर जातिवत मराठ्याला शोभेसा बाणेदारपणा दाखविल्याबद्दल त्याची पाठ थोपटावयाची व त्याला हिताचे दोन शद्व सागावयाचे, वगैरे त्याचे सर्व मनातले माडे मनातच जिरले. आणि त्याच्या ठायीं उत्कठतेनें वसणारी मराठमोळ्याची स्वाभिमानी वीरश्री विद्युत्पाता-सारखी उसळू लागली. आपली नवीन भावी नात्याची ओळख देण्याची ही वेळ नव्हे, असें ठरवून तो आवेशानें हातातील सोंटा उगारून श्रीपतीवर धावून गेला आणि म्हणाला, "नीचा! शरम मला वाटावयाची, की देवाच्या द्वारी फदाफितुरीचे नष्ट कर्म कर-णाऱ्या तुला? फेंक अगोदर तो लखोटा बाजूला, आणि एथवर मनानें केलेल्या पापाबद्दल मन:पूर्वक कौपिनेश्वराची क्षमा मागून एथून काळें कर कसें!"

इतक्यात धनाजी तेथें येऊन पोंहोंचला. तो त्या दोघाची बाचा-बाच ऐकत थोडा वेळ दारात उभा होता. अखेर गणोजीनें मनस्वी चिडून आपल्या हातातील सोंटा श्रीपतीच्या टाळक्यात हाणण्यासाठीं जोरानें फेंकला. तेव्हा श्रीपतीनें तो घाव चुकवून अशी जोराची एक

लाथ गणोजीच्या छातीवर हाणली कीं त्या लाथेसरसा तो बेशुद्ध होऊन खालीं पडला.

श्रीपतीनें बाहेर जाता जाता धनाजीला सांगितले, "हा कोण थेरडा आहे त्याचा नीट तपास कर, आणि सुभेदारापाशी याला नेऊन याचा नीट बदोबस्त करायला साग. त्याना म्हणावें, यानें चोरून मदिरात शिरून आपलें सभाषण ऐकलें असलें पाहिजे. हा मोकळा सुटला तर सुभेदाराच्या कारस्थानाची गावभर ओरड करण्याला कमी करणार नाही "

एवढें सागून श्रीपती बाहेर निघून गेला, तो लगेच आपल्या घोड्यावर स्वार होऊन घोडा फेकीत निघाला धनाजीला वास्तविक श्रीपतीचा पाठलाग करून रामाजीपतानें सागितल्याप्रमाणें त्याची बातमी काढावयाची होती खरी परतु प्रत्यक्ष सासऱ्याला सासरा न म्हणणाऱ्या श्रीपतीवर आणखी नजर ठेवण्याची आवश्यकता आहे असें त्याला वाटेना. शिवाय गणोजीने मदिरातील सभाषण चोरून ऐकल्याचें श्रीपतीनें त्याला बजावून सागितलें असल्यानें त्या गुन्हेगाराला मोकळा सोडून श्रीपतीच्या मागोमाग जाणेंही त्याला इष्ट वाटलें नाहीं. मात्र थोड्या वेळापूर्वीच गणोजीने श्रीपती हा आपला भावी जावई असें सागितले काय आणि तो जावई त्या सासऱ्यावर आग पाखडतो काय, हे त्याला कळेना.

सुमारे पाव घटका झाली, तरी गणोजी बेशुद्धच होता इतक्यात लक्ष्मी दूध घेऊन तेथें आली बापाची ती शोचनीय अवस्था पाहून कुठचें काय आणि कुठचे काय, तिनें दुधाची पचपात्री तशीच खालीं ठेवली व बापाच्या गळ्याला मिठी मारून दुःखानें किंचाळी फोडली.

"इतकी भिऊ नकोस लक्ष्मी! गणोजी लौकरच शुद्धीवर येईल." असें परोपरीनें सागून धनाजी तिचें शातवन करू लागला. पण तसल्या शातवनानें तिच्या मनाचें समाधान थोडेच होतें!

"कोणा चाडाळानें हें नीच कृत्य केलें? कोणींहो माझ्या बाबांना मारलें? देवा! देवा! आता मी कायरे करू?—सागारे कोणी तरी,

कोणा दुष्टानें माझ्या बाबाचा असा घात! केला सागा मला त्या मागाचें नाव त्या राक्षसाच्या नरडीचा मी घोट घेत्यें." असा विलाप लक्ष्मीनें एकसारखा चालविला. तिच्या गगनभेदी करुण किंचाळ्यानी सारे देवालय हादरून गेलें हा हा म्हणता लोकाची गर्दी देवालयात जमू लागली. जो तो गणोजीची ती अवस्था पाहून चिडून गेला, व त्वेषानें गणोजीवर हात टाकणाऱ्या माणसाची चौकशी करू लागला यावेळीं आपण श्रीपतीचे नाव सागितल्यास खवळलेले गावकरी त्याचा पाठलाग करून वेळीं त्याचा खूनही करावयाला कमी करणार नाहीत असें पाहून पहारेकऱ्यानें तोंडात मिठाचा खडा धरला होता. पण गणोजी अमळशानें शुद्धीवर आला व त्यानेंच आपल्या मारेकऱ्याच्या नावाचा परिस्फोट केला तेव्हा पहारेकऱ्याचा नाइलाज झाला

"पोरी!" गणोजीनें शुद्धीवर येताच लक्ष्मी जवळ रडत बसलेली पाहून तिच्या गळयाला मिठी मारून विचारलें, "तो हरामखोर नीच कुठें गेला?"

"लक्ष्मीनें आपल्या कोमल हातानीं गणोजीचें मस्तक आपल्या माडीवर सावरीत रडत रडत विचारलें, "कोणीं बाबा! तुमचा घात कोणी केला सागा."

"तो नीच–तो मात्रागमनी श्रीपति गवळी–लक्ष्मी! ज्या सर्पाच्या सोनेरी कातीला भुलून मीं त्याला तुला देऊ केली होती! तोच सर्प मला डसला—" तोंडचें वाक्य पूर्ण होण्यापूर्वीच म्हाताऱ्याला रक्ताची गुळणी आली.

अमळशानें थोडें पाणी धनाजीनें आणून दिलें तें लक्ष्मीनें गणोजीच्या मस्तकावर शिंपलें, तोंडात पाण्याचे चार थेंब घातले, तेव्हा गणोजीला अमळ हुषारी आली. विझता दिवा जरा वात सारताच मोठा झाला. गणोजी हुषारी येताच पुन्हा लक्ष्मीला म्हणाला, "लक्ष्मी! लक्ष्मी! मी तर आता बहुधा वाचत नाहीच. देवाघरचें बोलावणें आलें आहे तें मला परतून लावता येणार नाहीं. पण माझ्या मागें–अभागी

पोरी ! तू एकटी !—ना भाऊ ना बहीण, ना आई ना बाप अशी तू उघड्यावर पडणार, त्या तुझें पुढें कसें होईल या चितेनें माझ्या हृदयाचें ह्या मरत्या घटकेलाही पाणीपाणी होत आहे ससाराची श्रीमती तुला प्राप्त व्हावी म्हणून मीं जो हिरा शोधून काढला, तो असा गारगोटीचा दगड निपजला, आणि तो दगड माझ्या कपाळात पडून मला ठार करीत आहे माझ्या मरणाचें मला काहींच वाटत नाही पिकलें पान आज नाही उद्या गळून पडायचेंच तसा मेलों असतों तो असा मरतों आहें; उद्या ओढवणारे मरण आज ओढवत आहे. बाकी, यातूनही चागलें शोधून काढावयाचें तर मरणाच्या मोलानें का होईना पण अनुभव मिळाला तो जगण्यापेक्षाही जास्त मोलाचा आहे. मी आजवर जगलों तो तुझ्यासाठी, आणि पोरी ! आज मरत आहे तोही तुझ्याच कारणें मरतो आहे जावजी गवळ्या-च्या घराण्याशीं तुझी सोयरीक मीं ठरविली नसती, तर त्याचा हा पोर स्वामिभक्त असला काय किंवा स्वामिद्रोही असला काय, मला त्याच्याशीं काय करायचें होतें? तो आजच मेला काय किंवा शभर वर्षें जगला काय, मला त्याची काय पर्वा होती? मग त्याला भेटायला मी एथवर येऊन थाबलों असतो कशाला, आणि त्याच्या बऱ्या-वाइटाची कळकळ तरी कशाला बाळगली असती? पण ईश्वरी योगा-योग हा असा होता. ज्याच्याशी माझ्या एकुल्त्या एका मुलीचें लग्न होऊन तिची वशवेल वाढावी अशी माझी इच्छा, त्याच्याच हातून मला मरण यावें असा ईश्वराच्या घरचा नेमानेम होता. त्याला काहीं इलाज नाही. मात्र लक्ष्मी! तुला माझें अखेरचें सागणें इतकेंच कीं मी जरी मेलों तरी तू त्या चाडाळाशीं लग्न करू नको, माझ्या वैऱ्याची बाईल होऊ नको. वाटेल त्या रस्त्यावरच्या भिकाऱ्याची बाईल हो, कुलशील पाहून कोणाशींही लग्न कर, पण जावजी गवळ्याच्या घरा ण्याशी सबध आणशील तर तुला माझ्या गळ्याची शपथ!. . ”

पुन्हा गणोजीला रक्ताची गुळणी आली, व त्या गुळणीसरसा त्याचा शक्तिपातही झपाट्यानें झाला. तरीही अगीं होतें नव्हतें तेवढें बळ

जिव्हेंत एकवटण्याची शिकस्त करून तो म्हणाला, "आणखी एक कामगिरी मी तुझ्यावर सोंपविणार आहें" त्यानें सभोंवार नजर फिरवीत विचारलें, "इथे कोण कोण आहेत?"

"मी आहें गणोजीबाबा!" धनाजी पुढें येऊन म्हणाला.

"तू आहेस? तू धनाजी बागवा? तुला घेऊन काय कापायचें आहे! धन्याचा ठाणबदी कुत्रा तू! तुझ्याशीं विश्वासानें मी बोलू तरी कसा? पण तू माझ्यावर एक उपकार करशील का?"

"काय करू बोला?" तेव्हाच धनाजी 'कुत्रा' म्हटल्याबद्दल मनात चिडून स्वतःशी म्हणाला, "हा ठाणबदी कुत्रा तुला आणि तुझ्या लेंकीलाही डसेल तेव्हाच समजेल"

"इथून अमळ दूर जा, आणि एथल्या सर्व मडळीला जरा देवालयाबाहेर जावयाला साग. मला माझ्या पोरीशी चार शब्द खासगी बोलायचे आहेत. ते तिसऱ्या कोणी ऐकू नयेत अशी माझी इच्छा आहे. एवढी माझी मरणवेळेची इच्छा तुम्ही सारे लोक पूर्ण कराल का?"

"आमची काही हरकत नाही." असें म्हणून पण मनातल्या मनात दात चावीत धनाजीनें देवालयातील सर्व मडळीला बाहेर जावयाला सागितलें, व कोणी आत येऊ नये म्हणून पण शक्य तों गणोजीचें बोलणें ऐकू यावें या इराद्याने तो मुख्य दरवाजाबाहेर उभा राहिला.

तोंच "धनाजी! जरा इकडे ये" अशी गणोजीने अकस्मात् हाक मारली यानें एकाएकी का हाक मारली हे धनाजीला व लक्ष्मीलाही एक कोडेंच पडलें

"काय सागणें आहे गणोजीबाबा?" धनाजीनें जवळ येऊन विचारलें. त्याच्या मनात द्वेषाग्नि धुमसतच होता.

"लोक सारे दूर गेले?"

"बाहेर गेले"

"जरा दरवाजा लावून घेशील?"

"आणि काय करू?"

"अगोदर दरवाजा लावून घे."

म्हातारा काय सांगतो तें ऐकावें तर खरें, अशा हेतूनें धनाजीनें देवालयाचा दरवाजा लावून घेतला.

"गाभाऱ्याच्या उंबरठ्यावर बेलभंडार आहे तो घेऊन ये." गणोजी म्हणाला लक्ष्मी बुचकळ्यांत पडली, "याच्या मनांत आहे तरी काय?"

"तू रामाजीपंताचा नोकर आहेस, हें विसरून मी सांगेन तसा वागूं शकशील काय?"

धनाजी कांहीं उत्तर देईना लक्ष्मीही बुचकळ्यांत पडली.

"इतकी चिंता कसली त्यांत? मी तुला अन्यथा असें कांहींच करावयाला सांगणार नाहीं तुझ्या मानीपणाला व नेकजात मराठे-पणाला शोभेल असेंच कृत्य करावयाला सांगणार आहें. आणि त्या-बद्दल तुझ्या ध्यानीमनींही नसेल एवढें मोठें बक्षीस मी तुला देणार आहें इतका माझ्यावर विश्वास ठेव"

लक्ष्मीनें त्याला म्हटलें, "बाबा! तुम्हांला बोलून उगाच जास्त श्रम होतील. तुम्ही स्वस्थ पडून राहा ना!"

"स्वस्थ पडून राहून परमेश्वर मला आतां गरुडाचें आयुष्य थोडेंच देणार आहे? त्यापेक्षां चार क्षण काय बाकी असतील ते निरवानिरवीच्या सत्कारणीं लावले तर सुखासमाधानानें प्राण तरी सोडतां येतील—धनाजी! तू देखील ह्या मानभावी ब्राह्मणाच्या देवडीवर माश्या मारीत बसला नसतास, कांहीं हातपाय हलविले असतेस, तर आजला श्रीपती गवळ्यापेक्षां थोर शिपाईगडी शोभला असतास श्रीपती तरी कांहीं आकाश फोडून खालीं उतरलेला नाहीं."

"गणूजीबाबा! पराक्रमाला संधी लागत असते" धनाजी म्हणला. बोलतां बोलतां साधेल तेवढा स्वार्थ त्याला साधावयाचा होता.

"ती संधी तरी त्यानें निर्माण करावयाची असते. तशी संधी निर्माण करण्याला अवसर तुला मी देतों. त्याचा तू योग्य फायदा घेशील का?"

"का घेणार नाहीं?" धनाजी म्हणाला. त्याला गणोजीच्या एथवरच्या संभाषणावरून ठामपणें वाटू लागलें होतें, "गणोजी आपणाला घरजावई करणार आहे. त्यानें आपणाला ठाणबदी कुत्रा म्हटलें ते केवळ कौतुकानें म्हटलें असेल" आणि गणोजीचा विचार प्रथम खरोखरच तसा होता. पण लक्ष्मी मध्येंच बोलली, त्यात तिच्या मनात वसणारी धनाजीविषयीची परकेपणाची वृत्ति त्याला स्पष्ट दिसून आल्यानें तेंच मनोगत जरा मुरड घालून प्रगट करण्याच्या हेतूनें तो आता बोलत होता.

"मग उचल तर तो बेलभडार" गणोजी म्हणाला.

"लक्ष्मीसारख्या सुदर नक्षत्रमुलीला अर्धांगी करण्यासाठीं मी एकादा सोडून दहादा बेलभडार उचलीन त्यात काय आहे? बेलाचें तिकटें आणि हळदीची चिमूट! म्हाताऱ्याला म्हणावें, सबध बेलाचा वृक्ष व हळदीचें पोतें उचलावयाला सागितलेंस तरी तें उचलीन, आणि एका खाद्यावर तें ओझें व दुसऱ्या खाद्यावर लक्ष्मीसारख्या हलक्या फुलाचें ओझें लादून गरुडासारखा भरारी मारीत एथून निघून जाईन. बिवलकराची आणि पेशव्याची इतकी कुलगडी माहीत असल्यावर आग्ऱ्याकडे जाऊन चागल्या बाजारभावानें मला त्याची विक्री करून गबर होता येणार नाहीं इतका का मी नामर्द आहें?" असें मनात म्हणत त्यानें गणोजीसमोर बेलभडार उचलला.

"म्हण, मी आग्ऱ्याशीं—माझ्या मूळच्या धन्याशी बेइमानी करणार नाहीं व दिल्या वचनाला बाट लावणार नाही."

धनाजीने तसें म्हटलें

"यात अतर करीन तर माझे बेचाळीस पूर्वज नरकात पडतील म्हण."

धनाजीनें तसेंही म्हटलें.

"शाबास! आता या क्षणापासून तू माझा धर्मपुत्र झालास. माझ्या मृत्यूनतर माझें क्रियाकर्मांतर तू करावें आणि माझ्या दौलतीचा अर्धा वाटा घ्यावा. राहिलेला अर्धा वाटा माझ्या लक्ष्मीचा.

मात्र हा वाटा घेण्यापूर्वी तू एक कामगिरी केली पाहिजेस. मी मेल्यावर मला भडाग्नि मिळाला व माझी उत्तरक्रिया करावयाची राहिली तरी चालेल. पण त्यापेक्षा महत्त्वाची कामगिरी एक तुला—आणि लक्ष्मी, तुलाही सांगतों. गवळी काय, माणकर काय, रामाजीपंत बिवलकर काय, सर्वच मुंबईकर इंग्रजांना फितूर आहेत, व पेशवे त्यांचे पाठीराखे आहेत. ही चांडाळचौकडी मिळून तुमचा सत्यनाश करावयाला टपून बसली आहेत अशी सावधगिरीची सूचना तूं तावडतोब तुळाजी सरखेलांना जाऊन दे. तेंही काम एक दिवस उशिरा केलेंस तरी चालेल पण श्रीपति माणकर बिवलकरी खलिता घेऊन मुंबईला जावयाला निघाला आहे, त्याला मार्गात गाठून ठार करून झाला तरी तो खलिता हस्तगत करून घे, आणि तो सरखेलांकडे पावता कर बिवलकरांनी तुला श्रीपतीवर नजर ठेवण्याला सांगितलेंच आहे. यास्तव हें काम तुला हसत खेळत करता येईल.''

''आणि लक्ष्मी?'' आतातरी आपल्या व लक्ष्मीच्या लग्नाविषयीं म्हातारा कांही बोलेल या आशेनें धनाजीनें विचारलें.

''लक्ष्मीला तुळाजी सरखेलांकडे पावती करून दे. तिची जर तुझ्याशीं लग्न करण्याची इच्छा असली तर माझी त्याला हरकत नाहीं. नाहींपेक्षा सरखेल तिच्या कल्याणाची काळजी वाहायला समर्थ आहेत त्यांना माझा निरोप सांग म्हणजे झालें तुला बहीण नाहीं आणि तिला भाऊ नाहीं आता तू तिचा पाठीराखा भाऊ आणि ती तुझी धाकटी बहीण.'' गणोजी लक्ष्मीकडे वळून मोठ्या कष्टानें उद्गारला, ''लक्ष्मी! तुला मी पुन्हा पुन्हा सांगतों, पोरी! तू कोणाशीही लग्न न करता तशीच मेलीस तरी पुरवेल. पण आंग्र्यांच्या कोणा शत्रूशी लग्न करून वैऱ्याचा वंश मात्र वाढीला लावू नकोस. त्यापेक्षा ह्या गणोजी पडवळाचा अजिबात निर्वंश झालेला पुरवला.'' इतकें बोलून गणोजी श्रमामुळें अत्यंत शक्तिपात झाल्याकारणानें पुन्हा निश्चेष्ट पडला.

'इतका प्रकार देवालयात होत आहे, तोंच देवालयाचा दरवाजा

एकदम उषडला गेला. एक गांवकरी घाईनें आंत येऊन धनाजीला म्हणाला, "धनाजी! सुभेदार गणोजी मान्यावर चिडले आहेत. आता इतक्यातच गणूजी आणि लक्ष्मी या दोघांनाही कैद करण्यात येईल असें दिसतें."

"कशावरून?" लक्ष्मीनें विचारलें.

"आतांच एकाच्या तोंडून मीं असें ऐकलें." गावकरी म्हणाला.

"कोणींतरी चुगली केली असावी. लक्ष्मी! तूं या क्षणीं इथून बाहेर निघून जा कशी! अगोदर बाहेर जा." असें धनाजी म्हणाला. पण तें निव्वळ मानभावीपणाचें होतें. वस्तुतः त्यानेंच लक्ष्मीच्या अभिलाषानें सुभेदाराच्या मनांत तसें किल्मिष भरवून दिलें होतें. कोणाची पेटे दाढी आणि कोण पेटवी विडी या न्यायानें ह्या वावटळींत लक्ष्मी पंखाखालीं घालता आली तर घालण्याचा त्याचा हा सारा डाव होता. श्रीपतीच्या नाशाची जबाबदारी देखील त्यानें नुक्तीच आपल्या शिरावर घेतली होती त्याचें कारण तरी हेंच होय.

"कुठें जाऊं! ह्या फाटलेल्या आकाशाला ठिगळ कुठें लावूं! आता माझी धडगत नाहीं. मला राघोजीपताची कीर्ति माहीत आहे. त्याच्या तावडींत सांपडलेल्या स्त्रिया निष्कलंक सुटल्या असें आजवर कधींच झालें नाहीं. तशांत आज मी त्याची वैरीण ठरल्यें आहें. मला लपायला अथवा पळायला तरी जागा कुठें आहे! त्यापेक्षां धनाजी! तू एक उपकार कर."

"काय करू!" धनाजीनें म्हटलें, "धन्यांचा जरी तुझ्यावर इतका रोष झाला आहे, तरी तुझ्या निर्दोषीपणाचा मीं निर्वाळा दिल्यावर ते माझें ऐकणार नाहींत असें नाहीं. मी माझी सारी पुण्याई खर्च करून तुला जीवदान द्यायला लावीन. त्याविषयीं तूं मुळींच चिंता करू नकोस."

लक्ष्मीचा तरी धनाजीवर विश्वास कुठें होता! जसा धनी तसा त्याचा नोकर! त्याचें ऐकणें म्हणजे आगींतून उठून फोफाट्यांत पडणें आहे असें तिला वाटलें. तिनें क्षणभर धावऱ्या झुबऱ्या नजरेनें उभौंवार

पाहिलें. तों तिच्या मनात एकाएकीं काय आलें नकळे, ती देवाच्या गाभाऱ्याकडे धावत गेली. ती देवाला विटाळ होईल वगैरे कांहीं-देखील विचार न करता थेट गाभाऱ्यात घुसली. तेवढ्यात सभा-मंडपाचा दरवाजा उघडून दहा सशस्त्र सैनिक आत घुसले. आतां आपल्या पित्यावर ओढवणारा प्रसंग टळत नाहीं अशी लक्ष्मीची खात्री होऊन चुकली. पण बाहेर येण्याचें साहस तिला होईना. ती एकटी. तशात लहानसा खंजीरदेखील जवळ नसल्यामुळें अगदीं दुबळी. ती बाहेर येऊन काय करणार? सशस्त्र शिपायांशीं ती काय झगडणार? कांटेरी कुंपणावर रेशमी वस्त्र पडून फरफटलें कीं त्याच्या चिंध्याच व्हावयाच्या कीं नाहीं?

## प्रकरण सहावें

# कुठें आणि कां?

पण गाभाऱ्यात तरी लक्ष्मी भिऊन दडून बसली होती असें मुळींच नाहीं. भिण्यानें अथवा दडून बसण्यानें आपलें रक्षण होणार नाहीं; वेळीं जीविताचें रक्षण झालें तरी अब्रूचें रक्षण होणार नाहींच नाहीं, हें ती पूर्ण ओळखून होती. ' रामाजीपताचा कारभार म्हणजे बोलून चालून कावळ्याचा दरबार. त्या दरबारात जे कोणी सज्जन स्त्री-पुरुष जातील, त्याना कावळ्याच्या आवडीचे अपवित्र पदार्थच मिळावयाचे व त्याच कावळ्याकडून बोंचून खाल्लें जाण्याचा प्रसग त्या स्त्रीवर अगर पुरुषावर यावयाचा. जसा राजा तशी प्रजा, त्याप्रमाणेंच जसा सुभेदार तसे त्याचे बारगीर-शिलेदार-हवालदार-सरदार. सुभेदाराचा कनक व कान्ता याविषयीं पाशवी अतिलोभ पाहून त्याच्या अकितानाही तसें करण्याचा मोह पडावयाचाच, व त्या आधेरनगरींत न्याय कसा तो काडीइतकाही मिळावयाचा नाहीं. बाहेर जावें, तर बाबावरील संकट टळण्याचें बाजूलाच राहून स्वतःवर नवें सकट ओढवावयाचें. धनाजी बागवा पहारेकरी आपणाकडे पापी दृष्टीनें पाहणार, त्याच्याविरुद्ध सुभेदारापाशीं दाद मागावयाला जावें तर—'' असले अनंत विचार त्या प्रसगीं एका क्षणात लक्ष्मीच्या मनात काहूर माजवूं लागल्यामुळें आपल्या परमप्रिय जन्मदात्याला संकटांत मरत्या घडीला एकटाच सोडून देवाच्या गाभाऱ्याचा आश्रय करणारी लक्ष्मी जगण्याच्या मोहाला बळी पडण्याइतकी दुबळ्या मनोवृत्तीची व अळणी चारित्र्याची नव्हती. कौपिनेश्वराच्या पायापाशीं आपल्या जिवाचा नाश करून ह्या नरकवासांतून मुक्त होण्याच्या निर्धारानेंच ती गाभाऱ्यांत गेली होती.

पण ती आत जाऊन पाहते तों काय! आत्मघाताची मनोनिर्मित योजना पार पाडण्याला जें साधन उपयोगी पडेल अशी तिला आशा होती, त्या साधनाचाही तेथें अभाव! नंदादीपाचें तेल आंत एखाद्या कोनाड्यांत ठेवलेलें असेल तें आपण आपल्या आंगावर ओतून घेऊ आणि नंदादीपातील वातीनें आंगावरच्या वस्त्राला आग लावून भाजून मरून जाऊ, असा तिचा मानस! पण ती आत जाऊन पाहते तों कोनाड्यांतील तेलाचा तांब्या बहुतेक रिकामा! आत सारें अर्धा कुळचा तेल तिला सापडलें. तेवढेंच तिनें आंगावर ओतून घेतलें, आणि वस्त्राला आग लावण्यासाठीं ती एका नंदादीपाकडे वळते, तोंच तिच्या पदरानें तो नंदादीप विझाला. म्हणून ती दुसऱ्या नंदादीपाकडे वळते तों त्यातील वातीच्या ज्योतीची अवस्था आणि बाहेर मृत्यूच्या दारीं पडलेल्या तिच्या पित्याच्या प्राणज्योतीची अवस्था एकसारखी. नंदादीपाच्या चाड्यातील तेल सपून गेल्यामुळें वात आतवर जळत जाऊन बहुतेक सपून गेली होती. जराशी ज्योतीची धुगधुगी होती कीं नव्हती. तरीही लक्ष्मी आपल्या आत्महत्येच्या निश्चयापासून ढळली नाहीं. कोनाड्यांतील तांब्यामधील उरलें सुरलें चार थेंब तेल तिनें निथळून त्या नंदादीपाच्या चाड्यात ओतलें, आणि विझती वात प्रज्वलित केली. पण त्या वातीची काजळी देवासमोरच्या उदबत्तीच्या काडीनें झाडून तिच्यावर आपल्या वस्त्राचा पदर पेटवावयाचा या हेतूनें ती काडी घेऊन वात सारूं लागते, तों वातींत कांहीं त्राण उरलें नसल्यामुळें ती एकदम विझाली.

तेव्हां मात्र लक्ष्मी पुरी निराश होऊन कपाळावर हात मारून घेत म्हणाली, "हाय रे दुर्दैवा! अब्रूनिशीं जगूं देईनास म्हणून मरायला आल्यें तर मरूंदेखील देईनास? मृत्यु जीवाला सर्व यातनांतून सोडवितो असें म्हणतात, म्हणून त्याच्या आश्रयाला येऊं लागल्यें. तों तोदेखील इतका निष्ठुर? जित्या जिवांना मृत्यूचें भय वाटतें पण इथें मृत्यूच मला भिऊन दूर पळत आहे. इतकी मी महापातकी आहें काय? जगू म्हणेन तर जगतां येत नाहीं, मरू म्हणेन तर मरतां

येत नाहीं. हर हर!" असें विव्हळत तिनें धाडकन् खालीं आंग टाकलें. तथापि ती शुद्धीवर असल्यानें बाहेरील गलबला तिला ऐकू येत होता.

"अरे! हा मेला नाहीं, बेशुद्ध पडला आहे. मेला असता तर याची छाती कशी खालींवर झाली असती? श्वासोच्छ्वास कसा चालला असता?" असें एकजण बोलला. तें ऐकून लक्ष्मी स्वतःशीं म्हणाली, "हा तर बड्डू माणकराचा शद्व. ज्याच्या बापाला माझ्या बाबानी आपली पुण्यायी खर्च करून कान्होजी आग्र्याच्या कैदेंतून सोडवून आणलें, तो तू आज माझ्या बाबांना कैद करायला आलास काय?"

"इतक्यात तो कसा मरेल रे? तुरुगवास त्याच्या कपाळीं भोगावयाचा आहे ना? तो तुरुगात खितपून खितपून मरणार." दुसरा बोलला. तें ऐकून लक्ष्मी दात ओंठ चावीत पुटपुटली, "मन्याबा तांबोळ्याचा हा आवाज! काय मेल्याची वासना! मेल्या, तुझी जिव्हा झडून पडेल."

"तुम्हाला भ्रम आहे. हा मेलाही नाहीं व तुरुगांतलें मरणही त्याच्या वाटणीला येणार नाहीं. नक्षत्रासारखी तरणीबाड पोरगी पदरीं असतांना तुरुगातलें मरण म्हणजे काय बिशाद आहे? उद्या हाच गणोजी पडवळ कोंकणचा मामलेदार होऊन जर तुमच्याआमच्यावर हुकमत गाजवायला आला नाहीं तर मला विचारा." तिसरा म्हणाला. तें ऐकून मात्र लक्ष्मीचा जीव गाभाऱ्यात तळमळू लागला. ती ताडकन् उठून उभी राहिली, व मुठी आवळीत कडकडां दांत चावीत स्वतःशीं म्हणाली, "मात्रागमन्या! हिरोजी! नीचा! तुझें नाव मात्र हिरोजी, पण तुझी वाणी, तुझी कृति व तुझें अतःकरण कोळशापेक्षांही काळें आहे. आमचा पडता काळ पाहून तू आमची अशी विटबना चालविली आहेस; पण देवाच्या अगीं देवपण असलें, तर तो तुझ्या आई बहीणींवर असाच प्रसग आणील. मग तू त्याच्या अब्रूसाठीं मरतोस कीं त्यांच्या अब्रूचा बळी पडतो तें मी पाहीन." ती देवाकडे तोंड फिरवून दोन्ही हात जोडून अनन्यगतिक होऊन उद्गारली,

"देवा! तुझें सारें देवपण कुठें रे गेलें? तूं देव आहेस कीं धोंडा? माझे बाबा आणि मीं आजवर एकनिष्ठपणें तुला भजत आलों, त्याचें हेंच फळ काय? असल्या कळाहीन धोंड्याला आम्ही आजवर फुकटच आळवीत आलों काय? तुझ्या दारीं तुझ्या भक्ताचा हा छळ? शिव शिव!"

"पण गणोजीच जर ह्या अपघातातून उठला नाहीं, तर याच्या लेंकीच्या जिवावर मामलत कोण मिळवील?" पांचवा म्हणाला.

"कोणीही वाटेचा चोर मिळवील." पहिला पुन्हा म्हणाला.

"नाहीं. ही विटंबना आतां मला सहन होत नाहीं. एकदा बाहेर जाऊन ह्या लांडग्यांच्या जबड्यांत उभी राहू का? ते काय करतील? मला पकडतील? पकडून काय करतील? ठार मारतील तर खुशाल मारोत. पण मरतां मरतां मी याच्यापैकीं सांपडतील तितक्यांच्या नरडीचा घोंट घेईन." असें म्हणून लक्ष्मी बाहेर झडप घालण्यासाठीं दरवाजा उघडूं लागली. पण तिच्या आततायी धैर्याची वीज क्षणांत कडाडली आणि क्षणांत विझून गेली.

"खरेंच, याची लेंक कुठें आहे?" कोणा एकानें विचारलें.

लक्ष्मी भीतीनें थरथर कांपत देवासमोर उच चौरगाखालीं आपला साडेतीन हात उचीचा देह कोंबून लपत चित्कारली, "हे लांडगे आता माझी शिकार मिळवू पहात आहेत."

"लक्ष्मी आपल्या घरीं असेल. तिच्याशीं आपणाला काय करावयाचें आहे? सुभेदारांचा हुकूम फक्त गणोजीला पकडण्याचा आहे ना? तो गुन्हेगार आहे, त्याला पकडून घेऊन जा. हें देवालय आहे, उगाच भलभलते प्रलाप काढून पातकाची जोड कां मिळवितां?"

हा धनाजी बोलत असल्याचें लक्ष्मीनें आवाजावरून ओळखलें व स्वतःशीं म्हटलें, मघांपावेतों ज्याला मी पशुत गणलें, त्यानेंच यावेळीं माणुसकी दाखविली खरी. आणि बाकीचे सारे माणूस पशु ठरले."

धनाजीच्या कर्तेपणाच्या उद्गारांनीं गणोजीला पकडण्याला आलेले

शिपायी बरेच ताळ्यावर आले. ते जास्त काही न बोलता मुकाट्यानें बेशुद्ध गणोजीला तेथून उचलून घेऊन गेले. लक्ष्मी ते सारे सभामंडपाच्या दरवाजाच्या फटीतून पाहत होती. आता बाहेर चक्क उजाडून सूर्योदय झाल्यानें सभामंडपात स्वच्छ प्रकाश पडला होता. त्या प्रकाशात तिनें पुन्हा पुन्हा न्याहाळून पाहिलें, व बाहेर कोणी नाही अशी पूर्ण खात्री झाल्यावर ती हळूच दरवाजा उघडून बाहेर पडली. आता कोठे जावयाचें याचा विचार करीत ती गोंधळल्यासारखी होऊन सभामंडपात घाटेखालीं उभी होती. अंतःकरणात पितृयातनामुळें होणाऱ्या दुःखाचा वणवा पेटला होता; व त्या दुःखावर कोसळलेल्या अनाथपणाच्या संकटाच्या डागण्या! आता कोठें जावयाचें व काय करावयाचें हेंच तिला कळेना. सभोंवार चक्क प्रकाश पडला असतानाही तिच्या डोळ्यासमोर अंधाऱ्या येत होत्या. तशातूनही तिला कोणी पाहत नाही तोंवर बाहेर जाणें आवश्यक होतें. न जाणो, देवळात कोणी ओळखीच्या माणसानें पाहिलें आणि सुभेदारापाशीं जाऊन चुगली केली तर?

लक्ष्मी त्या गावचीच राहणारी पडली, तिला तेथील बहुतेक लोक ओळखणारच. ती तोंड लपवून किती लपवणार? तरीही तिनें देवाची अखेरची परिक्षा पाहण्याचं ठरविलें. तिनें आपल्या पदराच्या टोकानें कपाळाचें कुंकू पुसलें, व पदर इतका तोंडावर ओढून घेतला कीं कोणालाही तोंडवळा मुळी दिसूच नये आणि दिसला तरी कपाळाला कुंकु नाहीं असें पाहून हीच पडवळाची लक्ष्मी अशी ओळख सहजासहजीं पटूं नये.

अशा वेळी साह्य मागावयाचें तर तें एका परमेश्वराचें! सुटलें केंस वाऱ्यावर कितीही दशदिशा भुरभुरले तरी शेवटी ते शरण जावयाचे ते पाठीलाच! ज्या देवाची दगडधोंडा म्हणून तिनें संतापाच्या भरात निर्भर्त्सना केली होती, त्याच देवाला तिनें पुन्हा साकडें घातलें, आणि मुकाट्यानें बाहेरचा मार्ग सुधारला.

प्रथम तिचा विचार थेट घरी जाण्याचा होता. तेथें गुरावासराची

व्यवस्था शेजाऱ्यापाजाऱ्याना सांगून मग—मग काय? तें तिचें तिलाच ठरविता येत नव्हतें. मग काय? धनाजीला भेटून तिनें पित्याची शेवटची आज्ञा पालन करावयाची? पण धनाजी तरी सुभेदाराचाच पहारेकरी. चोराच्या भयानें घेतलें रान, तिथें भेटला मुसलमान, त्यानें कापले दोन्ही कान, अशी गत झाली तर? आणि बाबा आसन्न-मरण स्थितीत सुभेदाराच्या शिपायाहातीं कैद झालेले असताना त्याना सोडून कसें जावयाचें?

अखेर पतंग पेटत्या दिव्याकडे पळत जातो तशी लक्ष्मी धनाजीच्या घरच्या वाटेला लागली तिला तो दिवा आहे हे काय माहीत! पित्याची काळजी तिनें सोडून दिली, ती मात्र पतंग दिव्यावर झडप घालतो तशी आपली अवस्था होऊ नये म्हणून "आपण विचारपूस करावयाला गेलों, तरी सरळ मार्गानें पिता आपणाला थोडाच भेटू शकणार आहे? त्याला गुन्हेगार म्हणन पकडलें आहे, तो वेळीं सुळीं चढाविला जाईल, वेळी तोफेच्या तोंडी दिला जाईल, वेळीं पोत्यात बांधून समुद्रात बुडविला जाईल, वेळी तुरुंगाच्या कोठडींत डाम्बून कुजत ठेवला जाईल वास्तविक अशा नरवीराच्या उदरी जन्म येणें ही कैक जन्माची पुण्यायी फळाला आली असें समजावयाला हरकत नाहीं पण आज ते खरें बोलावे तर तीच शिक्षा भोगण्याला तयार व्हावें चौकशी करावयाला जावयाचे कोणाकडे? सुभेदारा-कडेच ना? म्हणजे समजून उमजून चोराच्या घरात बिऱ्हाड करा-वयाचे. पित्याचें रक्षण करणे तर शक्य व्हावयाचेच नाहीं, उलट आपण मात्र त्याच्यासारख्या नीच माणसाच्या हातीं सापडू."

"त्यापेक्षा दगडाहून वीट मऊ म्हणून धनाजीचाच आश्रय का न करावा? त्यानें बाबासमोर शपथ घेतली आहे, बेलभंडार उचलला आहे, आणि बाबानींही त्याला आपला धर्मपुत्र मानलें आहे तो आपलें इमान कसें सोडील? त्याला भेटू प्रथम त्याला मी आंग्र्या-कडची कामगिरी पार पाडावयाला सांगेन. पाहिजे तर मी त्याच्या-बरोबर जाईन. यावेळीं आम्हाला खरा आधार आंग्र्याखेरीज दुसऱ्या

कोणाचाही मिळणार नाहीं. आग्रे आपल्या प्रजेसाठीं काय वाटेल तें करायला तयार असतात. त्याची आणि आमची दोन पिढ्याची ओळख व नातेंही आहे, ऋणानुबंध आहे. त्याना बाबावरच्या संकटाची वार्ता कळून ते त्याच्या रक्षणाची तजवीज करीपावेतों जर बाबा इथल्या काळाच्या जबड्यात जिवंत असले, तर त्याची सुटका खास होईल."

असे मनोरथ रचीत लक्ष्मी धनाजीच्या घराच्या वाटेनें चालली. ती त्याच्या घरापाशी जाऊन पोहोंचते न पोहोंचते, तोंच देवानें—कीं सैतानानें नकळे—पाठविल्यासारखा धनाजी कोठूनसा घोडा फेंकीत तेथें येऊन पोहोंचला. लक्ष्मी बुरख्याखालीं तोंड झाकून चालत असल्यानें धनाजीला तिची सहज ओळख पटली नसती. परंतु लक्ष्मीनें त्याला ओळखलें व हाक मारली, "धनाजी!"

"कोण, लक्ष्मी?" असें उद्गारत धनाजी घोड्यावरून खालीं उतरला व लक्ष्मीजवळ येऊन म्हणाला, "तुझी सुखरूपपणें देवळांतून सुटका झाली, बरें झालें. पण आता इकडे कुठें चाललीस?"

"आणखी कुठें जाऊ? पायाखालीं धरणी दुभंगली आहे, डोक्यावर आकाश फाटलें आहे. जगायला गेल्यें तर जगता येत नाहीं, मरायला गेल्यें तर मृत्यु जवळ करीत नाहीं अशा वेळीं तू एवढा एकच जीवनाधार माझा धर्माचा पाठीराखा भाऊ मला बाबांनीं जाता जाता जोडून दिलेला उरला आहेस. तू माझें रक्षण करणार ना? बाबाना दिलेलें वचन तू पाळणार ना?"

'माझा धर्माचा पाठीराखा भाऊ' हे लक्ष्मीचे शब्द धनाजीच्या कानाना कमालीचे कडू लागले. पण तो कडवटपणा पचनीं पाडून तो म्हणाला, "अर्थात्! त्याची तुला काळजी नको. तुझ्यावरून पंचप्राण ओंवाळून टाकावेसे वाटले तरी त्यालादेखील माझी तयारी आहे."

"एकूण ईश्वरानें आपलें ईश्वरपण अगदीच सोडलें नाहीं म्हणायचें. बरें, बाबांची काय खबर?" लक्ष्मीनें आता तोंड लपविण्याचें

कांहीं कारण नाहीं असें पाहून बुरखा दूर करून आपले विखुरलेले केंस दोन्ही हातानीं सावरीत विचारलें.

"तुझ्या बाबाची खबर!" असें म्हणून धनाजी अमळ घोंटाळला. लक्ष्मीनें त्याच्या चर्येकडे पाहिलें. ती गोरीमोरी झालेली दिसली.

"कां?" लक्ष्मीनें 'काय ऐकायचें कपाळीं आहे आणि काय नाहीं' असें दुःखाच्या जाणीवेनें स्वतःच्या मनाशीं म्हणत विचारलें.

"तू मन खबीर करून कितीही कठोर व अमगळ वार्ता असली तरी ऐकशील?"

"हो! ऐकेन. न ऐकून कसें चालेल? माझे बाबा देवाच्या घरीं गेले हेंच तू मला सागणार आहेस ना?" बोलता बोलता लक्ष्मीचे डोळे पाण्यानें भरून आले.

"होय. पण—"

"बाबाचा तसा शेवट झाल्यावर पण काय आणि परतु काय?" लक्ष्मी कपाळाला हात लावून मट्कन् खालीं बसली, व ओक्साबोक्शीं रडू लागली. तिच्या शोकाला आता मर्यादा राहिली नाहीं.

"अशी रडू नकोस लक्ष्मी! रडू नकोस! रडशील, आणि कुणाला सुगावा लागेल, तर तू आपणावर देखील नवें सकट ओढवून घेशील. गणोजी सरकारी कामात अडथळा केल्यामुळें गुन्हेगार ठरून देहान्त-शासनाला पात्र झाला होता. तो जगता, तर त्याला हत्तीच्या पायाशीं बाधून ठार करण्याची शिक्षा देण्याला सुभेदार कमी करते नसते. त्याचीच साथीदार तूही आहेस"

"मग काय, मला ते देहान्त शासन देणार आहेत?" लक्ष्मीनें पदराच्या टोंकानें गालावरचे अश्रूचे ओघळ पुशीत विचारलें.

"देहान्त शासन तुला त्यांनीं दिलें असतें, तरी तें तुला मानवलें असतें. मला माहीत आहे, तू मरणाला भिणारी स्त्री नाहींस. तूं वीराची लेंक आहेस. पण त्यानीं तुला दिलेलें शासन त्याहीपेक्षा भयकर आहे. मरणापेक्षाही भयकर असें शासन त्यानीं तुला फर्मावलें आहे. काय समजलीस."

असें म्हणून धनाजी लक्ष्मीच्या दृष्टीला दृष्टि भिडवून क्षणभर निश्चल उभा राहिला

"मरणापेक्षाही भयकर असें शासन जगात दुसरें कोणतें आहे?"

"मरणापेक्षाही मोलाची अशी स्त्रियापाशी कोणती वस्तु आहे?"

"अब्रू. माझ्या अब्रूवर घाला?—"

"हळू हळू बोल जरा कोणी ऐकेल तर अनर्थ होईल सुभेदारानीं तुझा शोध करून तुला पकडून आणण्यासाठीं लोक रवाना केले आहेत. त्याना जर तुझा सुगावा लागला, तर मग तुझी आणि माझीही धडगत नाहीं मला तुझ्याशीं इतक्या गोडीनें बोलतांना त्यानीं पाहिलें, तर मीही फितूर आहे असा सशय घ्यावयाला ते कमी करणार नाहींत"

"मग आता कसें करायचे? तो नीच सुभेदार म्हणतो तरी काय? त्याची माझ्यावर पापी दृष्टि आहे का?"

"तसें असतें तरीदेखील मला तितकेंसें नवल वाटलें नसतें सुदर स्त्रीकडे पाहून अभिलाप उत्पन्न झाला, तरी मी म्हणतों, काहीं हरकत नाहीं" लक्ष्मीला आपले बोल रुचत नसल्याचें तिच्या चर्येवरून अदाजून धनाजीनें मोठ्या चतुराईने आपल्या भाषणाचा ओघ तिच्या ध्यानींही येऊ नये इतक्या सावधगिरीनें बदलला, "विषयलोलुप मनुष्य दुर्जन खरा, पण—तसा अभिलाष सुभेदारांना असता तरी मीं त्याना तितकासा दोप दिला नसता. पण त्यानीं श्रीमताचा रगमहाल सुशोभित करण्यासाठीं तुला पकडून श्रीमताना नजर करण्याचें मनात आणावें—"

"काय, मला श्रीमताच्या रगमहालात पाठविण्याचा सुभेदारांचा बेत आहे? हे कोण श्रीमत?"

"हळू—हळू बोल म्हणतोंना जरा? कोणी ऐकेल तर काय अनर्थ ओढवेल याचा काहीं सुमार बाळगशील कीं नाहीं? सुभेदाराच्या राजधानींत—वाघाच्या गुहेंत तू आहेस इथें उघड्यावर आपण बोलत थाबणेंही इष्ट नाहीं." धनाजी सभोंवार पाहून दूरवर नजर फेंकून

म्हणाला, "ती पहा तिथें एक झोंपडी दिसते आहे. आपण तिथें जाऊन थांबू. म्हणजे कोणी आपणाला पाहणार नाहीं. वेळ कठीण आहे. जरा सावधपणानें वागायला हवे."

लक्ष्मी अनन्यगतिक झाली होती. तिला धनाजीच्या आश्रयाला उभें राहण्याखेरीज तूर्त तरी गत्यतर उरलें नव्हतें ती मुकाट्यानें त्याच्या मागोमाग जाऊ लागली. जाता जाता तिनें त्याला पुन्हा विचारलें, "कोणत्या श्रीमतासमोर मला बळी द्यायचा बेत आहे सुभेदाराचा?"

"श्रीमत पेशव्याकडे ते तुला पाठवितील.–किंवा आपल्या पदरीं ठेवून देतील! त्याचा काय नेम सागावा? कदाचित् असेंदेखील करण्याचा त्याचा मानस नसेल कशावरून?–सुभेदाराचा तो एक गळ्यातला ताईत सुभान्या आहे ना?"

"सुभान्या? कोण सुभानराव सोडकर का?"

"होय. त्याची कीर्ति तुला माहीत आहेच. त्याची कुळबीण म्हणे, आज चार वर्षे झाली, कुठें हरवली आहे. ती कुठें तरी आग्र्याच्या मुलुखात आहे म्हणतात तिचा शोध करून दे तर तह करतों असें सुभेदारानीं एखसारखें सरखेलाच्या मागें टुमणें लावलें आहे. त्याला त्या कुळबिणीच्या बदली ही नवी तरणी कुळबीण देण्याचेंही मनात असेल त्याच्या."

"आणि ह्याच सुभानरावाचा जावजी गवळ्याशी घरोबा आहे नाहीं?"

"होय. का?"

"का?" या प्रश्नाचें लक्ष्मीनें दोघेंही झोंपडीत जाईतों उत्तर दिलें नाहीं. धनाजी आपल्या मनात तिच्या त्या प्रश्नाबद्दल तर्ककुतर्क करीत होता. गवळ्याचें नाव निघताच तिला आपल्या भावी पतीची–श्रीपति गवळ्याची आठवण झाली असेल कीं काय असाही सशय त्याला आला. आपण उद्या त्या मोठ्या घराण्याची मालकीण होणार आहों या भरवशावर ती निर्भयतेनें वागून आपल्या हातावर तुरी

देऊन निसटूं पाहत आहे काय, असेंही त्याला वाटलें, व त्यानें आपला घातुक विचार एकदम तिच्या कानावर घालण्याचें योजिलें.

"मग काय? सुभेदाराच्या स्वाधीन होणार तू?" धनाजीनें झोपडींत जाताच विचारलें.

"नाहीं. त्यापेक्षा मी इथेंच मरेन.—पण नाहीं. मी इतक्या लौकर मरायलाही तयार नाहीं. माझ्या बाबावर आणि माझ्यावर ज्या नीच राक्षसानें हा प्रसंग ओढवून आणला, त्याला ह्या जगातून कायमचा नाहींसा करीन तेव्हाच मी मरेन. आणखी मला उभ्या आयुष्यात काहींदेखील करता आलें नाहीं तरी चालेल."

## प्रकरण सातवें

# धनाजी आणि लक्ष्मी

लक्ष्मीनें श्रीपतीला देवळात ओळखलें नाहीं, असें धनाजीला वाटलें. पण पुन्हा एकवार खात्री करून घेण्यासाठीं तो म्हणाला, "तो तरुण कोण होता, तुला माहीत आहे?"

"नाही. त्याची माहिती मला हवी आहे. सांग तुला तो कोण तें माहीत आहे का? त्याचें नाव सांगशील तर तुझे माझ्यावर मोठे उपकार होतील. त्यासाठीं तू काय सांगशील तें करीन."

"सांगेन तें करशील?" असें विचारताना धनाजीची नजर पालटली. अंतःकरणही पालटलें. आज कितीतरी दिवस तो लक्ष्मीला पाहत होता, व तिच्याविषयीं त्याच्या मनात अभिलाषही उत्पन्न झाला होता. कोणत्याही काळीं कोणत्याही समाजात ज्या हीन प्रवृत्तीचे खल पुरुष असतात, त्या प्रवृत्तीचा खल पुरुष तो होता. असहाय व सुंदर तरुणी एकटीच हातीं सापडली, तेव्हा तिच्याकडे पापी दृष्टीनें पाहण्याला त्याला संकोच तर वाटला नाहींच, पण आता भयही वाटण्याचें कारण नव्हतें. तिला आपला नीच हेतु कोणत्या शब्दांत कळवावा, एवढाच विचार त्याला इतका वेळ पडला होता. पण पापवासना माणसाच्या मनांत जागृत झाली व ती सभोंवारच्या अनुकूल परिस्थितींत मूळ धरूं लागली, कीं विचाराचें विकारांत रूपांतर व्हावयाला वेळ लागत नाहीं. झोंपडींत येण्याची कल्पना धनाजीच्या मनांत आली तिचें तरी तेंच कारण.

"सांगेन तें करशील?" असें विचारून धनाजीनें लक्ष्मीच्या डोळ्याला डोळा भिडविला. त्याबरोबर लक्ष्मीलाही संशय आला. तिचाखेरील मूळपासून धनाजीविषयीं अनुकूल ग्रह नव्हताच. तिनें

सावधपणें पाऊलभर दूर जाऊन उभी राहत विचारलें, "सागेन तें याचा अर्थ काय?"

"तू ओळख पाहू!" धनाजीनें हसत हसत लक्ष्मीचा हात आपल्या हाती घेण्याचा प्रयत्न करीत विचारलें

"बाबानी तुझा मला माझ्या पाठच्या बहिणीप्रमाणें साभाळ करायला सागितलें आहे" लक्ष्मी आणखी पाऊलभर दूर जात म्हणाली.

"सध्याच्या स्थितीत तुझा बहिणीप्रमाणें साभाळ करायला मी असमर्थ आहें."

"तू आमच्या त्या शत्रूला ठार मारून प्रतिज्ञा पुरी करशील?"

"तो माझ्या हातचा मळ आहे. पण— "

"तेवढें काम तू कर, मग— "

"मगचें मग आणि आताचे आता त्या माणसाला ठार मारायचें तर—तो कोण आहे तुला माहीत आहे? त्याचें नाव तुला कळेल तर तुझा निश्चय पालटण्याचा सभव आहे ."

"मला त्याचें नाव तू आधी मुळींच सागू नकोस. मला सर्व माहीत आहे प्रथम तू तुझी प्रतिज्ञा पूर्ण कर, मग— "

"पुन्हा मग?" धनाजीची पापवासना अनावर झाली तो बेतालपणें पुढें जाऊन लक्ष्मीचा हात धरून म्हणाला, "लक्ष्मी! माझ्या मनात काय आहे तुला कळत नाही?"

किती अभागी धनाजी! त्यानें समजसपणा राखून 'मग'चा अर्थ लक्ष्मीला तिच्या हृदयात शिरून विचारला असता, तर त्याला ती थोड्या दिवसानी त्याच्याशी लग्न करावयाला तयार असलेली दिसली असती. असेच आणखी थोडे दिवस गेल्यावर कदाचित् तिचा सूडाचा हट्टही ओसरला असता, व तो कोणी वैरी धनाजीच्या हातून ठार होण्यापूर्वीच ती त्याला वश झाली असती श्रीपति गवळी जरी तिचा नियोजित भावी वर असला, तरी त्याचे नाव काय तें तिला ऐकून माहीत होतें. त्यानेंच आपल्या जन्मदात्याला ठार केलें असें माहीत असताना ती त्याच्याशीं लग्न करावयाला कधींच तयार झाली नसती.

मग सोन्यासारखी पत्नी व तिची दौलतदेखील धनजीला मिळाली असती. पण इतका तो नशीबवान नव्हता म्हणून त्या एकान्तात लक्ष्मीच्या अब्रूवर घाला घालण्याची आसुरी लालसा त्याच्या मनात बलवत्तर झाली.

"धनाजी! तू कुणाशी बोलतो आहेस तुला कळत नाहीं?" लक्ष्मी धनाजीचा हात दूर लोटून रागानें म्हणाली, "पेटत्या खाईत हात घातला तर काय गत होते याचा तुला अनुभव नाहीं का? काळ वेळ काहीं न पाहता असले उद्गार काढायला तुला लाज वाटायला हवी होती. कोणीं ऐकलें, तर पितृनिधनाच्या दुःखाच्या खाईत होरपळणाऱ्या मुलीकडे पातकी दृष्टीनें पाहणारे पापात्मे खलपुरुष मनुष्यकोटींत जन्माला येतात हें खरेंदेखील कोणाला वाटायचें नाहीं. तशात तू माझा शेजारी!"

विषयांध बनलेल्या माणसाला सभोंवारच्या सृष्टींतील शुभाशुभ घटनांचें भान नसतें, आणि त्याना कोणाची लाजही नसते. ते अगदीं उन्मत्त झालेले असतात. त्याच्या डोळ्यावर विषयलालसेची गाढ धुंदी आलेली असते. धनाजीचीही तशीच अवस्था झाली होती. गणोजी मेला तर लक्ष्मीला त्याचें दुःख! याला त्याचें काय होय? लक्ष्मीची द्विधा वृत्ति होऊ नये व मागची आशा तिला उरू नये म्हणून गणोजीच्या मेल्या जित्याची चौकशी देखील न करता गणोजी मेल्याचें आपल्या पदरचेंच सांगून तो मोकळा झाला होता. लक्ष्मीनें जेव्हां काळवेळेचा प्रश्न काढला तेव्हा त्यालाही वाटलें कीं आपलें चुकलें. पण मुळातच अविचारानें चूक न करण्याला जशी माणुसकी लागते, तशीच चूक कळल्यावर तिचें निराकरण करण्याला अथवा तिच्यापासून परावृत्त होण्यालाही माणुसकी लागते. किंबहुना मनुष्याच्या आत्मसंयमनाची खरी परिक्षा आपली चूक कळल्यावर तो कसा वागतो यावरच मुख्यत: अवलंबून असते. व्यक्तिमात्राचें खरें स्वरूप अशा प्रसंगात जितकें स्पष्ट दिसतें, तितकें इतर सामान्य वेळीं दिसत नाहीं. प्रसंग जितका आणीबाणीचा, तितका त्याचा प्रकाशही प्रखर असतो,

व तो मनुष्याच्या स्वभावविशेषाची बारीकसारीक रेषानूरेषा अगदीं अलग करून दाखवितो. अशा प्रसगात माणुसकीनें टिकून राहणारा धनाजी नव्हता. त्याला त्यावेळीं अनुताप वाटण्याचें बाजूलाच राहिलें; तो उलट चिडला. "एवीतेवीं लक्ष्मी आपल्यावर रुष्ट झालीच आहे, ती स्वसतोषानें यापुढें आपणाला वश होणें कालत्रयीही शक्य नाहीं. मग ती हातीं सापडली असताना तिला सोडा काय म्हणून? पुढें काय व्हावयाचें असेल तें होईल मीं तिच्या इच्छेविरुद्ध तिची इतकी अमर्यादा केल्यावर ती खवळून माझी हाडवैरीण बनेल इतकेंच ना! पण तिला हाडवैर साधावयाला मी जिवत तरी कशाला ठेवतों आहें?" ह्या शेवटचा आसुरी विचार हातचा राखून ठेवून धनाजी लाडगा शेळीवर झडप घालतो तशी लक्ष्मीवर झडप घालून तिला आपल्या बाहुपाशाच्या बधनात जखडून टाकीत म्हणाला, "लक्ष्मी! मला तुझ्या असल्या शहाणपणाच्या गोष्टी मुळींच ऐकावयाला नको आहेत. मला जें पाहिजे तें तू जर खुषीने मला दिलें नाहींस, तर तें सक्तीनें मिळविण्याला मी पूर्ण समर्थ आहें. हें ध्यानी आणून तू काय तें साग"

लक्ष्मीनें ओळखलें की प्रसग आपणाला अनावर असा आणी-बाणीचा घेऊन ठेपला आहे. "पण म्हणून काय मान नमवावयाची? स्त्रीला अब्रू प्राणापेक्षाही जास्त मोलाची नाही काय?...पण प्राणा-वर उदार होऊन मी अब्रू बचावीन म्हटलें, तर तें तरी शक्य आहे काय? प्राणापरी प्राण आणि अब्रूपरी अब्रू, या दोहोंनाही गमावून मी बसणार! अशा स्थितीत मी काय–करू तरी काय?." तिला अब्रू-ला आचवून जगण्यापेक्षा मरण बरें असें वाटलें. पण मरून देखील अब्रू कशी बचावेल हे तिला कळेना. आपण जगायलाही स्वाधीन नाहीं व मरायलाही स्वाधीन नाहीं, असा दुर्निवार्य पेंच पडलेला पाहून तिनें बेभानपणें धनाजीच्या बाहुपाशातून आपली सुटका करून घेण्या-साठी टाहो फोडला, परमेश्वर मेला काय? कीं ह्या जगांत परमेश्वर नाहीच! ज्याना तुझ्यासारख्या नरपशूपासून स्वतःच्या अब्रूचें रक्षण

देखील करता येऊ नये, असली स्त्रीजात त्या परमेश्वरानें जगात उत्पन्न तरी कशाला केली? अनाथाचा वाली कोणीच नाहीं काय? "

त्याच वेळीं एक तरुण घोडेस्वार त्या झोंपडीच्या पलीकडून घोडा दौडीत चालला होता त्यानें लक्ष्मीचा आर्तस्वर ऐकला त्याबरोबर घोड्यावरून उतरून तो स्वार आपला भाला उभारून झोंपडीकडे धावला. तो झोंपडीच्या दारात गेला, तेव्हा धनाजी कामांध बनल्या-मुळें, व लक्ष्मी आपल्या दुःखात बुडून गेल्यामुळें दोघांचेंही त्याच्या-कडे लक्ष्य गेलें नाही त्या स्वारानें तें किळसवाणें दृश्य पाहिलें मात्र, आणि आपला भाला अशा आवेशानें धनाजीच्या पाठींत फेंकला कीं त्यासरसा धनाजी प्राणांतिक वेदनांनी किंचाळत खालीं कोसळला. त्या स्वारानें लगेच आपल्या कमरेची तरवार काढून धनाजीचें शीर हां हां म्हणता धडावेगळें केलें.

लक्ष्मीला वाटलें, हा साक्षात् परमेश्वरच आपला धावा ऐकून आपल्या साह्याला धावून आला. इतका तिला त्या उपकारकर्त्या-बद्दल आदर वाटू लागला. आधींच भीतीनें तिच्या छातींत धडकी भरलेली. तशात हा अनाहूत उपकारकर्ता तिला भेटला. आता पूर्व दुःखाबद्दल खेद प्रदर्शित करावा, की संकटमुक्ततेबद्दल आनंद दर्श-वावा, हेंच तिला कळेना. पण ती त्या तरुणाशीं बोलण्याचें मुद्दाम टाळीत होती असें मात्र नाहीं. तिला त्याच्याशीं बोलावयाला हवें हवेंसें वाटत होतें. तिचे ओंठ त्याच्याशी बोलावयाला जितके स्फुरत होतें, तितकेच तिचे कान त्याचे बोल ऐकावयाला तान्हेलेले होते. तो तरुण जर तिचा समवयस्क नसता, अथवा आपल्याला यानें आपल्या शौर्यानें, सौंदर्यानें आणि उपकारकर्तेपणानें जिंकलें आहे असें तिचें तिलाच तेव्हा वाटलें नसतें, तर ती त्याच्याशीं आरंभींच मनमोकळे-पणानें बोलली असती. पण इथे तर ती त्याच्यासमोर लज्जानम्र वृत्तीनें उभी होती इतकें आपण लाजावे का, हें तिचें तिलाच कळत नव्हतें.

अखेर तो तरुण आपण होऊनच बोलता झाला, "तुझ्यावरचें संकट तर निवारण झालेंच आहे. आता कोणत्या सुंदर तरुणीच्या

रक्षणाचें सत्कृत्य माझ्या हातून घडलें, तिचें नाव मला कळेल का?"

"लक्ष्मी माझें नाव. मी इथल्याच गणोजी मान्याची मुलगी."

"म्हणजे जिचें लग्न ठरलें आहे—"

"आहे नाहीं, होतें. माझें लग्न एका तेजस्वी तरुणाशीं ठरलें होतें —"

"जावजी गवळ्याचा मुलगा श्रीपति—"

"होय पण तें नावदेखील मला उच्चारायला नको आहे. ऐकायला देखील नको आहे त्या नीचाचें नाव मला. ज्यानें माझ्या पित्याचा एखाद्या निर्दय खाटिकासारखा खून केला, त्या वैऱ्याची बाईल मी कधीं तरी होईन का? माझ्यावर हें संकट ओढवण्याला तोच कारण. —देवा! त्या नीचाचें पारिपत्य करण्याचें सामर्थ्य मला दे!"

"कुणी तुझ्या पित्याला ठार मारलें म्हणालीस? श्रीपतीनें?" त्या तरुणानें विस्मयचकित वृत्तीनें आपला खालचा ओंठ किंचित् चावीत विचारलें

"होय त्यानेंच!" लक्ष्मी डोळ्यांत आसवें आणून म्हणाली.

"हें शक्य तरी आहे?"

"प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टीच्या बाबतींत शक्याशक्यतेचा प्रश्नच नसतो."

"मी तुला खात्रीने सांगतों, लक्ष्मी! श्रीपती गवळीच काय पण कोणीही मनुष्य असला अमानुष अत्याचार करणार नाहीं. ज्या अर्थी तू म्हणतेस, त्या अर्थी तें खरें असेल, श्रीपतीच्या हातून तुझा पिता कदाचित् मारला गेला असेलही पण तिथें कांहींतरी समजुतीचा घोटाळा असेल,—कांहींतरी विपरीत परिस्थिति निर्माण झाल्याखेरीज कधींही श्रीपती असें करणार नाहीं. त्यानें तरी इतके पापानें पाय थोडेच धुतले आहेत?"

"तुम्ही त्याला ओळखता?"

"ओळखतों."

"तो तुमचा मित्र आहे?"

"होय."

"तर मग तुम्ही त्याच्या वैरिणीला आज वाचविलेंत म्हणायचें."

"पण मीं तुझे प्राण वाचविले, त्यामोबदला मी जर काही मोबदला मागितला, तर–"

लक्ष्मीनें आपल्या मनानेंच त्या मोबदल्याचा अर्थ काय लावावयाचा तो लावून उतावळेपणानें उत्तर दिलें, "तुम्ही काय मोबदला मागणार तें मला माहीत आहे. मी तुमच्या पायाची दासी आहे. पण केव्हा? केव्हा सागा?"

"केव्हा?"

"माझ्या वैऱ्याचें शीर आणून मला दाखवाल तेव्हा एवढा पण जिंकायची तुमची तयारी आहे?"

"तुझ्या पित्याचा खून झाला म्हणतेस, त्याची तिकडे चितादेखील पेटती होण्यापूर्वी ससारातील सुखाची तुला इतकी तहान लागली, हा तुझा चचलपणा नाहीं का?" त्या तरुणानें विचारलें.

"त्या सुखासाठीं मी हें बोलत नाही, तर माझ्या बाबावरचें प्रेम मला असें बोलायला भाग पाडतें आहे. याउपरही तुम्हीं मला झिडकारलेंच तर गोष्ट निराळी. पण–खरें, तुमचें नाव काय?"

"नावात काय आहे? साग, तुला काय सागायचें तें साग."

"मला आणखी काहीं सागायचें नाहीं माझे बाबा गेल्यावर ह्या जगात मला आधार कोणाचाही उरला नाहीं. वर आकाश आणि खालीं धरणी वेलीला वृक्षाचा आधार अवश्य असतो. तुम्हीं ह्या सैतानाच्या मगरमिठींतून मला वाचविलेंत, तुम्हीच माझे परमेश्वर. मी आसऱ्यासाठीं तुमच्या तोंडाकडे पाहण्यात काहीं चूक करत्यें आहें असें मला मुळीच वाटत नाहीं. आता, मला लाथाडून जाण्याची जर तुमची इच्छा असेल, तर तिथें माझा नाइलाज आहे पण माझी पुन्हा तुमच्या पायापाशीं विनति–मात्र परमेश्वर झाला तरी तो माझ्या नवसाला पावला तर त्याला मी मानीन. नाहींपेक्षा—

"मला तुझ्या कोणत्याही अटी ऐकावयाला नको आहेत. लक्ष्मी!

तुझी मनोवृत्ति इतकी का बावरी झाली आहे याची मला कल्पना आहे. तुझ्या पित्याचा वध करणारा तुला शत्रुसा वाटणें अगदीं स्वाभाविक आहे पण पितृप्रेमानें वेडावून जाऊन तू अनोळखी माणसाला आत्मदान करायला तयार झालीस, हा अविचार नव्हे का? माझ्यावर तू इतका विश्वास टाकतेस, त्या विश्वासाला मी पात्र असेन कशावरून?"

"हंसी मोत्याचा चाराच नमका शोधून चोंचींत धरते तिला तें कोणीं सांगावें लागत नाहीं."

"हा तुझा आत्मविश्वास अतिशयोक्तीची ठरण्याचा संभव नाहीं काय?"

"अतिशयोक्तीचा ठरला, तरी असमर्थनीय तर ठरणार नाहीं ना!"

"तें तरी मी आज कसें सांगू? समज, श्रीपतीनें हेतुपुरःसर तुझ्या पित्याचा वध केला नाहीं असें जर सिद्ध झालें, तर तुझ्या मनातला त्याच्याविषयींचा राग कमी होणार नाही, याचा काय भरवसा?"

"त्याचें नाव तुम्ही माझ्यासमोर काढू नका."

"नको तर नाहीं काढीत त्याचें नाव पण मी तुला मात्र स्पष्ट सांगून ठेवतों कीं, मी तुझ्यावर जो उपकार केला, तो उपकार म्हणून केला नाहीं, तर तें माझें कर्तव्य मी केलें त्याची मला किंमत नको आहे. त्यातूनही तुझी इच्छाच असली माझें ऋण फेडण्याची, तर एवढेंच तू कर, हा चंचल स्वभाव मोड मनुष्याच्या आवडी निवडी व प्रीतीच्या कल्पना अळवावरच्या पाण्याप्रमाणें अस्थिर—चंचल असणें बरें नाहीं. मात्र यावरून तू असा गैरसमज करून घेऊ नकोस कीं मी तुझा तिरस्कार करतों, अथवा तुला झिडकारतों पण तुझें मन स्थिरावून तुझा विचारपूर्वक काय तो निर्धार ठरेपावेतों मला तुझ्याविषयीं अभिलाषही धरता येत नाहीं, व तुला आशाही लावता येत नाहीं. कदाचित् असें होणार नाही,—तुला वैरी वाटणाऱ्या श्रीपतीला ठार मारून तुझें प्रेम संपादन करणारा एखादा आवडता व अनुरूप

साह्यकर्ता तुला भेटणार नाहीं कशावरून? श्रीपतीचा अपराध माझ्या दृष्टीनें सिद्ध होईतों मी त्याला ठार करण्याचें कबूल तरी कसें करूं? आणि समज, श्रीपतीनें तुझ्या पित्याला ठार मारलें असें मला दिसून आलें, तरी तुझ्या पित्यानें त्याची कांहीं आगळीक केल्यामुळेंच त्यानें त्याला ठार मारलें असा खरा प्रकार उघडकीला आल्यास मी जर केवळ कामान्ध बनून सुंदर तरुणी अर्धांगी लाभावी या अभिलाषानें त्याचा वध करायला उद्युक्त झालों, तर जग मला काय म्हणेल? आणि तुला तरी माझ्याविषयीं आदर का वाटेल? यावेळीं तुझें चित्त भानावर नाहीं आहे, म्हणून मी तुला तसें कोणतेंच वचन देऊं शकत नाहीं. मी फक्त एवढेंच तुझ्यासाठीं करूं शकतों, तू जर उघड्यावर पडली असशील, तर तू सांगशील त्या सुस्थानीं मी तुला नेऊन पावती करीन. सांग, तुला मी कुठें पोंचवूं? लौकर सांग. मला इथे जास्त वेळ थांबता येणें शक्य नाहीं. जसा तुझा जीव संकटात आहे, तसाच माझाही जीव संकटात आहे तथापि मी पुरुष आहें, तू स्त्री आहेस. माझ्यापेक्षा तुझें जीवित अधिक परावलंबी आहे सांग. तुला तुझ्या घरीं जावयाचें आहे का?"

"नाहीं." लक्ष्मी उत्तरली. घरी तर तिला आता जाताच येणें शक्य नव्हतें. आपल्यावर शत्रूची पापी नजर केव्हा कशी पडेल, याचा तिला लवमात्र भरवसा नव्हता. दुसरें, त्या तरुणाच्या स्पष्टोक्तीनें तिला तिच्या खऱ्या मनस्थितीची जाणीव करून दिली होती. आपला त्या तरुणानें उतावळेपणानें स्वीकार केला नाही म्हणून तिला विषाद वाटला, पण राग आला नाहीं. उलट त्या तरुणाविषयीं मात्र तिला अत्यंत आदर वाटूं लागला. तिच्या मनात आलेली चंचलतेची लहर वाऱ्याच्या लहरीसारखी जशी आली तशी गेली, व तिची खात्री पटली कीं हा तरुण म्हणतो तेंच खरें आहे त्याच्याविषयीं तिला वाटणारा यौवनसुलभ चंचलतापूर्ण अभिलाष ओसरला, व आपलेपणाच्या विश्वासानें ती जागा भरून काढली.

"मग तुला कुठें जायचें आहे?" त्या तरुणानें विचारलें

"ज्या सुस्थळीं तुम्ही मला घेऊन जाल, तिकडे यायला मी तयार आहें" लक्ष्मी आतापावेतों उच्छृंखलपणें काढलेल्या स्वतःच्या उद्गाराबद्दल ओशाळून स्थिर पण विस्मित वृत्तीनें खालीं पहात उत्तरली.

"मला सरखेलाकडे जावयाचें आहे. त्याचा मुक्काम कुठें असेल याचा काही नेम नाही. प्रथम मी विजयदुर्गला जाईन. तिथें जर सरखेल भेटले नाहींत तर मग मला दुसरीकडे जावें लागेल. तू माझ्याबरोबर कुठवर हिंडत राहशील?"

"मला तुम्हीं सरखेलाच्या पदरीं नेऊन सोडलें तरी चालेल."

लक्ष्मी त्या तरुणाच्या तत्रानें वागण्याला तयार झाली. ती कांहीं केल्या आपला हेका सोडीचना. तेव्हा त्या तरुणाचाही तेथें अगदीं नाइलाज झाला. तो शेवटीं लक्ष्मीला आपणाबरोबर न्यावयाला तयार झाला. पण पुन्हा अडचण वाहनाची आली त्या तरुणानें लक्ष्मीला विचारलें, "तू माझ्या मागें घोड्यावर बसशील?"

लक्ष्मी काहींच उत्तर देईना. त्यावरून त्या तरुणानें ओळखलें कीं हिला सकोच वाटतो आहे. त्यानें तिला विचारलें, "तू थोडा वेळ इथें थाबशील का? तोंवर मी दुसरा एक घोडा पाहून आणतों."

"काहीं नको. मी तुमच्या मागें तुमच्या घोड्यावर बसेन." लक्ष्मी म्हणाली. सुभेदाराचे लोक आपल्या तलाशावर असल्याचें तिला माहीत होतें. म्हणून यापुढें ठाण्यात एकटीनें रहाणें तिला सुरक्षितपणाचें वाटत नव्हतें

"माझ्याबरोबर तुझाही जीव हकनाहक सकटात पडेल. तुला माहीत नसेल तर सांगतों, कीं सुभेदारांचा शत्रु आहें. मला फाडून खाण्यासाठीं सुभेदाराचे लोक लाडग्यासारखे हिंडत आहेत. त्याच्या भक्ष्यस्थानीं मी पडलों तर माझ्याबरोबर तुझ्यावर आणखी सकट कशाला?"

"सुभेदाराचे शत्रु आहा तुम्ही?"

"होय. म्हणून सागितलें मी"

"तर मग आपली दोघांची मैत्री जुळायला मुळींच हरकत नाहीं.

माझीदेखील आता इथें ठाण्यात धडगत नाहीं जिकडे पुढा तिकडे मुलुख थोडा असा माझ्याही आयुष्याचा उन्हाळा झाला आहे. आपण दोघेही समदुःखी आहों. जी गत तुमची होईल ती माझी."

"ठीक आहे तर घे परमेश्वराचें नाव, आणि चल माझ्याबरोबर. बेलापूरला जाईपावेतोंच आपणाला काय त्रास होईल तो. त्या बंदरात आपणाला सुखरूपणें विजयदुर्गाला नेऊन सोडणारें एखादें तारू खात्रीनें मिळेल."

"माझ्याही ओळखीचा शंभू तांडेल बेलापुरात आहे. आपणाला काहीं अडचण पडायची नाहीं."

"नाहीं. तसें मात्र करावयाचें नाहीं."

"तर मग?"

"तें मग मी सागेन तुला. आता इथें वेळ दवडण्यात अर्थ नाहीं. चल पाहू नीघ माझ्याबरोबर!"

नवपरिणीता वधू आपल्या पतीच्या मागोमाग सासरीं जाते, तशी लक्ष्मी निमूटपणें त्या तरुणामागोमाग निघाली. ह्या अपरिचिताबरोबर गेल्यानें आगींतून उठून फुफाट्यात पडल्यासारखी आपली गत होईल कीं काय, अशी शंकाही तिच्या मनाला शिवली नाहीं.

जवळच त्या तरुणीचा घोडा उभा होता. त्यावर स्वार होऊन त्या तरुणानें लक्ष्मीला हात दिला, व ती त्याच्या मागोमाग त्याच्या कमरेला धरून बसली सुतकात साखर खाल्ली तरी ती जशी गोडच लागते, तसा लक्ष्मीला त्या तरुणाचा स्पर्श ती पितृनिधनामुळें दुःखी होती तरीदेखील तिला सुखकर वाटला.

दोन प्रहरीं बारा वाजण्याच्या सुमाराला तीं दोघें घोडा भरधांव फेंकींत घणसोलीला जाऊन पोहोंचलीं. तिथें थाबून पाणी पिऊन पुन्हा पुढच्या प्रवासाला निघणार, तोंच अकस्मात् पाच घोडेस्वार त्याच्या मागोमाग दौडत आलेले त्याना दिसले. रघुवीरानें ओळखलें कीं आपल्या शिकारीसाठीं सुभेदारानें सोडलेले लांडगे ते हेच होत. आता याची नजर चुकवून आपणाला बेलापूरवावेतों निसटतां येणें

शक्य नाहीं, अशी खात्री होतांच रघुवीरानें लक्ष्मीला सांगितलें, "लक्ष्मी! ज्या संकटाला आपण भीत होतों, तें तर मूर्तिमंत आपणासमोर येऊन उभें राहिलें. यातून आपली दोघांची सुटका होणें शक्यच नाहीं, उलट माझ्यामुळें तुझाही जीव धोक्यांत येईल." लक्ष्मी कोणत्याही प्रसंगाला तोंड देण्याची आपली तयारी आहे असें बोलणार, हें तिच्या चर्येवरून ओळखून तो तरुण तिला पुढें म्हणाला, "आतां मुकाट्यानें माझें ऐक. धीर सोडूं नकोस. ह्या घोड्यावर स्वार होऊन तूं एकटीच बेलापूरला जा, व तिथून—काय पाहिजे तें करून एकदांचा विजयदुर्ग गांठ. आणि—तुझें मीं रक्षण केलें, त्या उपकाराचा मोबदला मागण्याची पाळी माझ्यावर आली आहे याबद्दल मला दोष देऊं नकोस. परमेश्वराची जशी इच्छा होती तसें होत आहे. तूंही माझ्याप्रमाणेंच सरखेलांची कैवारी आहेस. तूं सरखेलांना जाऊन समक्ष भेटून एवढाच निरोप सांग, कीं सुभेदार रामाजीपंतावर भरंवसा बिलकुल ठेवूं नका. तडजोडीच्या आशेवर—त्यांना म्हणावें, तुम्हांला झुलवीत ठेवून इंग्रजांच्या हातीं तुमचा विश्वासघातानें नाश करण्याचा त्याचा डाव आहे, यास्तव तडजोडीची आशा सोडून अगोदर मुंबईकर इंग्रजांच्या हल्ल्यापासून विजयदुर्गाचें रक्षण करण्याची तजवीज करा. नुसता विजयदुर्ग इंग्रजांच्या घशांत घालण्यापुरताच त्यांना म्हणावें, सुभेदार इंग्रजांना फितूर झाला नसून तुम्हांला जिवंत पकडून स्वाधीन करण्याचेंही त्या हरामखोरानें इंग्रजांना कबूल केलें आहे. ते सैनिक आपले घोडे फेंकीत जवळ जवळ येऊं लागलेले पाहून त्या तरुणानें घाईघाईनें आपल्या कमरबंदांतून एक मोहरबंद लखोटा काढून लक्ष्मीच्या हातीं देऊन सांगितलें, "हा लखोटा जिवापलीकडे जतन करून सरखेलांकडे पावता कर. दुसऱ्या कोणाच्या हातीं जर हा पडला, तर मोठा अनर्थ होईल, हें नीट ध्यानीं ठेवून वाग. एवढी भीक मला घाल."

"पण हा लखोटा कोणीं दिला आहे म्हणून सरखेलांना सांगूं?" लक्ष्मीनें प्रसंग ओळखून अवांतर कांहींही मनांत न आणतां विचारलें.

"श्रीपति गवळीच हा लखोटा घेऊन इंग्रजाकडे सुवर्णदुर्गावर निघाला होता, त्याचा पाडाव करून, हा मीं मोठ्या शिकस्तीनें मिळविला आहे, —रघुवीर बागवा असें माझें नाव त्याना सांग. मात्र शपथ आहे तुला सरखेलाच्या पायाची, या गोष्टीची कुठें वाच्यता करशील तर. इतकी महत्त्वाची व जोखमाची ही बाब आहे कीं बातमी बाहेर फुटली तर ती तुझ्या प्राणावर बेतेल.—"

"तुमच्यासारख्या उपकारकर्त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागताना प्राणावर बेतलें तर तें मी माझें भाग्यच समजेन." लक्ष्मी तो लखोटा घेऊन नीट काळजीपूर्वक आपल्या अंगावरील वस्त्राखालीं लपवून ठेवीत म्हणाली. त्या तरुणाविषयीं—रघुवीर बागव्याविषयीं कृतज्ञता व्यक्त करण्याची ही नामी संधी तिनें साधली. पण रघुवीर बागवा कोठचा कोण हें तिला माहीत नव्हतें व संकोचामुळें तिनें त्याची जास्त चिकित्सा ही केली नाहीं. तो आपणाप्रमाणेंच जातीनें उच्च कुलोत्पन्न मराठा आहे एवढें तिला कळलें, व त्यातच समाधान वाटलें.

"पण मला तू बळी पडायला नको आहेस, तू स्वीकारलेल्या कामगिरींत यशस्वी व्हावयाला हवी आहेस. आपण दोघेंही या कामगिरीप्रीत्यर्थ बळी पडलों, तरी मला त्याची मोठीशी मातब्बरी नाहीं. आमच्यासारखे लाख मरावे पण लाखाचा पोशिंदा उरावा." याप्रमाणें इकडे रघुवीर लक्ष्मीशीं बोलत होता, तरी समोरून धावत येणाऱ्या सैनिकाकडे त्याचें लक्ष्य सारखें वेधून राहिलें होतें. आता एथें लक्ष्मी जास्त वेळ उभी राहिल्यानें सर्वच कार्यनाश होईल असें पाहून त्यानें लक्ष्मीला झटकन घोड्यावर स्वार व्हावयाला सांगून वाटेला लावलें. लक्ष्मीही प्रसंग ओळखून कालहरण न करता घोडा घारीसारखा दौडीत तेथून भर्रर्रकन् निघून गेली.

तो तरुण मनातून परमेश्वराचें नाव घेऊन पुढें चालून येणाऱ्या प्रसंगाला तोंड देण्याला सज्ज झाला. पण आणीबाणीचा प्रसंग येऊन ठेपला तरी अगदीं अखेरच्या क्षणापावेतों जीव आपल्या संरक्षणाची धडपड करतोच. शक्य झाल्यास आपण शत्रूपासून आपला बचाव

करावा, नाहींतर लढत, मारामारी, मरण, काय वाट्याला येईल तें भोगण्याला आपली तयारी आहेच, असा मनाचा निर्धार करून तो बाजूला थोडी झाडी होती त्या झाडींत लपण्याचा प्रयत्न करू लागला. झाडी काटेरी करवदाची होती. वर काळींभोर पिकलेलीं करवदें घोंसा-घोंसानीं लटकताना पाहूनही तीं आत शिरून काढण्याचें धैर्य कोणाला झालें नसतें. पण तो तरुण बेलाशक त्या झाडींत घुसला. त्यानें काट्याची यत्किंचित् पर्वा केली नाहीं त्याला स्वतःच्या जिवापेक्षा स्वीकृत कार्याची जास्त पर्वा होती. काट्यानीं सर्वांगावर ओरखडे आले त्याचीही त्याला कांहीं क्षिति वाटली नाहीं तो प्राणभयानें लपला होता असेंही नाहीं. इतराना तें पाहून तसें वाटलें असतें यात नवल काय? स्वतः त्यालादेखील त्या झाडींत जाताना दुग्धा पडली, "मी प्राणभयानें एखाद्या भ्याडासारखा लपत आहें काय?" पण लगेच त्याचें त्याला उत्तर मिळालें, "नाहीं. माझ्या हातून अलोट स्वामि-कार्य पार पडण्याजोगें आहे. त्या कार्यासाठी तरी मला जगलें पाहिजे. तो हरामखोर सुभेदार सरखेलाशीं गोडी करणार नाहीं हें निश्चित. त्याला तें भांडण जास्त चेतवावयाचें आहे, व त्या होळीवर स्वतःची पोळी भाजून घ्यावयाची आहे. मुंबईकर इंग्रजानीं त्याला लाच देऊन जणू काय गुलामाप्रमाणें विकत घेतलें आहे. पेशव्याना सरखेलाशीं गोडी मनापासून हवी आहे, पण इंग्रजाना ह्या दर्यासारग आंग्र्यां-चा जगातून केव्हा एकदा नायनाट होतो असें झालें आहे. वजारत माब मानाजी आंग्रे दौलतीच्या आशेनें सरखेलाचा भाऊबंदकीच्या भरीं पडून नाश करण्यासाठीं इंग्रजाच्या आहारीं गेलेच आहेत, राहतां राहिले सरखेल. ते कांहीं अशा प्रकारें इंग्रजाच्या आहारीं जाऊन स्वजनद्रोह करावयाला तयार नाहीत म्हणून त्याचा सत्यनाश—इंग्रजा-ना आरबी समुद्रात आपल्या अनिरुद्ध जलसंचाराला नडणारा हा भयंकर नक्र गाडून टाकावयाचा आहे. प्रतिष्ठित मारेकऱ्याचें काम पार पाडण्यासाठीं सुभेदाराची इंग्रजाना गरज आहे. या वेळीं माझें कर्तव्य—त्याचें स्वतःचें कर्तव्य म्हणून पुण्याला जाऊन पेशव्याना इकडील सर्व

परिस्थिति त्यानें नीट समजून सागावयाची, व सुभेदाराविषयीं त्याना गैरसमज दूर करावयाचा, हें कार्य करण्याचें मनात योजिलें होतें. त्याला आशा वाटत होती कीं श्रीमत पेशवे सुभेदाराचा स्वार्थी पाताळयंत्रीपणा कळल्यावर तरी कोंकणपट्टींतील राज्यकारभारात त्याच्या तोंडानें पाणी पिण्याचें थाबवितील, आणि सरखेलाशीं गोडी करून आपल्या प्रभावळींत एका दैदीप्यमान वीररत्नाची अमोल भर घालतील."

त्या तरुण वीराच्या डोक्यात असे विचार घोळत असताना त्याला आपल्या पाठलागावर आल्यासारखे वाटणारे घोडेस्वार अगदीं जवळच्या विस्तीर्ण वटवृक्षाखालीं थाबलेले त्याला दिसले. त्यातील एका सुमारें पस्तीस वर्षाच्या उमरीच्या तेजस्वी स्वाराला तर त्या तरुणानें तत्काळ ओळखलें, व विस्मयपूर्वक मनात म्हटलें, "अरे! हा तर रुद्राजी धुळप! एकूण रुद्राजी जिवत आहे तर! परमेश्वरा, तुझी लीला अगाध आहे. मी इतके दिवस रुद्राजी जिवत नाहीं असें समजत होतों. पण तो तर भेटला याला मी जाऊन भेटू का?..."

तोंच रुद्राजीचें त्याच्या साथीदाराशीं चाललेलें त्रुटित संभाषण त्या तरुणाला ऐकावयाला मिळालें. "ज्या अर्थी श्रीपतीला पकडण्याची सुभेदाराची धडपड चालली आहे, त्या अर्थी श्रीपति आता सुभेदाराच्या विश्वासाला अपात्र ठरला आहे हें उघड आहे. तो सुभेदाराला वश असलेल्या जावजी गवळ्याचा मुलगा, या एकाच कारणावरून आपण त्याचा नाश करावयाला टपलों होतों. पण आता तो निश्चय आपणाला बदलला पाहिजे. श्रीपति जर भेटला आणि त्याच्याविषयींची आपली कल्पना खरी ठरली, तर त्याच्या मार्फत जावजीलाही आमच्या बाजूला वळवून सुभेदाराचा एक पराक्रमी हात आपणाला लुला करतां येईल."

ज्या साथीदाराशीं रुद्राजी बोलत होता, तो साथीदार त्याच्याजवळ पाठमोरा बसल्यामुळें त्या तरुणाला त्याचें स्वरूप दिसलें नव्हतें. पण इतक्यात त्या साथीदारानें रुद्राजीशीं बोलण्यासाठीं सहज मान फिरविली, तेव्हां त्याच्या करारी पण काहींशा त्रस्त झालेल्या चर्येकडे

पाहून त्या तरुणानें मनात म्हटलें, "अरे, हा तर दुल्लभजी मान्या-सारखा दिसतो!" तोंच त्याच्या उजव्या भुवईवरच्या भालप्रदेशा-वर दोन इंच लांबीची माव दिसली ती पाहून तर त्या तरुणाची खात्री झाली कीं हा दुल्लभजी मानेच आहे.

"पण हे दोघेही इकडे कसे? हे राजरोसपणें सुभेदाराच्या राजधानी-जवळ हिंडत आहेत! हे सुभेदाराला फितूर तर झाले नसतील ना? पण ते फितूर असणें त्याच्या आताच्या उद्गारावरून तरी शक्य दिसत नाहीं. तर मग–तर मग—"

तोंच दुल्लभजीच्या तोंडचे शद्ब त्या तरुणाच्या कानी पडले, "श्रीपति जर सरखेलाचा कैवारी असता, तर त्यानें माझ्या बाबाना ठार मारलेंच नसतें."

"होय. तेंही खरें आहे. पण—"

"पण बीण काहीं नाहीं. श्रीपतीनें माझ्या बाबाचा घात केला आहे, त्याला मी क्षमा करणार नाहीं. तो सापडेल तिथें त्याला मी गाठून ठार करीन, तेव्हाच बाबाचें सुतक फिटलें असें मानीन."

"आता याना जास्त वेळ सदेहात ठेवणें इष्ट नाहीं, मग परिणाम कांहीं झाला तरी हरकत नाहीं. माझी खात्री आहे, मी जर खरोखर स्वामिनिष्ठ व प्रामाणिक असेन, तर माझ्या शद्बावर हे वीर भरवसा ठेवणार नाहींत असें कधींच व्हावयाचें नाहीं..." असें स्वतःशीं निर्धारून तो तरुण एकदम त्या जाळीबाहेर पडला, व थेट त्या मडळी-पाशीं जाऊन म्हणाला, "दुल्लभजी, श्रीपतीवरचा तुझा राग सार्थ असला तरी तू म्हणतोस तसा श्रीपति अन्यायी नाहीं, हें सिद्ध करून देण्यासाठीं हा प्रत्यक्ष श्रीपति तुझ्यासमोर उभा आहे. याचा खुलासा ऐकून घ्यावयाला तुम्ही सर्व तयार असला तर ठीकच आहे, नाहीं-पेक्षा तुम्ही त्याला अविचारानें ठार करणार असाल तर खुशाल ठार करा. –मी तुमचा लवमात्र प्रतिकार नाहीं. कारण तुमच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे."

## प्रकरण आठवें

# इंग्रजांचें जहाज

" काय, पत्ता लागला ? "

" लागला सरकार ! "

" कोणाचें तें जहाज ? इंग्रजाचेंच ना ? "

" होय सरकार ! बातमी अशी मिळाली आहे कीं, सेनापति वॉटसन् याचा कोणी विश्वासू मदतनीस वुइलियम ह्युएट या नावाचा त्या जहाजातून येऊन बंदराची व किल्ल्याची पाहणी करून गेला."

"आणि तरीही आम्हाला दाद लागली नाही ! वाघाच्या जबड्यात मेंढरानें उडी घालून सुरक्षित निघून जावें ना ? ह्या तुळाजी आंग्र्याची विटंबना व्हावयाची बाकी ती काय राहिली ? इतका कडेकोट बंदोबस्त आम्हीं गडावर केला आहे, तरी दिवसाढवळ्या शत्रूचें जहाज येऊन टेहळणी करून गेलें. आता तारीफ कोणाची करावयाची ? इंग्रजाच्या चातुर्याची कीं आमच्या अकर्तेपणाची ? अरे ! माझ्यासाठीं—धन्यासाठीं नाहीतर नाही, स्वतःच्या मायभूमीसाठीं तरी काही धडपड करा कीं रे ! तुळाजी आंग्रे तिकडे मरो. पण तो जर मेला, तर सुभेदाराला साऱ्या कोंकणपट्टीत अनिरुद्ध संचार करायला रान मोकळें सापडेल, आणि मग मुंबईकर इंग्रज तुम्हाला आपल्या पायातल्या पायपोसाच्या मोलाचे करून सोडतील ! ही भावी दुरवस्था टाळण्यासाठी तरी जरा काही खाल्ल्या मिठाला जागाल की नाहीं ? एवढा शोध करून आणलात, त्याबरोबरच तें जहाज पकडून आणलेंत का ? "

" नाहीं सरकार ! "

" का ? एका जहाजाच्या पाठीवर दोन जहाजें मुद्दाम सोडलीं, तरीदेखील तुम्हाला तें जहाज पकडून आणता आलें नाहीं. तुम्ही

कोणी शेणामेणाची बाहुली होता का? निदान त्याचा पाडाव तरी केलात का?"

"नाहीं!"

"का? जोत्याजी! मी बोललों की कडू बोलतों म्हणून तुम्हाला राग येतो. पण एवढीदेखील कामगिरी तुला करता आली नाही! अजनवेलचा पठ्या पैलवान तू, अजनवेल हातची तशी वालवलीस, तरी तेव्हाच तुला कामचुकारपणाबद्दल शासन करावयाचें तें न करता मीं तुला इथें विजयदुर्गाच्या रक्षणासाठी मुद्दाम किल्लेदार नेमलें. तो इथें असा दगा देतो आहेस! काय–तुझ्या मनात आहे तरी काय? सुभेदारानें इतरांप्रमाणेंच तुला आणि तात्याबालाही भारून टाकलें नाहीं ना?"

मागील प्रकार घडल्यानतर आठव्या दिवशीं मोठ्या पहाटेची गोष्ट. विजयदुर्गावरील खाशाच्या महालाच्या गच्चींत वरील सभाषण चाललें होतें.

तुळाजी आग्ऱ्याचा मुक्काम तेव्हा विजयदुर्गावर होता. किंबहुना त्याला मुक्काम करावयाला सुरक्षित असें तेंच एक ठिकाण त्याच्या अफाट दौलतींत आजकाल असें उरलें होतें आणि तेंहा किती दिवस आपणाला लाभेल, याविषयीं त्याची त्यालाच खात्री वाटत नव्हती.

त्या दिवशीं मोठ्या पहाटेला तुळाजी जो उठला–उठला कसला; रात्रभर तो जागाच होता. आधल्या दिवशीं भर सूर्योदयाच्या सुमाराला एका विचित्र जहाजानें विजयदुर्गाच्या बदरात प्रवेश केला, व थोडा वेळ इकडे तिकडे हिंडून पोबारा केला, तेव्हापासून त्याला वाटू लागलें होतें कीं, आपली सद्दी खरोखरच सपली. पूर्वपुण्यायी किंवा पूर्वजाची पुण्यायीही आपल्या गाठीला लवमात्र उरली नाहीं. नाहीं तर जिथें कोंकणपट्टीच्या समुद्रकिनाऱ्यावरून कोणतेंही परकें जहाज आग्ऱ्याच्या निशाणाला वदन करून आग्ऱ्याची कृपा सपादन केल्या-खेरीज अलीकडे पलीकडे जाऊच शकत नसे, शरण गेल्यावरदेखील मरण चुकेलच अशी तिथें प्रतिस्पर्ध्यांच्या कोणाही जहाजाला आशा

वाटत नसे इतका ज्या तुळाजी आंग्र्याचा मुंबईपासून कारवार–गोव्या-पावेतों साऱ्या कोंकणपट्टीतून विलक्षण दरारा, त्याच तुळाजी आंग्र्या-च्या नाकावर टिच्चून त्या कोणा परक्या मुरख्या जहाजानें बंदरांत राजरोस दिवसाढवळ्या प्रवेश करावा, आणि आपलें निशाण उभारून आपली ओळखही देऊं नये अथवा गडावर फडफडणाऱ्या आंग्र्याच्या निशाणाला सलामीही देऊं नये! आणि चौकशी करतांच बेदरकार-पणें तेथून निघून जावें! —हा प्रकार तुळाजीसारख्या मानी वीरा-च्या हृदयाला झोंबणारा होता यांत शंका नाहीं तुळाजीनें जन्मांत कधीं असला अपमान सहन केला नव्हता.

पण तुळाजीच्या हृदयाला झोंबला तो प्रकार हाही नव्हे, याच्या-पुढचा. शत्रूच्या अज्ञात जहाजानें एक आंग्र्याची सत्ता झिडकारून आंग्र्याच्या बंदरांत प्रवेश केला. पण कोणत्याही वेळीं शत्रूशीं दोन हात करतां यावे अशा पूर्वयोजनेनें गडाच्या प्रत्येक बुरुजावर तोफा बंदुका सज्ज असतां, आणि कोणतेंही संशयित जहाज समुद्रांतून जातां येतांना दिसलें तर त्यावर एकदम तोफाबंदुकांचा वर्षाव करून त्याला बुडवावें अशी तोफखान्याला सक्त आज्ञा असतां त्या चोरट्या निनावी जहाजावर एकही तोफ डागली जाऊं नये? आरमारी काफिला याच बंदोबस्तासाठीं बंदरांत उभा असतां त्यानेंही त्या उपऱ्या अज्ञात जहाजाचें शासन करूं नये? तें जहाज खाडींतून थेट गोदीपावेतों फेरफटका करून आलें तरीदेखील त्याला कोणीं हटकूं नये? प्रत्येकाला सक्तीच्या ताकिदी देऊनदेखील इतकी दिरंगाई? इतका हलगर्जी-पणा? आपण होऊन सिंहाच्या गुहेंत चालून जाऊन तिथें सिंहाशीं झुंज खेळणारे मर्द दरोबस्त सभोंवार असतां जबड्यांत आलेलीं पाखरें आणि मेंढरेंही त्यांना मारतां येऊं नये? ज्यांच्या हिंमतीवर तुळाजीनें आजवर पाणी जाळलें आणि परक्या गोऱ्यांच्या कुशल आरमारालाही पाणी पाजून दे माय धरणी ठाय करून सोडलें, त्यांनींच साध्या सुध्या गोष्टीनदेखील इतका बेहिंमतीपणा दाखवावा याचा अर्थ काय? हा बेहिंमतीपणा त्या लोकांच्या अंगीं अलीकडे दोन तीन वर्षांपासून

बाणला होता. पण तो का बाणला होता, याची मात्र तुळाजीला नीटशी दाद नव्हती

आजही तुळाजीनें ते परकें जहाज बदरात येऊन सुखरूपपणें माघारें जाऊ शकलें कसें याबद्दल आपल्या लोकाना पुष्कळ दोष दिला, आणि तो सर्व जणानी ऐकूनही घेतला. शाब्दिक माराच्या जखमा त्याच्या शरिरावर थोड्याच होतात! त्याना माहीत होतें, आपल्या धन्याचा राग म्हणजे वळिवाच्या सरीचे शिंतोडे. सर आली काय आणि गेली काय, तिची कोण इतकी पर्वा करतो!

असल्या नकर्तेपणाबद्द तुळाजीनें आपल्या लोकाना पुष्कळ दोष दिला, व अखेर त्या अज्ञात जहाजचें शासन करण्यासाठीं आनद-राव सुर्वे आणि तात्याबा विचारे ह्या दोघा वीराना दोन जहाजें घेऊन पाठविलें. हे दोघेही धीर काहींसे वेजीं उतरलेल्या मोत्यासारखे असले, तरी तीं मोतीं—त्याच्या पूर्वपराक्रमाकडे लक्ष देता—पाणीदार होतीं यात शका नाहीं. आनदराव सुर्वे हा मूळचा माणिकगडचा गडकरी. धोंडजी शिंदे या पेशव्याच्या सरदारानें कर्नाळा व माणिकगड हे लागोपाठ चार वर्षापूर्वी जिकले, तेव्हा आनदराव पराभव पावून तुळाजीच्या आश्रयाला आला. तुळाजीलादेखील प्रथम आश्चर्य वाटले कीं इतका धडाडीचा वीर पराजित कसा झाला? त्या शकेचें निराकरण आनदरावानें केलें की दोन्ही गडावरचे लोक धोंडजी शिंद्याला फितूर झाल्यामुळें आपला नाइलाज झाला, व तुळाजीनें-ही त्यावर विश्वासून आनदरावाला आपल्या पदरी ठेवलें. पुढें अजनवेल-या किल्ल्याचें रक्षण करण्याकरिता तेथील किल्लेदार तात्याबा विचारे याच्या मदतीसाठीं त्यानें आनदरावाला तिकडे पाठविलें. पण तेथेंही त्या दुकलीचा रामाजीपत व इग्रज याच्या जोरकस सयुक्त सैन्यापुढें निभाव न लागल्यानें अजनवेलाचा किल्लाही शत्रुपक्षाच्या भक्ष्यस्थानी पडला. तेथें पराजय पदरीं येण्याचें कारण रामाजीपतानें माजविलेली फितुरी होय, असें तुळाजीला आढळून आल्यावर त्या पराजयाबद्दलही त्यानें आनदराव व तात्याबा याना दोष न देता त्याना

विजयदुर्गावर आणविलें, व तात्याबाला विजयदुर्गावरच्या बदोबस्ताचें काम सागून काहीं आरमारी जहाजें त्याच्या ताब्यात दिलीं. आणि आनदरावाला खारेपाटणच्या ठाण्यावर रुद्राजी धुळप व दुल्लभजी माने याच्या दिमतीला पाठविलें

पण काय असेल तें असो, आनदरावाचा खारेपाटणच्या हल्ल्यातही काहीं उपयोग झाला नाहीं रामाजीपताचा प्रमुख हस्तक जावजी गवळी याने त्या ठाण्याचाही धुव्वा उडविला व दुल्लभजी, रुद्राजी आणि आनदराव या तिघानाही कैद केलें त्या कैदेतून आनदराव कसाबसा निसटला, व जीव बचावून विजयदुर्गाला माघारा आला.

असा सतत पराजय पदरी पडलेला पाहून तुळाजीला वाटलें कीं आपले नशीबच खोटें आहे, त्यासारखी आपली ज्या त्या ठिकाणीं राळ उडते. पण म्हणून त्याला हातपाय जोडून थोडेच स्वस्थ बसता येण्याजोगें होतें ! त्याने त्याच लोकाना हाताशी धरून निदान विजयदुर्ग तरी राखण्याचें ठरविलें होतें आनदराव व तात्याबा हे दोन खदे वीर जसे पट्टीचे रणधीर तसे पट्टीचे दर्यासारगही आहेत, शिवाय गेल्या पाच चार वर्षांत पेशवे, रामाजीपत व इग्रज याच्याशीं आणीबाणीच्या प्रसगीं टकरा देऊन त्याना त्या प्रतिस्पर्ध्यांच्या युद्धकौशल्याचा व तयारीचा बराच अदाज आला आहे, असें पाहून त्यांच्या अनुभवाचा फायदा आपण आपल्या पडत्या काळांत होईल तेवढा करून घ्यावयाचा, असा तुळाजीचा मानस होता

त्याच दोन मोहऱ्याना तुळाजीनें आज त्या अज्ञात जहाजाचा पाठलाग करून त्याला शासन करण्याला पाठविले होतें.

पण दुपार झाली, सायकाळ झाली, रात्र झाली, तरी आनदराव अथवा तात्याबा यापैकी कोणीच माघारें आलें नाही, किंवा त्याच्याकडची काही बातमीही कळली नाहीं, त्यामुळें तुळाजीच्या जिवाला हुरहूर लागून राहिली होती, "हे दोन मोहरे तिकडेच इरेला पडले कीं काय?"

त्या चिंतेनें तुळाजीला त्या रात्रीं धड झोंपही आली नाहीं. म्हणून

त्यानें रातोरात आपल्या विश्वासातील पुरोहित यज्ञेश्वरशास्त्री याला बोलावून आणून प्रश्न विचारला. तेव्हा यज्ञेश्वरशास्त्र्यानें सांगितलें, "दोघेही संकटांत सांपडले आहेत, तथापि संकटनिवारण होईल. कार्य-लाभ होणें मात्र दुर्घट."

ह्या भविष्याला आधार काय, असें जर कोणा ज्योतिःशास्त्रकोविदानें यज्ञेश्वरशास्त्र्याला विचारलें असतें, तर त्यानें काय उत्तर दिलें असतें, व तें उत्तर समाधानकारक असतें कीं नाहीं, अशी शंका प्रसंगामुळें भाविक बनलेल्या तुळाजीच्या मनाला तेव्हां शिवलीदेखील नाहीं. त्याचा यज्ञेश्वरशास्त्र्यावर पूर्ण भरवसा बसण्याला कारण, यज्ञेश्वरशास्त्री हा एका काळीं—सुमारें चार वर्षांपूर्वीं रामाजीपंत बिवलकराचा आश्रित व रामाजीपंताना गुरुस्थानीं पूज्य असा त्रिकालदर्शी ज्ञाता म्हणून प्रख्यात पावलेला पुरोहित होता. पण पुढें कांही कारणामुळें रामाजी-पंताशीं त्याचें वितुष्ट आल्यामुळें त्याला तेथून जीवरक्षणार्थ पळ काढून तुळाजीच्या रक्षणाला येऊन राहणें प्राप्त झालें होतें. बाणकोटचा सुवर्णदुर्ग रामाजीपंत व इंग्रज यांच्या भक्ष्यस्थानीं पडेपावेतों यज्ञेश्वर-शास्त्री तेथेंच राहून देवपूजा व धन्याच्या अर्थात् तुळाजीच्या अभिष्ट-सिध्यर्थ अनुष्ठानें वगैरे करी, व सुवर्णदुर्ग पडल्यावर शास्त्रीबुवाची स्वारी त्याच कामगिरीवर विजयदुर्गावर तुळाजीपाशीं येऊन राहिली होती.

तात्पर्य, आनंदराव सुर्वे आणि तात्याबा विचारे या दोघाप्रमाणेंच यज्ञेश्वरशास्त्री हेंही एक वेजीं उतरलेलें पण पाणीदार मोतीं होतें. त्याला वेजीं उतरलेलें मोतीं एवढ्याचसाठीं म्हणावयाचें कीं ज्या यज्ञेश्वर-शास्त्र्याच्या ज्योतिषविषयक भविष्यवादी सल्ल्याखेरीज रामाजीपंता-सारख्या कोंकणपट्टीच्या त्या काळापुरत्या तरी अनभिषिक्त राजाचें जें पानही हालत नसे, त्याला आज त्या राजाश्रयाला मुकावें लागलें होतें. पण इतका विद्वान ब्राह्मण—तो विपन्नावस्थेप्रत घरंगळत येऊन पोहोंचला तरी त्यामुळें त्याची विद्वत्ता मुळांत असेल ती थोडीच घरंगळते! राजानें आपल्या मस्तकावरचा सुवर्णमुकुट काढून मातींत फेंकला, तर

ती त्या मुकुटाची अप्रतिष्ठा झाली. पण म्हणून काय त्याच्या बावन कशी सुवर्णाचा कस थोडाच कमी होतो!

तुळाजी पिंजऱ्यात कोंडलेल्या वाघाला खडे मारण्यासारख्या हीन प्रवृत्तीचा नव्हता. त्यानें यज्ञेश्वरशास्त्र्याच्या पडत्या काळाचा अवास्तव फायदा मुळीच घेतला नाहीं. राजकारण मात्र त्यानें आपल्या मनानें त्यात एवढेंच लढविलें, "रामाजीपंतावर असंतुष्ट झालेला हा सामर्थ्य-वान ब्राह्मण आपणाला धारजिणा झाला तर रामाजीपंताचे डावपेंच ओळखण्याच्या कामीं याचा उपयोग होईल तेवढा आपण का करून घेऊ नये?"

यज्ञेश्वरशास्त्र्याच्या ज्योतिःशास्त्रनैपुण्याचा तुळाजीला कार्यक्षम बन-ण्याच्या कामीं किती उपयोग होत असेल तो असो, पण ज्योतिषावर विश्वासून तो अलीकडे बराचसा दैववादी बनला होता हें मात्र खरें. उदाहरणार्थ, थोड्याच दिवसापूर्वी—अवघ्या दोन महिन्यापूर्वी कान्होजी आंग्र्याकडून 'आपण दोघे एक होऊ व दौलत राखू' अशा आशयाचें कळकळीचें पत्र आलेलें असताना त्या पत्राचें काय करावयाचें, या-विषयीं तुळाजीच्या सभोंवारच्या मंडळींत चांगलाच मतभेद माजला होता. काहीं मंडळींचें—विशेषतः तुळाजीची पत्नी, मेहुणा सुजनसिंग वगैरे मंडळींचें मत ताबडतोब मानाजीशीं एकी करून मग तुल्यबलानें साधल्यास पेशव्याशीं तह करावा अथवा इंग्रजाना हाताशीं धरून पेशव्याचा नक्षा उतरावा असें होतें, तर त्याची प्रियतमा प्रभावति हिचें मानस, तूर्त ग्रह अनुकूल नसल्यानें कोणतीच हालचाल ते ग्रह महिन्यानें पालटेपावेतों करू नये असें होतें. सरस्वति स्वतः ज्योतिः-शास्त्र जाणत नसे, अथवा ती त्रिकालज्ञानीही नव्हती. पण ती यज्ञेश्वर-शास्त्र्याची सच्छिष्या होती. परमेश्वरानें जणू यज्ञेश्वरशास्त्र्याच्या रूपानें भूतलावर—आंग्र्याच्या दौलतींत नवा अवतार घेतला आहे व तो आपलें मंगल करणार आहे, असा प्रभावतीचा त्याच्या ठायीं भरवसा असल्यानें ती कोणतीही गोष्ट करावयाची झाली तर यज्ञेश्वरशास्त्र्याच्या अनुज्ञेखेरीज करीत नसे, व तुळाजीला करू देत नसे. तुळाजीलाही

प्रभावति ही पचप्राणाहून प्यार असल्यानें तिनें टाकलेला शब्द त्यानें ओलाडावा असे कधींच होत नसे. मानाजीकडून वकील आल्यावर आता पुढें कसें करावयाचें याबद्दलची सल्ला तुळाजीनें सर्वांच्या अगोदर प्रभावतीची घेतली सरस्वतीने प्रथम आपल्या गुरूला कौल लावला. आणि गुरूनें महिना दीड महिना ग्रह प्रतिकूल असल्यानें स्वस्थ रहा असें सागताच तिनें तुळाजीला तशी गळ घातली

मग काय! धर्मपत्नी, मेहुणा सुजनसिग, व इतर अनेक थोरथोर मंडळी याचें मानस मोडून तुळाजीनें मानाजीशी बधुभावानें मैत्री करण्याचें नाकबूल केलें. आणि नुक्तेच आठ दिवसापूर्वी ग्रह अनुकूल झाल्यावर त्याच मानाजीशीं मैत्री करण्याबद्दलचें बोलणें सुरू झालें होतें तेंही यज्ञेश्वरशास्त्र्याच्याच अनुज्ञेला अनुसरून.

तो प्रयत्न यशस्वी व्हावा, म्हणून विजयदुर्गावर केवढें प्रचड हव्य-कव्य झालें! मानाजीकडे पाठवावयाचें मैत्रीचें पत्र अचूक प्रभावी ठरावें यास्तव किती प्रकारानीं मतरण्यात आलें! त्यासाठी अनिष्ट ग्रहांना तृप्त करण्याकरिता किती दानधर्म करावा लागला! तें सर्व तुळाजीनें केलें होतें, व एवढे महत्त्वाचें राजकारण पार पाडण्याचे कार्य खुद्द यज्ञेश्वरशास्त्र्यानें शिरावर घेतलें होतें.

तें कार्य यथावत् पार पाडून नुक्ताच यज्ञेश्वरशास्त्री माघारा आला होता. बी रुजत पडली होती, तिचा विस्तार व्हावयाचा होता. तो विस्तार होऊन तें राजकारण फलद्रूप होण्यापूर्वी तुळाजीच्या घरांत गृहकलहानीं जरी चागलाच पेट घेतला होता, प्रभावतीला जरी घरची इतर सर्व मडळी पाण्यात पाहू लागली होती व त्यामुळें तुळाजीचा त्या मडळीवर कोप झाला होता, तरी राजकारणाच्या अमृतसिद्धीपुढें त्या गृहकलहाची काय मातब्बरी! यज्ञेश्वरशास्त्र्यानें त्रिकालज्ञानानें भविष्यकाळ ओळखून तुळाजीला अगदीं उशाखाली हात ठेवून झोंपावयाला सागितलें होतें, व मसलत यशस्वी करण्याची सारी जबाबदारी एकट्याच्या शिरावर घेऊन ती पार पाडण्याचें आश्वासनही दिलें होतें. त्यासाठीं जारणमारणाचे प्रयोगही गडावर जारीनें सुरू होते.

त्या दिवशीं तें अज्ञात जहाज येऊन टेहळणी करून गेलें, तें संकटनिवारणही जारण मारणाच्या जोरावर करण्याचे पूर्ण आश्वासन देऊन यज्ञेश्वरशास्त्री स्वस्थानी निघून गेला पण तुळाजीची चिंता त्या आश्वासनानें फारशी कमी झाली नाहीं जारणमारणाच्या प्रभावानें शत्रुनाश होईल तेव्हा होईल, तूर्त तात्याबा व आनंदराव त्या जहाजाच्या मागावर दोन जहाजें घेऊन गेले आहेत त्याची गत काय झाली असेल न कळे, या चिंतेनें त्याला घेरले होते. त्या दोघांच्या शोधार्थ व साह्यार्थ आणखी जहाजें पाठविण्याचाही त्याचा मानस होता. पण यज्ञेश्वरशास्त्र्याला सल्ला विचारता त्यानें वेळ प्रतिकूळ असल्याचें सांगितलें व मंत्रप्रभावानें अनिष्ट निवारण करण्याचें पुन्हा आश्वासन दिलें, आणि प्रभावतीनेंही गुर्वाज्ञेविरुद्ध कांहींही न करण्याची विनति केली, तेव्हां तुळाजी आणखी काही वेळ—उजाडेपावेतों वाट पाहण्याचें कबूल करून स्वस्थ बसला.

पण शरीर स्वस्थ राहिलें तरी मन कुठें त्याला स्वस्थ राहूं देतें! तें एकसारखें तळमळून तर्क—वितर्क—कुतर्क करण्यात चूर होतें, तें अज्ञात जहाज कोणाचें बरें असेल? त्यानें आपल्या जहाजाचा पाडाव केला असेल का? तात्याबा आणि आनंदराव यांच्या जिवाला कांहीं दगाफटका तर नसेल ना झाला?

मनांत अशी तळमळ, व रात्रभर झोंपही लागली नाहीं. म्हणून कंटाळून मोठ्या पहाटेला तो बिछान्यावरून उठून महालाच्या गच्चींत येऊन विचार करीत उभा रहातो, तों सहज वर आकाशाकडे नजर जातांच चंद्राला खळें!

"दुर्दैव माझ्या हात धुवून पाठीमागें लागलें आहे असें दिसतें." असें त्या चंद्राच्या खळ्याकडे पाहून तो मनांत म्हणतो आहे, तोंच हुजऱ्यानें येऊन वर्दी दिली, "आनंदराव सुर्वे माघारा आला आहे."

तुळाजीनें ती बातमी अगदीं सोन्याचे कान करून ऐकली, व तात्याजीला ताबडतोब वर पाठवून देण्याला हुजऱ्याला सांगितलें पण शुभवार्ता ऐकण्यासाठीं तो सोन्याचे कान टवकारून उभा असला तरी

त्या कानांना बातमी मात्र तशी मातीमोलाची ऐकावयाला मिळाली.

"सुभेदारानें तुला आणि तात्याबाला मारून तर टाकलें नाहीं ना?" हे शब्द तुळाजीच्या मुखावाटे अगदीं सहज निघाले त्यातून म्हणजे त्याच्या मनातून आनंदराव व तात्याजी याच्यावर फितुरीचा आरोपच करावयाचा होता असें कांहीं नाहीं. पण ते उद्गार त्याच्या मुखावाटे अगदीं निर्हेतुकतेनें निघाले होते असेंही नाहीं. तो त्या दोघांवर बेइमानीचा आरोप न करता स्वतःच्या अडचणलेल्या परिस्थितीविषयी खंत मानीत होता त्याला माहीत होतें कीं आपला पडता काळ आहे, यावेळीं पेशव्याना दया सुचली तरच आपला निभाव लागणार, नाहीपेक्षा आपला नाश हा ठेवलेला आहे. हीच स्थिति ध्यानीं आणून आपल्या पदरचे विश्वासू सेवक व सरदारही, शिशिरऋतूंत पालवी वृक्षाला सोडून जाते व जलदेखील नदीनाल्याना सोडून जातें त्याप्रमाणें आपणाला सोडून जाणार नाहीत कशावरून? त्यानीं सोडून जाऊ नये हें उत्तम, हीच त्याची खरी दानत. पण इतक्या यथावत् दानतीला जागणारा माणसें दारोदार थोडींच पडलेलीं असतात!

आता, भांबावलेल्या मनस्थितीत धनी कांहीही बोलले तरी तें त्या अर्थानें मनावर न घेता उलट धन्याचें शांतवन करणें, हे वास्तविक कोणाही स्वामिनिष्ठ सेवकाचें काम पण आनंदरावानें तितका विचार न करता चिडून बेपर्वाईनें एकदम उत्तर दिले, "इतका जर सरकाराचा आमच्या ठायीं अविश्वास असेल, तर शेळी जाते जिवानिशीं आणि खाणारा म्हणतो वातड असें हवेंच कशाला? सरकारानीं मला जा म्हणून सांगण्याच्या अगोदर मीच एथून पोटाचा रोजगार पाहण्यासाठीं दुसरीकडे कुठेंही जावयाला तयार आहें."

"अशी एकदम डोक्यात राख घालू नकोस. जरा शांतपणा धरून बोल मी तुझ्यावर अविश्वास दाखविला नाही. अविश्वास दाखवून मी काय करू? मला तारणें अथवा मारणें आता सर्वस्वी तुमच्या हातीं आहे." तुळाजी काकुळतीच्या भाषेंत म्हणाला.

नेमके तेव्हांच चार दवबिंदु त्यांच्या मस्तकावर गळले. देवा-दिकाना त्या कर्दनकाळाची अशी केंविलवाणी कुचंबणा झालेली पाहून दुःख वाटलें, त्याच्या नेमातून तीं जणू आसवें गळलीं नाहीं तर एरव्हीं? –नोकरानें भल्या बुऱ्या कशाही कारणासाठीं आपल्या शद्वा-वर उलटून नुसती वर नजर केली तर तापलेल्या साडसानें डोळे फोडून काढावयाला कमी न करणारा कर्दनकाळ तो!

आनंदरावाच्याही मनात दया उपजली असो, कीं त्याला स्वामिभक्ति आठवली असो, त्यानेंही किंचित् ओशाळून अमळ खालच्या स्वरात म्हटलें, "सरकार! आम्ही जर तें जहाज बुडविण्याचें मनात आणलें असतें, तर तें आम्हाला अगदी अशक्य होतें अशातली गोष्ट नाहीं."

"मग तें का नाहीं बुडविलेंत?"

"तें आम्ही आपणासाठीं नाहीं बुडविलें समजा, आम्ही तें जहाज इंग्रजाचें आहे असें कळल्यावरदेखील त्याच्यावर तोफा डागल्या असत्या, तर इंग्रजानी चिडून लगेच आपणावर हल्ला केला नसता का? मग आपली काय अवस्था झाली असती? आज शत्रूशी दोन हात करण्याचें सामर्थ्य आपल्या आंगीं आहे का? नीट परिस्थिति ध्यानीं आणा. श्रीमंत पेशव्याशीं तह करण्यासाठीं आज इतके दिवस आपले भगीरथ प्रयत्न चालले आहेत, ते फलद्रूप होण्याचीं चिन्हें आता कुठें निश्चित दिसू लागलीं आहेत अशा वेळीं आपण इंग्रजाशीं नव्यानें दावेदारी माडली, तर इंग्रज आणि पेशवे एकजुटीनें आपलें पारिपत्य करण्या-साठीं टपून बसले आहेत तडजोडीचा सारा बेत मग फिसकटून गेला नसता का?"

"होय, तेंही खरें आहे" तुळाजीनें 'मगरी, मगरी, तुझी पाठ मऊ' या न्यायानें नमतें घेऊन म्हटलें, "बरें तात्याबा कुठें आहे?"

"माझ्या समजुतीप्रमाणें तो जैतापुरात थाबला असावा. प्रति-पक्षाचे बेत काय काय चालले आहेत ते कळले तर पहावे या उद्देशानें तो तिकडे गेला असावा."

"ठीक आहे. तू दमला असशील, जरा विश्राति घे जा. आपण

मग उद्यां सायंकाळीं अवातर गोष्टींचा विचार करू." असें म्हणून तुळाजीनें आनदरावाला निरोप दिला.

"बरें गवळी, माणकर, सुभेदार यापैकीं कोणाकडची कांहीं खबर कळली का?" जातां जाता आनदरावानें विचारलें.

"नाहीं." तुळाजी उत्तरला.

आनदराव निघून गेल्यावर पुन्हा तुळाजी गच्चीवर येरझारा घालीत विचार करू लागला. वर पाहताना चद्राला खळें पडलेलें दिसलें. तो देखावा पाहवेना म्हणून सभोंवारच्या दर्यावर त्यानें नजर फेंकली, तों दर्याची प्रत्येक लाट आनदरावाप्रमाणेंच तुच्छतेनें व बेपर्वाईनें आपणाला वाकुल्या दाखवीत आहे असा भास त्याला झाला. वारा इतका सोंसाट्याचा सुटला होता, पण तो कसा तो त्याच्या अगाला झोंबेनाच. अतःकरणात आग भडकलेली असतांना वाऱ्याच्या गारव्याचें काय होय?

## प्रकरण नववें

# तुळाजीच्या मनांतले विचार

उणी पुरी पाव घटका लोटते न लोटते, तोंच कुशाबा हुजऱ्या आतून बाहेर आला, व तुळाजीला म्हणाला, "धनीसाहेब! बाहेर थंडी मी म्हणते आहे. पाखरेंदेखील मरून पडावयाचीं अशा थडींत. आपण आत चला पाहू!"

"असें आहे कुशाबा," तुळाजी येरझारा घालता घालतां मध्येंच कुशाबापाशीं थाबून म्हणाला, "माणसाना पायबद असतात तसे पांखराना नसतात काहीं. माणसें नुसतीं चालतात, धावतात, पण सकटासमोर माणसाची अडवणूक होते. तिथें पाखरें भुर्रकन् उडून जातात. खरें ना? तसें आपणाला उडून जाता येत नाहीं, म्हणून आपण ह्या थडींतच काकडून मेलें पाहिजे."

"होय. पण हें कोणत्या उद्देशानें धनीसाहेब बोलत आहेत मला कळत नाहीं." कुशाबा फिकिरींत पडल्यासारखा आपल्या डोक्यावरचे पिकले कैंस विचाराच्या भरात हळूहळू ओरबाडीत म्हणाला.

"त्यात कळण्याजोगें काय आहे? आणि आता कळून उपयोग तरी काय त्याचा कुशाबा? ह्या तुळाजी आंग्र्याची अवस्था आता कळून सवरूनदेखील अगदीं खुळ्यासारखी झालेली नाहीं का? मला आजवर काहीं कळलें नाहीं व कळतही नाही असें नाही. रामाजीपत बिवलकरासारख्या मात्रागमनी पाताळयंत्र्याला श्रीमत पेशव्यानीं कोंकणप्रांताच्या सुभेदारीवर नेमलें तें येनकेन प्रकारेन आंग्र्याचा निःपात करण्यासाठीं, हें मला कळत का नव्हतें? पण कळून सवरूनही मी आजवर माझ्या दौलतीचें रक्षण होण्यासाठीं त्याच्याच तोंडानें पाणी पीत आलों कीं नाही? आज इतकी वर्षे बिवलकर माझ्या दौलतींत

परोपरीनें फदफितुरी करीत आहे बहुतेक सारे गडकोट, सारीं ठाणीं त्यानें फितुरीच्या जोरावर जिंकून आंग्र्याना आजूबाजूला सरकावयाला जागाच नाहींशी केली आहे. खडूजी माणकर, जावजी गवळी, मालोजी गवळी, वगैरे मातबर सरदार जे वशपरपरेनें आंग्र्याच्या जिवासाठीं जीव देण्याच्या तयारीनें आंग्र्याच्या दौलतीची आबादानी राखण्यासाठीं झटावयाचे, तेदेखील आज माझ्यावर उलटले, आणि माझ्या सहाराला सिद्ध झाले ही सारी त्या रामाजीपताची करामत. सुवर्णदुर्ग माझा जिंकून मला तेथून परागदा व्हावयाला लावणार—"

"जावजी गवळी आणि खडूजी माणकर ते दोन सरदार जर स्वामिद्रोही निपजले नसते, तर सुवर्णदुर्गावर पेशव्याची सरशी झाली नसती, आणि खारेपाटणही पाडाव झालें नसते. परमेश्वर त्या स्वामिद्रोही चाडाळाचा सत्यनाश करो" कुशाबा सतापानें खदिरागारासारखा लाल होऊन उद्गारला त्याच्या मनातून आनदराव, तात्याबा व यज्ञेश्वरशास्त्री याच्याविषयींही सशयास्पद काहीं बोलावयाचें होतें. पण त्यानें जीभ आवरली

"त्याच्या नावानें बोटें मोडण्यात काय हाशील कुशाबा? जिकडे झाड कोसळून पडणार तिकडे त्या झाडाच्या फांद्याही कोसळून पडणार, हें ठरलेलें. फांद्याना झाडावेगळें अस्तित्व थोडेंच असतें! रामाजीपत हा पेशव्याचा कोंकणपट्टींतील मुख्य सुभेदार व सर्वाधिकारी, आणि आंग्रे काय, माणकर काय किंवा गवळी काय, कोंकणपट्टींतील सारे सरदार शिलेदार मराठशाहीचे सेवक. हे सारे वीर कर्णार्जुनासारखे पराक्रमी खरे, पण शौर्याइतकी मुत्सद्देगिरी त्याच्या आगीं नाहीं. हा त्याचा दोष नव्हे माणकर काय किंवा गवळी काय, शिवचापासारखीं अथवा रामबाणासारखीं पाणीदार शस्त्रेंच खरीं. पण असलीं शस्त्रें सिद्ध करावयाला वीराची गरज असते."

"वीराची गरज नसते, कावेबाज डावपेंची माणसाची गरज असते. शस्त्रास्त्रें कितीही पाणीदार व प्रभावी असलीं तरी तीं निर्जीव आपण होऊन तीं थोडीच एखाद्यावर तुटून पडतात! आणि एखाद्यावर

तुटून पडताना हा शत्रु व हा मित्र, हा साव हा चोर, इतका सारा सार विचार विचार त्याना थोडाच असतो! ज्याच्या हातीं तीं शस्त्रें लागतील तो शूर—तो वीर—तो पराक्रमी—सर्व काहीं तो! तो मग कोंकणपट्टीचा मालक आंग्रे असो, कीं आंग्र्याच्या राशीला आलेला रामाजीपंत बिवलकरासारखा कलिपुरुष असो ''

''तेंच मी तरी म्हणत होतों.''

''आपण म्हणाला की रामाजीपंत वीर आहे. पण तो वीर कसला? जिकडे तिकडे चोरटेपणानें फंदफितुरी करून स्वजनाचा घात व दौलतीची वाताहात करणें ही वीरपणाची लक्षणें काय? असली बदनेकी कोणीही करील.''

''नाही. कोणीही करणार नाहीं. कोणा वाटेल त्या माणसाला तें करता येणार नाही तूंच सांग, तूं असें करशील काय? आज माझ्या जिव्हाळ्याच्या मूठभर आधारापैकीं तूं एक आहेस. तूं जर मनात आणशील तर रामाजीपंताला सामील होऊन माझा केसानें गळा कापू शकशील म्हणून काय हें कार्य तुझ्या हातून होईल? महिपति तुझाच जावई, तो ऐन पंचविशीच्या उमरीचा तरुण असला तरी त्याची गोष्ट काहीं निराळी आहे. आज तुझ्याप्रमाणेंच त्याच्याही मांडीवर मस्तक ठेऊन मी निश्चितपणें झोंप घेऊ शकतों. तो माझ्या आरमाराचा सेनापति या नात्यानें त्याची योग्यता फार मोठी आहे. म्हणूनच त्याला मीं मुद्दाम देवगडावर आणविलें ना? आरमाराचा एक सेनापति तसा गडकरी या नात्यानेंही त्याची योग्यता फार मोठी आहे. त्याला वश करण्याठीं रामाजीपंत काय, मुंबईकर इंग्रज काय, आपापल्या जिवाचें मारे रान करीत आहेत. पण त्याना तो वश होईल काय? माझी खात्री आहे, कीं तो जर त्याना वश झाला, तर त्याला लाखों रुपयाची जहागीरी मिळेल. पेशवे तर त्याला एखाद्या प्रांताचा तालेवार सुभेदारही बनवून सोडतील. बरें; माझ्यासारख्या दुबळ्या धन्याच्या कपाळाला कपाळ घासून हालअपेष्टात दिवस काढण्यापेक्षा आणि धन्यासाठीं सदैव तळहातावर शीर घेऊन रणा-

गणावर एक पाय पृथ्वीवर तर दुसरा पाय स्वर्गात अशा पवित्र्यानें उभें राहाण्यापेक्षा सामर्थ्यवान बिवलकराची बाजूच कोणालाही इहलोकीं वैभवसपन्न बनविण्याला पुरेशी आहे. हें तुलाही माहीत आहे, व महिपतिदेखील हें पुरतेपणीं जाणतो म्हणून काय तो असलें पाशवी साहस करण्याला तयार होईल ? ”

तुळाजीचें शेवटचें वाक्य ऐकण्याइतकें कुशाबाचें चित्त तेव्हा ठिकाणावर नव्हतें त्याला शिक येत होती, ती आवरण्यासाठीं तो आपली पराकाष्ठा करीत होता. तुळाजीचा शकुन—अपशकुनावर फार भरवसा असल्याचें त्याला माहीत होतें. पूर्वी अशाच एका प्रसगीं दुसऱ्या एका कोणा माणसाला समोरून शिंक आली, तेव्हा तुळाजी ‘डावी तारी उजवी मारी समोर करी घात’ असें उद्‌गारुन त्या माणसावर नाराज झाल्याचें नेमकें याच वेळीं त्याला आठवलें. म्हणूनच तो शिंक दाबण्याची शिकस्त करीत होता. ती शिक त्याला दाबता आली, पण त्या निमित्तानें त्याच्या मनात उचबळणाऱ्या ऊर्मि त्याला दाबता येईनात. तुळाजी महिपतीच्या नेकजातपणाविषयीं बोलत होता त्या त्याच्या बोलाना फोल ठरविणारी अपशकुनी शिंक आपणाला यावीच का ?—पुढें कुशाबाला ह्या गोष्टीचा विचारच करवेना. ती बाब जर महिपतीविषयीं नसून दुसऱ्या एखाद्याविषयींची असती, तर त्या वेळीं कुशाबानें त्या शिकेच्या सुतानें स्वर्गाला जावयाला कमी केलें नसतें. शिक हा त्या माणसाच्या बाबतींतील ईश्वरी साक्षात्कार होय असें समजून त्या माणसाच्या हालचालीवर त्यानें कावळ्याच्या दृष्टीनें नजर ठेवली असती, व त्या त्याच्या विकृत दृष्टीला पराचा पारवाही कदाचित् दिसला असता. पण इथें प्रश्न जरा नाजुक होता. समजा, कोणत्याही कारणामुळें महिपतीचा सशय कुशाबाला असला. तसा काहींतरी सशय होताही. महिपति त्याच्या मर्जीतून उतरला होता, म्हणूनच तर आज वर्षभर त्याचें मुखावलोकन कुशाबानें केलें नव्हतें. आणि महिपतिही देवगडला आल्यास दोन महिने होऊन गेले तरी देखील मुद्दामच सासरा इतका जवळ असताही त्याच्या भेटीला आज-

वर आला नव्हता. पण कुशाबानें आपली पोरगी त्याला दिली होती. यास्तव 'कन्या देऊनिया कुळ मग काय विचारावें' असें म्हणून त्याला गप्प बसणें प्राप्त होतें.

"तुझें लक्ष्य कोणीकडे आहे कुशाबा?" तुळाजीनें कुशाबाला विचारलें.

तेवढ्यात कुशाबाचें आकाशाकडे लक्ष्य गेलें. त्यानें वर पाहिलें म्हणून तुळाजीनेंही वर पाहिलें. यापूर्वी अनेक वेळा तुळाजीनें आपली शून्य दृष्टि त्याच पहांटेला त्या आकाशाकडे लाविली असेल. पण कुशाबा तिकडे पाहत आहे असें पाहताच त्याला त्यात कांहींतरी विशेष आहे असें वाटलें, व विशेष होतेंही.

"आज चद्राला खळें पडलें आहे." असें कुशाबानें चंद्राकडे पाहून म्हणावयाला व तिकडे तुळाजीचें चित्त वेधायला एक गांठ पडली.

"आमच्या नशिबीं पुढे आणखी काय लिहिलें आहे त्याची ही ईश्वरी साक्षच म्हणावयाची!" तुळाजी निराशेनें म्हणाला, "आतां संकटांची परमावधि व्हावयाची काय बाकी उरली आहे? सुवणदुर्ग हातचा गेला, अजनवेलही गेल्यासारखीच, देवगड—विजयदुर्ग—रत्नागिरी असे चारदोन गड हातीं आहेत. तेवढे तेथल्या तेथल्या गडकऱ्याना म्हणावें, शत्रूला फितूर होऊन त्याच्या घशात लोटा, आणि मला पुरा फकीर बनवून देशोधडीला पाठवा कीं झालें."

कुशाबा मनांतल्या मनात कच खावून म्हणाला, "मला शिंक आली आणि ती मीं दाबली, हें धन्याच्या ध्यानीं आलें काय? आणि त्यावरून माझ्या जावयाविषयीं नसता सशय तर त्याच्या मनात आलेला नाहीं ना?" त्याच्या मनाला अगोदरच हुरहूर लागून राहिली होती कीं चद्राला खळें पडलेलें जें दिसलें, तें आणखी कोणतें सकट आपली वाट पाहत उभें आहे?" तरीही त्यानें आपल्या भीतीनें धडपडणाऱ्या मनाला धीर देऊन तुळाजीचें शातवन करण्याचा प्रयत्न केला, "हुजूर! निराश झालेल्या माणसाला सभोंवार सर्वत्र निराशेचा आधार पसरलेला

दिसतो. पण आपणाला असें का वाटू नये कीं हा अपशकुन आपणाला झालेला नसून आपल्या प्रतिस्पर्ध्यांना झालेला आहे! असें पाहा, आपण आणि आपले सारे शत्रुमित्र एकाच आकाशाखालीं पृथ्वीवर वास्तव्य करतों ना? मग चंद्राला खळें पडलेलें आज दिसतें तो अपशकुन आम्हाला नसून आमच्या शत्रूला झालेला आहे असें आपण का समजू नये?"

तुळाजी विषादानें हसून म्हणाला, "भोळ्या मनाची फसवणूक करावयाला हा युक्तिवाद चांगला आहे. पण आपल्या मनाची फसवणूक म्हणजे आपलीच फसवणूक नव्हे का? शत्रूला आज अपशकुन होण्याचें काय कारण? एक तर पेशवे काही आपले शत्रु नव्हेत ना? छत्रपतींच्या एका राजवटीचे आम्ही दोघेही आधारस्तंभ असल्यानें आमच्यांत स्पर्धा उत्पन्न झाली म्हणजे काहीं तें शत्रुत्व नव्हे. आजवर पेशव्यांनीं आंग्र्यांच्या अनेक आगळिकी केल्या, तशाच आंग्र्यांनीही पेशव्यांच्या आगळिकी केल्या आहेत. एका हातानें टाळी वाजलेली नाही, वाजतही नाहीं. ही दोघांमधील स्पर्धा मिटावणारा व दोघांची दिलजमाई करून देणारा एखादा थोर मनाचा तिऱ्हाईत निर्माण झाला असता तर आज ही स्पर्धा जगाला दिसली नसती. पण आमच्या दुर्दैवानें आमच्यामध्यें बिब्ब्याची फुली पडली आहे. हा रामाजीपंत बिवलकर कोंकणपट्टीचा सुभेदार होऊन आल्यापासून त्यानें आमची ही सारी वाताहात चालविली आहे. तो मात्र आमचा शत्रु खरा. पण तो सांबाच्या पिंडीवरचा विंचू आहे, तो श्रीमंत नानासाहेब पेशव्यांचें आत्मलिंग आहे. समज, हा अपशकुन तू म्हणतोस त्याप्रमाणें रामाजीपंताला झालेला असला, तर त्याचा दुष्परिणाम म्हणजे आंग्र्यांची दौलत तर बुडावयाचीच. पण ती मराठशाहीच्या पंचचीं न पडता पेशव्यांनीं अंसंगीयाशीं संग केला, ह्या तुळाजी आंग्र्याला धुळीला मिळविण्यासाठीं इंग्रजांशीं मैत्री केली, त्या इंग्रजांच्या भक्ष्यस्थानीं आंग्रे पडावयाचे! हीच जर ह्या अपशकुनाची फलश्रुति असली तर जो नाश आंग्र्यांचा तोच पेशव्यांचा व तोच अलम् मराठी साम्राज्याचा असाच त्याचा

अर्थ नव्हे काय? आता असाच जर काहीं ईश्वरी योगायोग असेल, ईश्वराची करणी आणि नारळात पाणी म्हणतात त्याप्रमाणें पेशवे व आंग्रे यांचें आपसात काहीं वितुष्ट येऊन ते आपसात झगडू लागणार असतील, आणि त्या झगड्यात आंग्र्याना पेशव्याची बाजू घेऊन इंग्रजाचा मोड करण्याची संधी सांपडणार असेल, तर गोष्ट निराळी. पण हें कालत्रयींही शक्य दिसत नाहीं "

"का? शक्य का दिसत नाहीं? आणि आपण पेशव्याशीं तडजोड करण्याचा जो प्रयत्न चालविला आहे तो पूर्ण अयशस्वी झाला असें आपण कोणत्या तोंडानें म्हणू शकाल? पेशव्यानीं आपण सहानुभूतीनें वागावयाला तयार असल्याचें मागेंच आपणाला कळविलें होतें, व अजूनही त्याच्याकडून आपणाला स्पष्ट नकार मिळालेला नाही."

"तो स्पष्ट नकार अगदी अखेरपावेतों—आंग्र्याच्या दौलतीसह आंग्र्याचें तेरावें पार पडण्याचा समय आला तरी त्या दिवसापावेतों देखील मिळावयाचा नाही. कारण नकार न देताना जर सर्व गोष्टी त्याच्या मनाजोग्या म्हणजे रामाजीपंताच्या मनासारख्या होत आहेत, तर ते नकार देऊन उघड उघड वैर कशाला संपादन करतील? गुळानें नावडती माणसें त्याना मारता येत असल्यावर ते मुद्दाम त्या माणसाना विष कशाला देतील? उलट त्याच्या दृष्टीनें ते हा एक राजकारणाचा डावच खेळत आहेत. त्याना असें भय वाटत आहे कीं आजच उघड उघड एक घाव दोन तुकडे असा संबंध तोडून टाकल्यास आंग्रे आणि पेशवे यांच्यातलें वैर वज्रलेप होईल, व मग कदाचित् हा तुळाजी आंग्रे मुंबईकर इंग्रजाच्या हातात हात घालून आपला नाश करण्याला सिद्ध होईल "

"असा संशय बाळगण्याइतके पेशवे अथवा रामाजीपंत अज्ञान असतील असें मला मुळींच वाटत नाहीं. एक वेळ पाणी आणि विस्तव यांची दोस्ती होईल, एक वेळ पूर्वेचा सूर्य पश्चिमेला उगवेल, एक वेळ वाघाची मादी मांजराला विईल, पण आंग्रे—त्यातल्या त्यात तुळाजी आंग्रे सरखेल आणि इंग्रज यांची मैत्री कालत्रयींही जमावया-

ची नाहीं. हें कळण्याइतके पेशवे काय किंवा त्याचे हस्तक बिवलकर काय, दोघेही पुरे धूर्त आहेत."

पेशव्याविषयीं तू असा निर्वाळा दिलास तर तो वेळीं खरा ठरेल. पण बिवलकराच्या बाबतींत असा विश्वास बाळगायला जागाच नाहीं. अशक्य वाटणाऱ्या भयाण गोष्टी शक्य करण्याइतकी ज्याची सैतानी वृत्ति, त्याला कधी कोणता सशय येईल याचा काय नेम ? तूं बोललास तें सारें माणुसकीच्या जगात वावरणाऱ्या माणसाना लागू. बिवलकरा सारख्या सैतानाला त्याचें काय होय? पेशव्याच्या बाबतींत आपण प्रथम असेंच म्हणत नव्हतों का? पेशवे आग्ऱ्याचे कितीही मोठे प्रतिस्पर्धी झाले तरी ते आग्ऱ्याचा निःपात करण्यासाठीं 'ये रे कुत्र्या आणि खा माझा पाय' यासारखे इंग्रजाना मराठशाहींत आणून घुसवणार नाहींत असेंच आपलें मत नव्हतें का? पण त्या रामाजीपत बिवलकरानें इंग्रजाना फितूर होऊन पेशवे आणि इंग्रज याचें जूग तुळाजी आग्ऱ्याविरुद्ध जुळवून दिलेंच कीं नाहीं? त्याला असेंच वाटणार कीं हिंदुपदपादशाहीचें जगड्व्याळ कार्य पार पाडण्यासाठीं बद्धपरिकर असलेले पेशवे देखील जर भलत्या अहमहमिकेला बळी पडून आपल्या बरोबरीनें हिंदुपदपादशाहीचें कार्य धडाडीनें तडीला नेण्याला समर्थ अशा आग्ऱ्याना बुडविण्यासाठीं इंग्रजाशीं फितुरी करतात, तर तीच गोष्ट आग्रे का करणार नाहींत?"

"आपण म्हणता तेंही एका दृष्टीनें खरें आहे. जातिवत नेकजाताना ओळखावयाला जातिवंत नेकजातच लागत असतात. आपण आता म्हणाला तसा भ्रामक सशय बिवलकरांना येणें अगदीं शक्य आहे."

"शक्य का? अगदीं निश्चित सत्य असेंच तें माझें विधान आहे. म्हणूनच तर बिवलकरानी सलोख्याच्या बाबतींत अशी टाळाटाळी चालविली आहे. तसा त्याचा हेतु नसता, तर—हा तुळाजी आग्रा दातीं तृण धरून पेशव्याना शरण गेल्यासारखा दीन दुबळा बनून सलोख्याची याचना करीत असताना आजचें उद्यावर आणि उद्याचें परवावर अशी त्यांनीं रोज चालढकल चालविली आहे, आणि

दरम्यान जागोजागचीं ठाणी काबीज करून माझे हात पाय तोडण्याचा उद्योग सुरूच आहे, याचा अर्थ काय ?"

तुळाजी आंग्रे आणि त्याला वडिलाच्या ठिकाणीं पूज्य असणारा कुशाबा पडवळ यांचें तें सुखदुःखाचें जिव्हाळ्याचें संभाषण आणखी-ही बराच वेळ चाललें असतें. परंतु तेवढ्यात आतून एका हुजऱ्यानें येऊन वर्दी दिली, "कुशाबा! धाकटे सरकार जागे झाले आहेत."

'धाकटे सरकार' जागे झाल्याचें कानीं पडताच कुशाबानें त्याच पावलीं आतील रस्ता सुधारला. धन्याना विचारल्याखेरीज एकदम आंत कसें जावें असा शिष्टाचाराचा संकोच त्या म्हाताऱ्याच्या मनाला शिवलादेखील नाहीं. तुळाजीच्याही मनात तसला विकल्प आला नाहीं. तो उलट थट्टेनें कुशाबाला म्हणाला, "जा! जा! कुशाबा! तू माग-च्या जन्मीं झुंझाराची आई होतास का रे? एरव्हीं त्याला जन्मदात्या आईचाही जितका लळा नाही तितका तुझा लळा कसा लागला असता?"

तुळाजी हसत बोलला, आणि कुशाबाही तें हसत हसत थट्टेवारी ऐकून काहीं उत्तर न देता आत निघून गेला. मात्र जाताना त्यानें तुळाजीलाही आत जावयाला—थंडीमुळें—भाग पाडलें. आतल्या दिवाणखान्यांत जाताच पुन्हा तुळाजीच्या शून्य वृत्तीच्या येरझारा सुरू झाल्या. दिवाणखान्याच्या खिडकींतून बाहेर पसरलेल्या अफाट समुद्रा-कडे पाहता पाहता पुन्हा त्याचें चंद्राकडे लक्ष्य गेलें. तों चंद्रासभोवारचें खळें अगोदरच्यापेक्षाही रुंदावलें आहे व चंद्रबिंबही अधिक डागळलें आहे, असा भास त्याला झाला. त्यावरून त्यानें आपल्या हळव्या मनाला विचारलें, "अशीच आणखी एखादी नवी संकटपरंपरा माझ्या राशीला येण्यासाठीं वाट चालत आहे कीं काय?"

तोंच एका हुजऱ्यानें येऊन वर्दी दिली, "सरकार! बाबूराव साटम आला आहे. त्याला आपली भेट घ्यावयाची आहे."

बाबूराव ऊर्फ महिपति साटम म्हणजे तुळाजीच्या गळ्यांतला ताईत. तुळाजी हुजऱ्याला म्हणाला, "मग त्याला ताबडतोब आंत का नाहीं आणलेंस? जा लौकर त्याला आंत पाठवून दे."

## प्रकरण १० वें

# ठकाला महाठक ?

त्याच वेळी गडाच्या पायथ्याशीं सुमारें एका हाकेच्या अतरावर दक्षिणेकडे असलेल्या माडाच्या गर्द छायेंत यज्ञेश्वरशास्त्र्याच्या घरासमोर एक तरुण घोडेस्वार येऊन उभा राहिला. तेवढ्यात यज्ञेश्वरशास्त्री सोंवळें नेसून पळीपचपात्री हातीं घेऊन बाहेर पडले. त्यानीं त्या स्वाराला पहाताच प्रश्न केला, "कोण?"

स्वारानें चादण्याच्या अधुक, व माडाच्या छायानीं डागळल्यामुळें अधुक दिसणाऱ्या प्रकाशात यज्ञेश्वरशास्त्र्याकडे निरखून पाहत विचारलें, "यज्ञेश्वरशास्त्री इथेंच रहातात काय?"

"होय. का बरें?"

"ते आत आहेत काय?"

"का, काय काम आहे?

"त्याच्याशींच माझें काम आहे."

"मीच यज्ञेश्वरशास्त्री. बोला आता."

तो स्वार एकदम चपापून स्तब्ध राहिला. त्याला तें खरें वाटेना.

"का? स्तब्ध का तू?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें अधुक चद्रप्रकाशात त्या स्वाराकडे निरखून पहात विचारलें, "तू कोण कोठून आलास?"

"मी सर्व काहीं सागतों. पण भटजी! माझी तुमची ओळख नाहीं. देवाची शपथ आहे तुम्हाला. खरोखर तुम्हीच ते काय?"

"तू अगदींच नवखा दिसतोस!"

"होय मी नवखा आहें खरा. तरी पण तुम्ही ब्राह्मण आहां. तुमची माझी ओळख नसली तरी तुम्ही शपथेवर या सकाळच्या राम-

प्रहरीं खोटें बोलणार नाहीं अशी माझी खात्री आहे. मी तुमच्या शद्बावर विश्वासून बोलूं ना?"

"बेलाशक."

"बरें तर. सरखेलांचा मुक्काम सध्या गडावरच आहे ना?"

"अगोदरच तू तुझी ओळख दे. भलत्या माणसाला नीट चौकशी केल्याखेरीज कांहीं माहिती द्यावयाची नाहीं असा सरखेलाचा आम्हा सर्वांना सक्त हुकूम आहे."

"तें मला माहीत आहे. मीही एक तुमच्यासारखाच सरखेलाचा एकनिष्ठ सेवक आहें.–तुमच्यासारखाच. काय समजला?" त्या स्वारानें 'तुमच्यासारखा' या शद्बावर विशेष जोर देऊन हसत म्हटलें.

"पण तुझें नाव काय तें नाहीं सांगितलेंस! त्याखेरीज मी तुला कसा ओळखूं?" यज्ञेश्वरशास्त्र्यांनीं वाढत्या संशयी वृत्तीनें विचारलें.

"नाव मी सांगतों. पण नांवातच काय आहे?"

"नावातच सर्व कांहीं आहे."

"माझ्या नावावरून माझ्या अंतरंगाची ओळख तुम्हाला पटणार नाहीं."

"मग माझी ओळख तरी तुला कशी पटली?"

"तुमचें नाव मला माहीत आहे म्हणून. तें राहूदे. पण सर-खेलांचा मुक्काम सध्यां इथेंच आहे ना?"

"अगोदर नांव सांग म्हटलें ना? मला उशीर होतो आहे."

"तुमची चिकाटी भारीच दांडगी बुवा! मी कोणी शत्रुपक्षाचा माणूस असेन असा संशय तुम्हाला येतो आहे काय?"

"तू कुणाचा कोण हें कळल्याखेरीज मी कांहींच सांगू शकत नाहीं."

"माझें नांव महिपति साटम. तुम्ही कदाचित् मला या नावानें ओळखणार नाहीं. पण बाबूराव साटम–देवगडचा गडकरी–त्याला तरी तुम्ही नांवानें ओळखता काय?"

"बाबूराव साटम!" यज्ञेश्वरशास्त्री तीन चार वेळां तें नांव आपल्या जिभेवर घोळवीत म्हणाला, "तुला कांहीं मी प्रत्यक्ष

ओळखीत नाहीं पण नाव ऐकल्यावर आणि देवगडचा गडकरी तूं आहेस हें ऐकून ओळख पटली. तू सरखेलाना भेटायला आला असशील ''

"होय."

"कांहीं एखादें जरूरीचें काम?"

"अर्थात्! एऱ्हवी इतक्या तातडीनें मी कशाला आलों असतों!

"आणि अमका तमका यज्ञेश्वरशास्त्री आपल्या विश्वासातला आहे हें देखील तुला सरखेलाकडूनच कळलें असेल."

"कां! ही शका का?"

"शका नाही, पण–मी गरीब ब्राह्मण, सुभेदार बिवलकराच्या रोषाला प्राप्त झालेला, म्हणून भय वाटतें. त्याच्याकडूनच कळलें ना?"

"हा भटजी मोठाच पाताळयंत्री दिसतो गुलामाला वाटतें कीं महिपति साटम म्हणजे अगदीं कुकुलें बाळ, बोळ्यानें दूध पितो!" असें मनात पुटपुटून महिपति एकवार सभोंवार नजर फेंकून उद्‌गारला, "होय. त्याखेरीज आणखी कोणाकडून कळणार? पण तुम्हीं तुमची ओळख आणखी कोणाला दिलेली नाहीं ना?"

"ओळख?" यज्ञेश्वरशास्त्र्यानी एकदम चमकून प्रश्न केला, "तू हें विचारलेंस याचा अर्थ काय? मी कोण आहें अशी तुझी समजूत आहे?"

"तें आपण मागाहून बोलू. मीं तुम्हांला सांगितलें ना, कीं प्रथम मला सरखेलाची भेट घेऊदे."

गुतलेला दोरा सोडविता सोडविता हिसकाहिसकी होऊन त्याची सोडवणूक होण्याऐवजीं त्याला जास्त गांठी बसाव्या, तसली परिस्थिति त्या दोघांच्या सभाषणांतून निर्माण होण्याच्या रगाला आली. असा दगडावर दगड घांसला जाऊन त्यातून ठिणग्या पडल्या तर कसें होईल हें भय दोघांनाही सारखेंच वाटत होतें. पण तें टाळावें कसें हें दोघांनाही कांहीं केल्या कळेना. यज्ञेश्वरशास्त्र्यांना वाटत होतें, महिपति प्रतिपक्षाचा, आणि महिपतीलाही यज्ञेश्वरशास्त्र्याविषयीं तसाच

संशय वाटत होता. आणि नवलाची गोष्ट ही कीं दोघेही सरखेल तुळाजी आंग्र्याचे सेवक आणि आश्रित! यज्ञेश्वरशास्त्री हे तुळाजी आंग्र्याला गुरुस्थानीं वद्य असलेले पुरोहित, आणि महिपति तर काय, तुळाजीचा सेवकच. तो तुळाजीला पितृस्थानीं वद्य असणाऱ्या हुजऱ्याचा–कुशाबा पडवळाचा जावई पेशव्याशीं वितुष्ट दिवसें-दिवस फारच वाढू लागल्यापासून सुवर्णदुर्गापासून तों खालच्या थेट सर्व कोंकणपट्टींतील सरखेली अमलाचा कसून बदोबस्त करण्यासाठीं तुळाजीनें जागोजागच्या गडकोटांवर आपल्या नात्यातील अथवा विश्वासातील लोकांच्या नेमणुका केल्या, तेव्हांच महिपतीला त्यानें देवगडच्या किल्ल्यावर गडकरी नेमलें होतें रामाजीपंत, जावजी गवळी व खड्ढजी माणकर वगैरे टोळधाड सरखेलींची जागोजागीं नासधूस करीत जजिरे सुवर्णदुर्गावर जेव्हां येऊन धडकली, तेव्हा ह्याच महिपतीनें आपण होऊन सुवर्णदुर्गाच्या रक्षणाची कामगिरी आपल्या शिरावर घेतली होती. तेव्हा त्याच्या प्रयत्नाना यश आलें नाहीं, व गडावर सर्वत्र शिकस्तीचा फितूर झाल्यामुळें गड पाडाव होऊन रामाजी-पताच्या स्वाधीन झाला, त्याला महिपतीचा काय इलाज? तो एक गड हातचा गेला तर गेला, विजयदुर्ग व कोंकणपट्टींतील बाकीचे गडकोट तर शाबूत राखावयाचे, अशी नवीन तरतूद करताना प्रथम विजयदुर्ग हा महत्त्वाचा गडच महिपतीच्या वांटणीला आला होता. परतु गडकोटापेक्षा खाशा स्वारींचें रक्षण करण्याचें काम अधिक महत्त्वाचें व जोखमेचें, आणि त्यांतल्या त्यांत प्रभावति ही तुळाजी आंग्र्याची प्राणांहूनही प्यार अशी प्रियतमा–ती अलीकडे आपत्तीं-मुळें गांजून जवळजवळ विरक्त बनून परमेश्वरसेवेसाठीं वारवार देव-गडाशेजारच्या जागृत शिवस्थानीं–कुणकेश्वरीं जाऊन रहात असल्यानें खाशा स्वारीचा वासही वारवार जाऊन येऊन कुणकेश्वरींच होत असे. तेव्हा कुशाबा राणा एवढा एकच काय तो आंग्र्याच्या तीन पिढ्या पाहिलेला व तुळाजीलाही अगाखांद्यावर खेळविलेला असा, तुळाजी व लक्ष्मी ह्या प्रेमळ जोडप्याच्या एकुलत्या एका मुलाला साभाळण्या-

साठीं लक्ष्मीसनिध असे पण खाशाच्या रक्षणासाठीं शेजारच्या देवगडावर कडेकोट बंदोबस्त असणें अवश्य होतें. तें ओळखून महिपतीला देवगडावर प्रभावतीनें कुशाबाच्या सांगण्यावरून मुद्दाम मागून घेतलें होतें. केवळ पुरुषापुरुषातीलच हा व्यवहार असता, तर महिपतीची नेमणूक अशा आणीबाणीच्या वेळी तुळाजीनें देवगडावर केली असती कीं नाहीं याची वानवाच. सरखेलीतील महत्त्वाच्या गडकोटात देवगडाच्या उत्तरेकडे विजयदुर्ग व रत्नागिरी हे गड होते. दक्षिणेकडे मालवणचा सिंधुदुर्ग होता ह्या तिन्ही गडावर पेशव्याचा व त्याचे साह्यकारी जे इंग्रज त्याचाही चांगलाच डोळा होता. तातल्या एखाद्या गडावर तुळाजीनें महिपतीची नेमणूक केली असती. पण महिपतीची पत्नी सत्यभामा ही प्रभावतीची जिव्हाळ्याची मैत्रीण असल्यानें, व महीपतीनेंही प्रभावतीला आपली धर्माची बहीण मानली असल्यानें त्या दोघींना आपण एकमेकींच्या सान्निध्यात असावें असें वाटलें. तशात इंग्रज लोक तुळाजीला ह्या जगातून नाहीसा करण्यासाठीं टपले आहेत हें कुशाबाला माहीत असल्यामुळें आपल्या विश्वासातील जावई म्हणून खाशाच्या रक्षणाचें काम चोख बजावण्यासाठीं त्यांच्या सन्निध आणणेंच त्यालाही अवश्य वाटलें शिवाय घडोघडीं अधिकाधिक बिकट होत असलेल्या राजकारणाचे गुंते सोडविण्याच्या कामीं तुळाजीला महिपतीसारख्या ताज्या दमाच्या तरुण विश्वासू सेवकाची सल्ला घेणें अवश्य वाटत असल्यानें त्यानें महिपतीला मुद्दामच विजयदुर्ग, रत्नागिरी अथवा सिंधुदुर्ग यापैकीं एखाद्या महत्त्वाच्या गडकोटाचें रक्षण करण्याच्या कामगिरींतून मोकळें राखलें होतें. रामाजीपंत, माणकर, गवळी वगैरे पेशव्याच्या सेनापतींनीं जरी चोहों बाजूंनीं तुळाजीची दौलत जिंकून त्याचा कोंडमारा चालविला होता, तरी तितक्याच तत्परतेनें सलोख्याची भाषाही उभय पक्षीं सुरूच होती. ती भाषा करण्यात तुळाजीला पावलोपावलीं महिपतीची सल्ला अवश्य वाटे. अशा प्रत्येक बाबतींत प्रभावतीचें मत घेतल्याखेरीज पुढें पाऊल टाकावयाचें नाहीं असा तुळाजीचा परिपाठ असून

प्रभावतीचें तर त्या धर्माच्या भावाच्या सल्ल्याखेरीज पानही हलत नसे. इतकें अनन्यसामान्य महत्त्व महिपतीला तुळाजीच्या राजवटींतच काय पण संसारातही प्राप्त झालें होतें.

आणि यज्ञेश्वरशास्त्र्यालाही असेंच अनन्यसामान्य महत्त्व तुळाजीच्या पदरीं होतें. मात्र ह्या महत्त्वाचा उगम प्रभावतीच्या भोळ्या धर्मभावनेंत होता. यज्ञेश्वरशास्त्र्यासारखा सदाचारसंपन्न व कळकळीचा गुरु अन्यत्र सापडावयाचा नाहीं, त्याला वाचासिद्धि आहे, असाही त्याच्या ठायीं प्रभावतीचा तुळाजीप्रमाणेंच पूर्ण विश्वास होता. एवढा प्रभावतीचा आधार जर यज्ञेश्वरशास्त्र्याला नसता, तर तो पेशव्याचा व रामाजीपंत बिवलकराचा ऋणानुबंधी म्हणून तुळाजीच्या कोपानलात होरपळून निघालेल्या इतर अनेक कोंकणस्थाप्रमाणें केव्हाच होरपळून निघाला असता तुळाजी हा काहीं मूळचा दैववादी नव्हे, लाथ मारीन तेथें पाणी काढीन, अशा धमकेनें वागणारा रणमर्द गडी तो. पण अलीकडे दोन वर्षांत प्रत्येक वेळीं त्याच्या दुर्दैवाचीच सरशी होत गेल्यानें त्याचा प्रयत्नवादावरचा विश्वास उडत चालला होता, व दैवाचा चागलाच दरारा त्याला वाटू लागला होता. त्यांतूनही चाचपटत तो प्रयत्नमार्गानें जाण्याचा प्रयत्न करी, पण शकुनापशकुनाचा विचार करून कोणत्याही कार्याला हात घालण्यापूर्वी शकून पाहावा, ह्या लक्ष्मीच्या भोळ्या भावाचा पगडा त्याच्यावर बसल्यानें अलीकडे तर तो शकून व सुमुहूर्त पाहिल्याखेरीज कोणत्याही बाबतींत पुढें पाऊल टाकावयाला धजत नसे. आणि हे शकून अपशकून व सुमुहूर्त वर्तवावयाचे यज्ञेश्वरशास्त्र्यानें!

असे यज्ञेश्वरशास्त्री व महिपति हे तुळाजी आंग्र्याचे दोन डोळे. पण त्या दोन डोळ्याची एकमेकाना खरी ओळख नसल्यामुळे आज ते एकमेकाकडे वटारून पाहत होते.

महिपति हळुहळू एकेरीवर येऊ लागल्यामुळें त्याला काय उत्तर द्यावें हेंच यज्ञेश्वरशास्त्र्याला कळेना. धरलें तर चावतें व सोडलें तर पळतें असा त्याच्या मनांत विचारांचा गोंधळ माजू लागला. असाच

त्या दोघांचा परस्पर गैरसमज आणखी कांहीं क्षण वाढत गेला असता तर—पण तशी पाळीच तेव्हां आली नाहीं. ज्या मार्गावर महिपति आपला घोडा उभा करून यज्ञेश्वरशास्त्र्याशीं बोलत होता, त्याच मार्गानें समोरून एक तरुण स्त्री येतांना महिपतीनें पाहिली. रात्र चांदण्याची असली तरी तो मार्ग माडाच्या सावलीनें आच्छादिलेला असल्यानें दहा-पांच कदमांच्या अंतरावर असणाऱ्या माणसांना एकमेकाची ओळख पटण्याची मारामार. परंतु महिपतीनें सहज त्या बाजूला पाहिलें मात्र, आणि त्या तरुण स्त्रीच्या नुसत्या चालण्याच्या ढबीवरून तिला ओळखून हांक मारली, "तारे!"

"कोण, महिपति?" तारेनें उलट हाक मारली.

"माझें काम झालें." असें म्हणत महिपति तसाच घोड्यावरून खालीं उतरला व तारेच्या अगदीं जवळ जाऊन तिचा हात आपल्या हातीं घेऊन तिला विचारूं लागला, "सरखेलाचा मुक्काम इथें आहे का?"

"होय. कां? कांहीं जरुरीचें काम आहे कीं काय?"

"होय. म्हणून तर इतक्या रातोरात इकडे आलों."

"कसलें काम?"

"तें तुला मग कळेलच. आतां बोलण्यांत वेळ दवडीत नाहीं."

"इतकी घाई? जरा थांबून दोन शब्द तरी बोलाल कीं नाहीं?" तारा महिपतीचा हात आपल्या हृदयाशीं घट्ट आवळून धरीत आशाळू पण मादक दृष्टीनें त्याच्याकडे न्याहाळून पाहत उद्गारली.

"अवांतर गोष्टी बोलायला आतां वेळ नाहीं. पुन्हां आपण भेटूं तेव्हां बोलू." असें म्हणून महिपति आपला हात हिसकावून घेत म्हणाला.

"इतका कंटाळा माझा आला अं?" तारा पुन्हां आपल्या दोन्ही हातांनीं महिपतीच्या गळ्याला लोंबकळती मिठी मारून म्हणाली, "महिपति! आज चार पांच महिन्यानीं तुमची सांवली प्रथम दिसते आहे. सुवर्णगड सोडल्यापासून आजवर एकदांदेखील

येऊन भेटलां नाहीं. देवगडावर येऊन तुम्हांला दोन महिने झाले असें बाईसाहेबांच्या तोंडून ऐकलें. पण दोन्ही डोळे शेजारीं आणि भेट नाहीं संसारीं असें म्हणतात, त्याप्रमाणें कीं हो अवस्था करून सोडलीत तुम्ही माझी! गुलाबाची उमलती कळी शिरीं धारण करायला म्हणून खुडून मोठ्या हौसेनें हातीं घेतलीत, ती क्षणभर हुंगून तिचा असा निर्माल्य करून सोडण्यासाठींच का? महिपति! इतके कसे हो निष्ठुर तुम्ही?"

"सोड—माझ्या गळ्याची मिठी सोड. वेडे! कोणी पाहील तर काय म्हणेल? तो पाहा—तो म्हातारा ब्राह्मण आपल्याकडे पाहतो आहे. तो काय बरें म्हणेल आपणाला? जनाची नाहीं पण मनाची तरी कांहीं लाज?" महिपतीनें पुन्हा आपल्या मानेसभोंवारचा तारेच्या नाजुक हातांचा विळखा सोडवून मोकळा केला व म्हटलें, "बायकांना अष्टौप्रहर रंगमहालापेक्षा आणखी काय दिसणार? वेळ कोणती, जागा कोणती, कांहीं विचार?"

"हा विचार प्रथमच माझा कैसानें गळा कांपतांना कां नाहीं सुचला?" तारेनें डोळ्यात आसवें आणून विचारलें. पण तें ऐका-वयाला महिपति तेथें उभा थोडाच होता! तो तिच्या हाताचा विळखा सोडवून लगेच आपल्या घोड्यावर स्वार होऊन गडाकडच्या वाटेला वळला होता.

तारा स्फुंदत स्फुंदत पुन्हा धावत पुढें जाऊन महिपतीचा हात दोन्ही हातानीं धरून म्हणाली, "महिपति! सत्यभामेला तुम्हीं पुन्हा नांदावयाला आणलें आहे असें ऐकत्यें. तें खरें काय?"

"तर! तुझ्यासारख्या ह्या फुलावरून त्या फुलावर भराऱ्या मारीत सारें जग धुंडाळणाऱ्या चवचाल फुलपांखराच्या नादानें आम्हीं आमच्या लग्नाच्या बायकांना सोडून स्वतःच्या संसाराचा मांडव करून घ्यावा की काय?"

"इतके का तुम्ही खुनशी आहां? मी मनांत संशय आला म्हणून रागाच्या भरांत तुम्हांला सुवर्णदुर्गांत असतांना एकदां कुठें टाकून

बोलल्यें, त्याचा तुम्ही एवढा कास्याचा नायटा करावा काय? तुम्ही आपल्या संसाराचा माझ्या पायीं माडव करून घ्या, असें मीं कधीं बरें म्हटलें? उलट तुमच्या आग्रहाला बळी पडून व तुमच्या भूलथापावर भोळया भावानें विश्वासून तुमच्या आधाऱ्या ससारात सत्तेनें दिवा लावायची सधी मला मिळेल, या आशेनेंच मी माझें जीवनसर्वस्व तुमच्या पायीं वाहिलें ना? तुमचा शत्रु असलेल्या माझ्या भावाच्या मताचीही पर्वा मीं केली नाहीं आणि पुन्हा माझ्यावरच ससाराचा माडव केल्याचा आरोप? असो. कुणीकडून तरी सुखी रहा म्हणजे झालें. तुम्ही माझ्याशीं बेइमान झाला तरी हरकत नाहीं. पुरुषाची जातच तशी आहे. पण मी मात्र तुमच्याशीं कधींच बेइमान झाल्यें नाहीं व व्हायची नाहीं —"

जळाविणें मासोळी तडफडावी तशी तारा महिपतीच्या सहानुभूती-विणें अतःकरणातल्या अतःकरणात तडफडत असताना तिला तिथें तशीच सोडून महिपति पुढें निघून गेला. तारा डोळयाना पदर लावून स्फुदून स्फुदून रडू लागली. पण का रडतेस असें आपुलकीनें तिला कोण विचारणार? किंवा ममतेनें तिला हृदयाशीं धरून तिचीं आंसवें कोण पुसणार?

यज्ञेश्वरशास्त्री जवळच सोवळयानें पळीपचपात्री घेऊन उभा होता. तो मुद्दामच हा देखावा दुरून पहात होता. त्याला वाटलें कीं आपण हा सारा प्रकार पाहिला हें तारेच्या ध्यानीं आलें नसावें. म्हणून मुद्दामच तो मोठयानें खाकरला. त्याचें खाकरणें ऐकून तारा एकदम भानावर आली व जणू काहीं आपण त्या कोणत्याच गांवची नाहीं असा निर्विकार चेहरा सजविण्यासाठीं अगीं होतें नव्हतें तेवढें नैसर्गिक अभिनयकौशल्य खर्च करून यज्ञेश्वशास्त्र्याकडे वळून ती म्हणाली, "भटजी! मी तुम्हाला जागे करायला आल्यें होतें. बाईसाहेबांनीं मला सागितलें कीं तुम्हाला कदाचित् झोप लागेल आणि अनुष्ठानाचें राहून जाईल. आज सोमवार, बाईसाहेब नेहमींप्रमाणें आता इतक्यां-तच पूजेला येतील."

"ठीक आहे. आता मी तुला झोंपेंतून जागी करतों आणि सांगतों, ऊठ लौकर. सकाळच्या रामप्रहरात ते सारे रगढग सोड आणि बाईसाहेबांना जाऊन साग कीं शास्त्रीबुवा केव्हाचे देवालयाकडे गेले." असें टोमणेवजा बोलून यज्ञेश्वरशास्त्री गडावर जावयाला निघाले. मनातून त्याना त्यावेळीं तारेला चागलें खजिल करावयाचें होतें. आठवड्यापूर्वी ती एकटीच गडावर देवळाच्या आवारात भेटली असताना त्यानें बावचळलेल्या चचल वृत्तीला बळी पडून तिच्याशीं अतिप्रसगाची काहीं भाषा वापरल्यामुळें तिनें 'आपल्या अर्धवट पिकल्या केंसाची लाज व अब्रू राखण्याऐवजीं तुम्ही देवाच्या दारीं उभें राहून त्या केंसाच्या तोंडाला हें डाबर फासलेंत' अशी त्याची जाता जाता कानउघडणी केली होती. त्याचा सूड घेण्यासाठीं तो आज इतका वेळ त्या दोघांचा सवाद ऐकत आगणात खोळबून उभा होता. ती वेळ त्यानें आज साधून घेतली.

कोणीं तरवारीचा घाव घातल्यानेंही तारेच्या हृदयावर जी जखम झाली नसती, ती यज्ञेश्वरशास्त्र्याच्या मर्मभेदी वाग्बाणाच्या घावानें झाली. ती तशीच लगबगीनें यज्ञेश्वरशास्त्र्यामागोमाग हाक मारीत धावूं लागली, "भटजी! जरा थाबा. कृपा करून जरा थांबा. मला तुमच्याशीं काहीं बोलायचें आहे."

सूर्याकडे पाठ करून आपण चालू लागलों कीं सावली आपल्या मागोमाग चरणाच्या दासीसारखी आपल्या चरणधुळींत लोळत धावत येते, हें यज्ञेश्वरशास्त्र्याना माहीत होतें. "त्या दिवशीं माझी उघड उघड अवहेलना करणारी ही नखरेल छेलछबेली आज माझ्यापाशीं कृपेच्या गोष्टी बोलू लागली, याचें कारण ती वर्मी सापडली आहे. ती आतां माझ्याशीं काय बोलणार आहे बरें? महिपतीशीं तिचें जें सभाषण आता आंधारात झालेलें मीं ऐकलें, त्यावरून दोघांच्याही पायाखालीं काहीं तरी आधार आहे यात तर सशय नाहींच. त्या आधाऱ्या गोष्टी आपल्या मालकिणीला कळू नयेत म्हणून ती माझी मनधरणी करणार असेल. आतां मजुळ बोल बोलणारी मैना बरी

फाशांत सांपडली आहे. हिला पिंजऱ्यात कोंडता आली तर कोंडण्याची हीच वेळ आहे." असे मनांत योजून ते पुढें जातां जातां म्हणाले, "मला आतां थांबावयाला वेळ नाहीं. काय बोलावयाचें तें पाहिजे तर देवालयात येऊन बोल."

'अडकली गाय आणि फटके खाय' अशा पेंचांत सांपडलेली तारा यशेश्वरशास्त्र्याच्या मागोमाग मुकाट्यानें कसायाच्या हातीं दाव्याला बांधलेल्या गाईसारखी गडावर निघाली. कां बरें?

## प्रकरण अकरावें

# समेट?

" हुजूर! मी आज एक अत्यंत शुभ वार्ता आपणाला कळविण्यासाठीं आलों आहें." प्रारभींची कुशलसमाचाराचीं चारदोन प्रश्नोत्तरें झाल्यावर महिपति तुळाजीला म्हणाला.

" कसली शुभवार्ता? ह्या तुळाजी आंग्र्याच्या कानाचें भाग्य शुभवार्ता ऐकण्याइतकें अद्यापिही थोर आहे काय? जावजी गवळी अथवा खडूजी माणकर याच्याकडून काहीं उत्तर आलें आहे काय?" तुळाजीनें उत्कठेनें विचारलें. पेशव्याशीं सलोखा करण्यासाठीं त्याचे आज सतत सहा सात महिने प्रयत्न चालले होते.

"त्या दोघाकडून तर आजवर कितीतरी वेळा निरोप व पत्रेंही येतच आहेत कीं आपण काय पाहिजे तें करून दोघाचा समेट करून देणार."

असें महिपति म्हणतो तोंच तुळाजीनें अधिरेपणानें त्याला हातानें गप्प रहावयाला सुचवीत म्हटलें, "त्या निरोपात काहीं अर्थ नाहीं. इतकी जर त्याना खरोखरच समेटाची व आंग्र्याच्या हिताहिताची कळकळ असती, तर त्याना इतक्या दिवसात हा प्रश्न समाधानकारक रीतीनें निकालात काढता आला नसता काय?"

"पण हुजूर! माणकर किंवा गवळी झाले तरी स्वतंत्र कुठें आहेत? अमूक एक गोष्ट करावी असें त्याना वाटलें, तरी ती ठराविक अशा सांच्यातून पार तर पडली पाहिजे? त्यांनीं बिवलकरांना शिफारस करावयाची—"

"त्या मात्रागमन्याचें नावदेखील माझ्यासमोर उच्चारूं नकोस. आमच्या सर्व दौलतीची धूळधाण जर कोणीं केली असेल, तर ती

एका त्या चाडाळानें. पेशव्याच्या मनात आग्ऱ्याविषयीं व आग्ऱ्याच्या मनात पेशव्याविषयीं काळें जर कोणी ओतीत असेल, तर एकटा तो! मुंबईकर इंग्रजाना फितूर प्रथम तो झाला, इंग्रजाकडून लांच खावून पेशव्याच्या दरबारीं त्याचें बस्तान प्रथम त्यानें बसवून दिलें. मीं असें-ही ऐकलें आहे कीं जजिरेकर सिद्दीदेखील त्याला लाच चारून वश करण्याच्या खटपटींत आहे. आणि सिद्दीच्या खटपटीला यश येणेंही दुरापास्त नाहीं. असला विश्वासघातकी नीच माणूस—माणूस कसला; पशु हा! आणि हा पेशव्याच्या गळयातला ताईत! यानें कोणतीही आगलावेपणाची गोष्ट पेशव्याना सुचवावी, व पेशव्यानीं त्याला मुकाट्यानें मान तुकवावी. माझ्याविषयीं बिवलकर मनातून इतका का जळतो, हें मला माहीत नाहीं असें नाहीं."

"का जळतो बरें?"

"तें सागावयाला मला तूर्त तोंड नाहीं. त्यात जितकी त्या पातक्याची बदनामी आहे, तितकीच माझीही बदनामी आहे त्याच्या अगावर चिखल फेंकण्यासाठीं माझ्या हाताला डाग मी पाडून घेऊं इच्छीत नाहीं." असें म्हणून तुळाजी एक दीर्घ निःश्वास सोडून गप्प बसला. महिपतीनें त्यावरून कयास बाधला कीं धैर्याचा व खांबिरपणाचा हा मेरूमणि ज्या विचारानें एकदम इतका हादरला, तो विचार तसाच भयंकर असला पाहिजे. पण अमर्यादेच्या भयानें त्यानें तुळाजीपाशीं त्या प्रकाराची जास्त छाननी करण्याचें टाळलें.

तो विषय आपण सोडून देऊ. तुझी आनदाची बातमी काय ती एकदां साग तर खरी!" तुळाजीनें विचारलें.

"पेशव्यांकडून आपणाशीं सलोख्याचा तह करण्याविषयीं मान्यता मिळाली आहे, व त्या मान्यतेनुसार रामाजीपत बिवलकर आपणाशीं सलोखा करण्याला तयार आहेत." महिपति उत्तरला.

"मग, आतां घोडें कोठें अडलें आहे?"

"आपणाकडून होकार मिळाण्यावर." एवढें बोलून महिपति एकदम थबकला. पुढें जें त्याला बोलावयाचें होतें, तें बोलण्याचें धैर्य

त्याला होईना पण तें बोलल्याशिवाय त्याला गत्यतरही नव्हतें. रामाजीपंतानें रगोबा साटमाला ज्या कामगिरीवर मुद्दाम पुढे पाठविलें होतें, त्या कामगिरीबाबत व महिपती आज मुद्दाम देवगडाहून इकडे आला होता.

रगोबा साटम ठाण्याहून मुद्दाम आठ दिवसापूर्वी तुळाजीकडे यावयाला निघाला, तो कोण या उद्देशाने, हें वाचकाना मागें गणोजी मान्याशीं झालेल्या त्याच्या संभाषणावरून कळून चुकलेंच आहे. सुभानराव सोडकराची कुळवीण विजयदुर्गावर आहे, तिचा शोध करून तिला माघारी पाठविण्याच्या कामगिरीवर तो आला होता. शिवाय महिपतीला फितूर करण्याची कामगिरीही त्याला करावयाची होती. महिपति वोळून चालून रगोबाचा मुलगा. त्याला फितूर करणें रगोबाला मुळीच अवघड गेलें नाहीं. महिपतिदखील मनातून ओळखून होता कीं सरखेलाची दौलत काही वाचत नाहीं, तिचे रक्षण करण्याची धडपड करणे आत्मघातकीपणाचें आहे. त्यातूनही इतके दिवस त्यानें टिकाव धरला याचे कारण, जर यदाकदाचित् पेशवे व आंग्रे याचा तह झालाच, तर आपलें आसन डळमळीत असू नये. आपण सरखेलाशीही गोड आणि पेशव्याशीही गोड. ऐन वेळीं ज्या बाजूला फायदा आहे असें दिसून येईल त्या बाजूला वळून लव्हाळ्याप्रमाणें वाकून आपल्या माथ्यावरून महापूर जाऊ द्यावा म्हणजे झालें. असें केल्यावर आपल्या हातातील गड तर जावयाचा नाही! त्यातूनही अलीकडे आंग्रे–पेशवे याच्या तहाचें घोंगडे अकारण बिन्मुदत कुजत पडलेलें पाहून तर महिपति जवळ जवळ ओळखून चुकलाच होता कीं तहाची चाळवाचाळव चालली आहे यात काहीं राम नाहीं. म्हणूनच त्यानें आतून रामाजीपंताला सामील होण्यासाठीं सधान बाधण्याचा उद्योग हळुहळू चालविलाच होता. त्या उद्योगाचें स्वरूप वाचकाना पुढें कळून येईलच. तूर्त येथें इतकें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं, रगोबा जो ठाण्याहून निघाला, तो प्रथम थेट देवगडीं आला. तेथें त्यानें पुण्यापासून एकदर वारा कोणत्या दिशेनें वाहत

आहे हें महिपतीला नीट समजावून सांगितल्यावर रामाजीपंताच्या पक्षाला आतून कां सामील व्हावें हें निराळें सांगण्याचें कारणच उरलें नाहीं. किंबहुना पूर्वीपासूनच त्याच्या मनात ते विचार घोळत होते. संकोच थोडासा त्याला वाटत होता तो म्हातारा काय म्हणेल याचा. तोही अर्थात् थोडासाच. पित्राज्ञा काहीं झालें तरी उल्लंघन करावयाचीच नाहीं, इतका पितृभक्त महिपति कधींच नव्हता. पण मार्गानें जाताना पायीं चालण्याऐवजीं सुंदर रथ जर अनायासें मिळाला तर तो कोणाला नकोसा होईल? अनायासें पित्राज्ञापालनाचें श्रेय पदरीं पडतें आहे तें कां न घ्या? अशा दूरदर्शीपणानें महिपति वागू लागला होता.

आणि चिरंजिवाचें आपल्याशीं इतकें एकमत असलेलें पाहूनच विशेष सलगीनें चिरंजिवाशीं वागण्याला रंगोबाला धीर आला होता. म्हणूनच श्रीमंत पेशव्यानीं सुभानराव सोंडकराच्या कुळबिणीविषयीची अट जी समेटाच्या मसुद्यात मुद्दाम हडसून खडसून घातली होती, तिची परिस्फुटता कशी करावयाची या बाबतींत त्याला महिपतीचें मत घेणें इष्ट वाटलें.

ही सुभानरावाची कुळबीण कोण व कुठें आहे, तिचा तुळाजी आंग्र्याशी संबंध काय, हें त्या पितापुत्रांना मुळींच माहीत नव्हतें. अर्थात् तुळाजीनें जर विचारलें कीं कुठें आहे कुळबीण ती दाखवून दे, तर काय सांगावयाचें? त्यापेक्षा इतक्या खोलात आपण न जातां नुसतें रामाजीपंताचें पत्र तेवढें तुळाजीला नेऊन द्यावें, आणि त्या पत्राचा परिणाम त्याच्या मनावर काय होतो हें सूक्ष्म दृष्टीनें पाहून तसें रामाजीपंताला कळवावें, एवढीच जबाबदारी पत्करून महिपति आज विजयदुर्गी आला होता

परंतु ताकाला जावयाचें आणि भांडें लपवावयाचें, ह्या दोन्ही गोष्टी एकदम कशा साधणार? अखेर महिपतीला मनाचा हिय्या करून तें पत्र बाहेर काढावेंच लागलें.

"सुभेदारानीं हें पत्र आपणाला दिलें आहे. माझे बाबा मुद्दाम

हें पत्र घेऊन आले आहेत." तें पत्र तुळाजीच्या हातीं देऊन महिपति म्हणाला, "ह्या पत्राची वाटाघाट पुण्यात श्रीमंत पेशव्याच्या दरबारात खासगी रीत्या झालेली बाबानीं ऐकली आहे. सुमेदारानें पुण्यातल्या कामगिरीवरही त्यानाच पाठविलें होतें."

तुळाजीनें तें पत्र घेऊन उघडून वाचलें. तेव्हा वाचता वाचता त्याच्या चर्येवर चिंता—दुःख—संताप—असहायता अशा विचाराचें जाळें दाटलेलें पाहून महिपतीनें तर्क केला कीं, पेशव्यानीं त्या कुळंबिणीच्या सुटकेची अट जी घातली आहे, आणि सुमेदारानेंही ती उचलून धरली आहे, तिच्यात तसाच महत्त्वाचा काहीतरी गुढार्थ भरलेला असला पाहिजे.

"श्रीमंत पेशव्याना लाज नाहीं वाटत असल्या हलक्या सलक्या गोष्टीत मन घालावयाला? सुमानजीसारख्या दीड दमडीच्या हरामखोराचा सुमेदारानें कैवार घ्यावा हें एका परीनें ठीक आहे. ते दोघेही एकाच किंमतीचे आहेत. पण असल्या क्षुल्लक माणसाच्या कुंटण्याचें काम श्रीमंत पेशव्यानी पत्करावें, व राजकारणात त्याला इतकें महत्त्व प्राप्त व्हावें!—एवढ्याचसाठी कारभारी झाले तरी खानदानीचे असावे लागतात. आंग्रे जे आजवर पेशव्याना मानीत नव्हते, ते एवढ्याचसाठीं. पिढीजाद थोराचें लक्ष्य असल्या किळसवाण्या क्षुद्र गोष्टींकडे कधींच जावयाचें नाहीं. मागें श्रीमंत थोरल्या बाजीरावाच्या वेळीं त्याच्या मस्तानीच्या बाबतीत नानासाहेबानी आपली पायरी सोडून ढवळाढवळ केली, तेव्हाच मीं त्याचें मन असल्या विषयात किती रमतें याची अटकळ केली होती. पण ती बाब खाशाच्या खाशा रक्षेची तरी होती. मस्तानीच्या हात धुवून पाठीला लागण्याजोगें कारण त्याच्या स्वतःच्या संसारात उत्पन्न झालें होतें असें मानलें, तरी इथें तसें काहीं नाहीं. सुभेदार श्रीमंताचा सेवक आणि सुमानराव सुभेदाराचा सेवक. त्या सेवकाच्या सेवकाचा—कुळंबिणीचा कैवार श्रीमंतानीं घ्यावा, आणि मलाही त्यात गोंवावें ना! नशीब म्हणावयाचें, दुसरें काय?" थोडा वेळ तुळाजी स्तब्ध राहिला, व पुन्हा निग्रही वाणीनें

उत्तरला, " नाहीं. नाहीं. माझ्या साऱ्या दौलतीची राखरांगोळी झाली तरी चालेल. पण मी असली नामुष्कीची अट कधींच मानणार नाहीं. एक वर्षापूर्वी ह्याच पोरकट प्रश्न श्रीमतानीं आपल्या एका पत्रानून उपस्थित केला होता. त्याना तेव्हा लाज वाटली नाहीं, पण मला वाटली, म्हणून मीं तें मनावर घेतलें नाहीं. पण आज पुन्हा तीच मानगड!—बस्स! श्रीमत पेशव्याना म्हणावें, ह्या तुळाजी सरखेलाचा जीव गेला तरी बेहेत्तर. पण तो असल्या अपमानकारक अटीवर तह करावयाला कधींच राजी होणार नाहीं. असलें कुटण्याचें काम ह्या तुळाजीला त्याच्या वाडवडिलानीं कधीं शिकविलें नाहीं. इतका न्यायाचा उमाळा जर श्रीमताना येतो,—त्याना म्हणावें, तुम्हीं आजवर काय केलें? दिल्लीहून हिंगण्यानीं तुम्हाला खुपसूरत पोरी पुरवल्या, सुभेदारानेंही अर्थात् पुरवल्याच असतील. त्या धन्यानाही आपल्या पदरच्या मातबर वकील—सुभेदारापाशीं असल्या मागण्या करायला सकोच वाटला नाहीं, आणि त्या वकिला—सुभेदारानाही धन्याची विषयासक्तीची भूक शमविण्याला लाज वाटली नाहीं. पण हा तुळाजी म्हणावें, सिंहाचा बच्चा आहे. तो पिंजऱ्यात कोंडला गेला असला तरी तो गवत कधींच खाणार नाहीं."

तो विषय तुळाजीच्या इतका वर्मी का झोंबावा, हें महिपतीला नीटसें कळेना, लहान तोंडी मोठा घास घेऊन जास्त चौकशी करण्याची त्याच्या मनाची तयारीही नव्हती. "त्या कुळंबिणीशीं सरखेलाचा काहीं सबंध असेल काय? एरव्हीं त्याच्या तळपायाची आग एवढी मस्तकाला जाऊन का बरें झोंबेल?" असे विचार ओघासरसे त्याच्या मनात आले, ते तसेच बाजूला सारून आता सरखेलाच्या अनावर वृत्तीला आवरावें कसें हा प्रश्न सोडविण्यात तो क्षणभर गढून गेला. वस्तुतः तुळाजीनें 'अरे' म्हटलें तर 'का रे' म्हणण्याला रामाजीपताचा पक्ष पूर्ण सबळ होता. ती कोणत्याच प्रकारची जबाबदारी सकृद्दर्शनी महिपति अथवा रंगोबा याच्यावर नव्हती. पण ज्या अर्थी रामाजीपताच्या सबळ पक्षात सामील होण्याचें त्या बापलेकाचें

ठरलें, त्या अर्थी तेंच महिपतीच्या पराक्रमाचें क्षेत्र बनलें, व त्या क्षेत्रात कोणता पराक्रम गाजवून रामाजीपंताला प्रसन्न करावयाचें या-विषयींच्या योजनेचा कांहींतरी आराखडा त्यानें अगोदरच देवगडा-हून इकडे यावयाला निघतानाच आखून घतला होता. त्यात आता प्रत्यक्ष फलश्रुतीचा रंग मात्र भरावयाचा होता. तो रंग आता भरू लागला होता.

आता जर तुळाजीनें अजिबात धुडकावून लावलें तर रंगाचा बेरंग होणार, हें ठरलेलें होतें. तसें महिपतीला व्हावयाला नको होतें स्वतःची पोळी भाजून घेण्यासाठीं त्याला ती होळी पेटती व्हावयाला हवी होती. त्यासाठीं आपलें तुळाजीवर असलेलें सर्व वजन एकदम धाडसानें पणाला लावून तो धैर्यानें म्हणाला, "सरकार! मला देखील सुभेदाराची ही अट अत्यंत चमत्कारिक वाटते पण तिला आपण इतकें बुजण्याचें कारण नाहीं असेंही मला वाटतें."

"तें कशावरून?"

"असें पाहा, हें मत एकट्या सुभेदाराचें—वैयक्तिक आहे स्वतः श्रीमंत पेशव्याचें मत सुभेदाराच्या मताशीं जुळतच असेल असें गृहीत आपण कशावरून धरणार?"

"सुभेदार श्रीमंत पेशव्यांचें आत्मलिंग आहे म्हणून."

"पण इथें एकट्या सुभेदाराच्या मताला फार फार तर तिसरा हिस्सा मोल आहे. कोंकणपट्टीच्या राज्यकारभारात कुकवाला धनी सुभेदार असले, तरी गवळी व माणकर जसें बोलतील तसें दळ हलणार आहे. ते दोघेही सुभेदाराच्या हातांतील कळसूत्री बाहुल्या प्रमाणें आहेत."

"नाहीं. हें मात्र मी कबूल करणार नाहीं. आज ते दोघे आपल्या विरुद्ध वागतात याला कारण सुभेदारानें त्याचा भलताच गैरसमज आपणाविषयीं करून दिला आहे हें आहे. पण आपण तरी एकट्या सुभेदाराला इतकें महत्त्व कां म्हणून देतां? आपण माझ्या मतें असें करावें, अनायासें गवळी व माणकर हे आपणाशीं तडजोडीची भाषा

करण्याला पूर्वीपासून राजी आहेत, त्याच्याशी काय ती नक्की योजना ठरवून ती त्याच्याच हातून अमलात आणून घ्यावी की काम झालें."

पण गवळी व माणकर तरी सुभेदाराचें मत घेतल्याखेरीज स्वतंत्र पणें तहाची वाटाघाट करू शकतील असें थोडेच आहे?"

का नाहीं करणार? सरकार! आपण गवळी–माणकराना काय समजता?"

"तीं सुभेदाराच्या हातातील कळसूत्री बाहुली आहेत यापेक्षा काहीं नाहीं."

"आपण मला क्षमा करा. पण हा आपला निव्वळ गैरसमज आहे. आपण समजता त्याप्रमाणे गवळी काय, माणकर काय, कोंकण पट्टींतील मानबर कारभाऱ्यानीं आपली सदसद्विवेकबुद्धि सुभेदारापाशीं मुळींच गहाण ठेवलेली नाहीं त्याना स्वतंत्रपणें परिस्थितीचा विचार करण्याची शक्ति आहे, व सारासार विचाराला पटेल ते करण्याचेंही सामर्थ्य त्याच्या ठायीं आहे."—

"मग काय, त्याना व्यक्तिशः माझा मात्र द्वेष करावासा वाटतो?"

"नाहीं तसेंहा नाहीं आपला द्वेष ते कुठें करत त? उलट आपणा-विषयीं आदर त्याच्या मनात् आहे

"म्हणूनच त्यानीं माझा चोहोंकडून असा कोंडमारा चालविला आहे वाटतें! कीं तुला त्यानीं आपल्या बाजूला पळवून घेऊन आपणा-सारखें बोलायला शिकावेलें आहे? अशीच काहीं तरी भानगड मला दिसते. एरव्हीं इतके दिवस नित्य त्या दोघाविरुद्ध बोलणाऱ्या तू आज त्याच्या वतीनें माझ्यापाशीं इतकी तरफदारी केली नसतीस."

"असा सशय आपण घतला म्हणजे सर्वच भागलें! पण सरकार! मनुष्यानें अनुभवानेंदेखील शहाणें होऊ नये का? आज इतके दिवस आपल्या आज्ञेनें मी त्या मडळीशी समट करण्यासाठीं खटपट करीत आहे. इतक्या दिवसात मला त्याचा जो अनुभव आला, तो जमेला धरून मी वागतें आहे आजदेखील मी मुद्दाम इकडे आलों तो सुभेदाराच्या पत्रासाठीं नव्हे, तर त्या दोघा आपल्या हितकर्त्या

म्हाताऱ्यांच्या आग्रहाच्या सांगण्यावरून. त्याना मीं जेव्हा सुभेदार हा नुसत्या पेशव्याचाच काय पण इंग्रजाचाही पक्षपाती असल्याचें पटवून दिलें, तेव्हा त्याना तें खरें वाटलें, व आपण उगाचच त्याच्याशी दावेदारी करता, आपली वृत्ति छत्रपतींची सत्ता लाथाडण्याची आहे, असा त्याचा गैरसमज जो सुभेदारानें करून दिला होता, तो बहुतांशीं दूर झाला आहे."

"पण सुभेदारानें कांहींही सांगितलें, तरी खंडूजी माणकर काय अथवा जावजी गवळी काय, इतके दिवस आंग्र्याच्या दौलतींत वहिवाटलेले आहेत. मी त्यांना मुलगा शोभेन इतका त्याचा अनुभव दांडगा आहे त्याना मी कसा आहें हें माहीत असावयाला नको होतें काय?"

"माहीत असावयाला हवें होतें, आणि माहीत होतेंही पण—"

"पण काय?"

"सरकार! मी जरा स्पष्ट बोलतों याबद्दल मला क्षमा करा. आपल्या घरातली भाऊबंदकी ही आपणाला मुख्यतः नडते आहे. अगदीं पहिल्यापासून आपण विचार करा. आंग्र्याच्या दौलतीवर श्रीमंत पेशवे रुसल्याचा प्रकार कांहीं आजकालचा नाहीं. त्याचें रुसणेंही केवळ अन्यायाचें आहे असें आपणही म्हणू शकणार नाही पेशव्याचें काम छत्रपतींची दौलत अधिकाधिक वैभवशाली करून हिंदवी स्वराज्याचा हिंदवी साम्राज्याएवढा जगङ्व्याळ विस्तार करण्याचें आहे. त्याच्याशीं आंग्रे मूळपासूनच फटकून वागल्यावर त्याना आंग्र्याचा राग का येऊं नये? त्यातूनही पेशव्याना आंग्र्याच्या कारभारात ढवळाढवळ करण्याला संधी फार वर्षांत मिळाली नव्हती, ती संभाजी सरखेल आणि मानाजीबाबा यांच्या भांडणामुळें मिळाली आपल्या दौलतींतही भाऊबंदकी माजलीच नसती, तर पेशव्याचा शिरकाव तिच्यात कसा झाला असता? आणि पेशव्यांच्या सावली मागून लपत छपत इंग्रजांना आंत प्रवेश कसा मिळाला असता? तेंच कारण आजच्या संकटाच्या मुळाशीं देखील आहे. तेव्हां झालें तें

होऊन गेलें. पेशव्यानीं आग्र्याच्या दौलतीचीं दोन शकलें केलीं तीं नव्हेशीं झालीं नाहीत, व तें तितकेंसे शक्यही नव्हतें ''

"शक्य का नव्हतें? मानाजीबावांना जर मनावर घेतलें असतें, तर आमच्यातली भाऊबंदकी संपून दौलतीत एकोपा झाला नसता का? ही एकी न होण्याच्या पातकाचे मानाजीबाबाच धनी आहेत. ते जर पेशव्याच्या तोंडानें पाणी प्यावयाचें साटते असते, तर आमचा एकोपा हा हा म्हणता झाला असता. मुळातच त्यानी सभाजीबाबाशीं दावेदारी माडून पेशव्याच्या आहारी जावयाला नको होतें ''

"पण त्याबरोबर हेंही खरें नाही का? कीं, मानाजीबाबानी गाय मारली म्हणून सभाजीबाबानी, आणि त्याच्या पश्चात् आपणही वासरू मारावयाला नको होतें.''

"मीं वासरू मारलें नाही. गेलें सबंध वर्ष मी आपसात एकी करण्यासाठीं मानाजीबाबाशीं दानाच्या कण्या करीत आहें ''

"पण—आता एक विचारू का? यळव्या चौबुरुजीवर आनंदराव धुळपानें हल्ला केला तेव्हा मानाजीबाबानीं किती परीनी आपली साह्यार्थ मनधरणी केली? पण आपण ती जुमानली का? त अपमान-शल्य त्याच्या अतःकरणात बोचत असताना तुम्हाला साह्य करण्याची वासना त्याना कशी होईल? खरोखर, त्या आणीबाणीच्या वेळी आपण इतकी कठोर वागणूक दाखवावयाला नको होती. तेव्हाच आपणा दोघामधली भाऊबंदकी संपून सलोखा व्हावयाला फार चागली वेळ होती. ती सोन्यासारखी वेळ आपण दवडली, म्हणून शत्रूला फावलें. मला वाटतें, माणकर, गवळी वगैरे मडळीत आपणाविषयीं गैरसमज उत्पन्न व्हायला अगदी अलीकडचें ताजें असें हें कारण होय.''

"मी तेव्हा तसा वागलो याचें कारण मानाजीबाबाचें पूर्वीचें वर्तन होय. पेशवे आपल्या दौलतीचा नाश करावयाला उभे आहेत हें उघड उघड कळत असताना इतकी वर्षे पेशव्याच्या तोंडानें पाणी प्यावयाला त्यांना काहींतरी खत वाटायला हवी होती मीं त्याना साह्य केलें नाही यांत माझें काही चुकलें असें मला मुळीच वाटत नाहीं.''

"आपलें कांहीं चुकलें नसेल, पण परिणाम काय झाला ? रामाजी-पंताला मानाजीरावाच्या दौलतींत पुन्हा हात शिरकवायला आणि आपल्या विरुद्ध त्याच्याशीं मैत्री करायला फावलें. मानाजीराव जर त्याना सामील झाले नसते, तर सुवर्णदुर्ग त्याना जिंकताच आला नसता. असेंच केव्हा ना केव्हा आपणाकडून माणकर व गौळी यांचेंही मन दुखवलें गेलें आहे. तशात त्यांनीं पाहिलें कीं मानाजीरावही सुभेदाराच्या बाजूचे. त्यामुळें साहजिकपणेंच त्याना सुभेदाराचा पाठपुरावा करणें अवश्य वाटलें. तथापि परमेश्वराच्या कृपेनें आता वातावरण निवळत आहे, त्यालाही कारण आपण तडजोडीला तयार आहां हें होय. इतकी जर आपली तयारी नसती, तर त्याना काय किंवा मला काय, तडजोड व्हावी असें वाटून त्याचा काय उपयोग होता ?— म्हणून म्हणतों, आपण सुभेदारच्या पत्राचा प्रश्नच डोक्यांतून काढून टाका. सुभेदाराला तादळातल्या खड्यासारखा बाजूला काढून ठेवूनही आपणाला तह करता येण्याजोगा आहे."

"तो कसा काय ?"

"सुभेदाराचें पत्र आठ दिवसापूर्वींचें आहे. पण त्यापूर्वींपासूनच माणकर व गवळी यानीं अशा तडजोडीला मान्यता दिली आहे. सुभेदाराच्या क्षुल्लक गोष्टींना राजकारणात महत्त्व देण्याइतक्या हीन वृत्तीचे ते दोघेही नाहींत. आपण आता असें करावें.—मी मुद्दाम आलों आहें तो माणकर व गौळी याच्याशीं वाटाघाटीचा बेत शक्य तितक्या लौकर तडीला नेण्यासाठीं. सुभेदार अजून ठाण्याहून इकडे आल्याचें ऐकिवात नाहीं. तो येऊन त्याची त्या दोघाशीं भेट होण्या-पूर्वीं आपण जर त्या दोघाशीं निश्चित वाटाघाटी करू शकलों, तर मग कसलेंही भय नाहीं"

"बरें, मग कुठें वाटाघाटी कराव्या असें त्यांचें मत आहे ?"

"त्याचें मत आहे त्याप्रमाणेंच माझेंही मत आहे कीं आपण यशवंत गडावर आज या घटकेला माझ्याबरोबर चालावें. मीं त्या दोघांनाही अगोदरच तिथें यावयाला सांगितलें आहे, व त्यांनींही यावयाचें कबूल

केलें आहे. त्यांची व आपली एकदा दिलसफाई झाली, कीं . "

"पण ती सुभेदाराला मान्य झाली पाहिजे ना? सुभेदाराला मान्य झाल्याखेरीज ती पेशव्याना मान्य होईल अशी खात्री आपणाला कशी बाळगता येईल? नाहींपेक्षा आम्हीं वाटाघाटी करून काहींतरी नक्की योजना ठरवावी, आणि त्यावर सुभेदारानें मागाहून येऊन नेमका बिब्बा घालावा!"

"तें शक्य नाहीं. माणकर गवळी ठरवितील त्यात बिब्बा घालण्याची सुभेदाराची माय व्याली नाहीं. असें पाहा, सुभेदार सुभेदार म्हणजे तरी काय? गवळी व माणकर याना अमान्य असणारी गोष्ट जर सुभेदार करूं म्हणेल, तर त्याला कोण करू देईल? मुकाट्यानें त्याला आमच्यासमोर मान नमवावीच लागेल, आणि पेशव्यानाही गौळी–माणकर आणि आपण ह्या तिघानीं ठरविलेली तडजोडीची योजना मान्य करावी लागेल. समजा, इतकेंही करून त्यानीं शेवटीं ती योजना मान्य केली नाहीं, तर माणकर व गौळी उघड उघड आपल्या निशाणाखालीं उभे राहून लढावयाला कचरायचे नाहींत. मग सुभेदार आणि पेशवे याची काय गत होईल? तशीच वेळ आली, तशी वेळ येऊं नये पण मी म्हणतों आली, तर या एका कारणास्तव इंग्रज आणि पेशवे याचेंही वाकडें येऊन इंग्रज आपणाला साह्यकारी व्हावयाला चुकायचे नाहींत. इंग्रजाना जितके आंग्रे नको आहेत, त्याहीपेक्षां त्याना पेशवे नको आहेत. पेशव्याचा नक्षा उतरायला संधी मिळते असे दिसताच इंग्रज ती कधींच दवडावयाचे नाहींत.–"

"नको. तेवढें मात्र नको " तुळाजी इतका वेळ शांतपणें बोलत होता. पण इंग्रजाचें नाव कानीं पडताच त्याचें चित्त एकदम खवळलें. तो पूर्ण नापसतीदर्शक चर्या करून उद्गारला, "पेशवे आणि आंग्रे याच्यातलीं भांडणें कितीही विकोपाला गेलीं, तरी हा तुळाजी आंग्रा आपल्या हयातींत कधींच तशी संधी साधू देणार नाहीं पेशव्यानीं एक अशा परक्या प्रतिस्पर्ध्याशीं मैत्री करून आंग्र्याना धुळीला मिळविण्याचा स्वराज्यद्रोही डाव साधला. पण आंग्रे त्यातले नव्हेत.

पेशव्यांना मराठी स्वराज्याचें वैभव जवळ जवळ आयतें मिळालें आहे. पण तें स्वराज्य स्थापन करण्यासाठीं आंग्र्यानीं शिवाजी महाराजांच्या खांद्याला खांदा भिडवून लढता लढता आपल्या रक्ताची पावळी केली आहे. आंग्रे आणि पेशवे यांच्या भांडणात ते एकमेकांचे प्रतिस्पर्धी असले, तरी परक्याशीं झगडण्याची वेळ आली कीं ते दोघे एकच असले पाहिजेत, आणि असतीलही. माझी सारी दौलत बेचिराख झाली तरी बेहेत्तर पण पेशव्याच्या विरुद्ध—मराठशाहीविरुद्ध इंग्रजांना मदत?—नाहीं—कालत्रयींही हें शक्य नाहीं. आणि तूं देखील असली भलती गोष्ट माझ्यापाशीं काढावयाला नको होतीस. दौलती राखा वयाच्या, नावारूपाला आणावयाच्या, त्या कोणासाठीं? वाटेच्या वाटसरासाठीं! आज लोक माझा पडता काळ ओळखूनही माझ्या निशाणाखालीं उभे आहेत, ते माझ्या स्वाभिमानाला व प्रामाणिक-पणाला मान देऊन उभे आहेत त्यांना जर असली नुसती कुणकुण लागली, तर अनर्थ होईल. हा उपाय तू आपल्या पदरचा सुचविला आहेस, कीं गौळी, माणकर यांचेंही मत असेंच आहे?" खरें काय असेल तें सांग.

तुळाजीचा तो प्रश्न ऐकून महिपतीला—कायसें म्हणतात ना, भीक नको पण कुत्रा आवर यासारखें होऊन गेलें. सहज शहाणपणाची चुणुक दाखवून तुळाजीवर आपली छाप पाडण्यासाठीं म्हणून तो गेला, ते त्याचे शब्द नेमके त्याच्या आंगाशीं आले. ते स्वकपोल-कल्पित उपाय त्यानें माणकर—गौळी यांच्या माथीं कोणत्या तोंडानें मारावे? त्याला माहीत होतें कीं सरखेल त्याबद्दल त्या दोघांना समक्ष हटकावयाला कमी करणार नाहींत. बरें; स्वतःची कल्पना म्हणून कबूल करावें, तर लहरी खाशाची मर्जी खपा होण्याला तेवढेंच निमित्त पुरलें असतें. पण त्या प्रसंगाची सारवासारव करण्यासाठीं कांहींतरी उत्तर देणें अवश्य होतें. तो भीत भीत उत्तरला, "उपाय असा नव्हे; पण आपण कोणताही मार्ग स्वीकारावयाचा ठरविला तरी आपल्या मागोमाग का व कसें अशी जरादेखील चिकित्सा न करतां येण्याला

आम्ही आपले सेवक म्हटल्या घटकेला तयार आहों, एवढेंच माझें म्हणणें. बाकी, तशी पाळीच कशाला येते म्हणा!"

"तशी पाळी येणार नाहीं, आणि यदाकदाचित् सकटावर सकटें एकाहून एक महाभयकर अशीं कोसळू लागल्यामुळें माझी दानत चळू लागल्याचें तुम्हा कोणाला दिसून आलें तर तुम्ही माझी पर्वा न करता, 'हे धनी, यांना तुम्ही चुकला असें कसें म्हणू' असें मनात न आणता जिथल्या तिथें माझी कानउघाडणी केली पाहिजे,—बरें, तू काय म्हणतोस? कुठें तहाच्या वाटाघाटी करणें इष्ट आहे? यशवतगडावर?"

"होय."

"इथें नाहीं का जमणार?"

"इथें देखील जमेल. न जमायला काय झालें? पण माझें मत आपण विचाराल तर यशवतगडच योग्य आहे. यशवतगडावर वाटाघाटी करण्याचें मीं कबूल केलें आहे, व ती जागा त्यानाही मान्य आहे. त्यांना मान्य आहे असें म्हणण्यापेक्षा मींच त्याना ती जागा मान्य करावयाला लावली असें म्हणाना! विजयदुर्गावर देखील वाटाघाटी करण्याला त्याची ना नव्हती. पण मींच नको म्हटलें. वाटाघाटींत आपल्या मनाजोगेंच सर्व काहीं निष्पन्न होईल अशी खात्री जोंवर नाहीं, तोंवर त्या निमित्तानें तरी त्याचे पाय विजयदुर्गात कशाला रोंवायला हवेत? शिवाय इंग्रज आपल्या हालचालींकडे डोळयात तेल घालून पाहत आहे. कालच त्याचें एक जहाज इथून टेहळणी करून गेल्याचें मला आता कळलें. समजा, आमची आपसात एकी होत असल्याची कुणकुण जर इग्रजाच्या कानावर गेली, तर ते पेशव्यांना, त्यांच्या सर्व सेनापतींना व दर्यासारगाना धाब्यावर बसवून त्या जागीं आपणाला वेढावयाला कमी करावयाचे नाहींत आणि पुन्हा अवेळीं लढाईला तोंड पडून दुर्दैवानें इग्रजांची सरशी होते असा रग दिसल्यास आपणाविषयीं पेशव्याच्या लोकांना वाटणारा दबाव दूर होऊन चढाईचें धोरण पत्करण्याचा मोह त्यानाही पडावयाचा. त्यापेक्षां मला वाटतें, यशवतगड हीच जागा वाटाघाटींना चागली आहे."

"नाहीं–नाहीं." असे शब्द नेमके त्याच वेळीं आतून निघालेले महिपति व तुळाजी याच्या कानीं आले. त्याचें तुळाजीला काहींच वाटले नाहीं, पण महिपतीच्या अंगावर मात्र कांटा उभा राहिला. त्यानें ओळखलें, त्याच्या सासऱ्याचे–कुशाबाचे ते शब्द होते.

तोंच कुशाबा लहानग्या झुंझाररावाला खांद्यावर घेऊन खेळवीत तेथें आला त्याची आणि महिपतीची नजरानजर झाली मात्र, आणि अहि–नकुलाची गांठ पडल्याचा भास तुळाजीला झाला. कुशाबानें त्याच क्षणी तिरस्कारानें तोंड फिरविलें. महिपतीनें लज्जित होऊन खालीं मान घातली.

हा अनुचित प्रकार तुळाजीच्या ध्यानीं आला असें पाहतांच कुशाबा त्या विषयाला अजिबात कलाटणी देण्याच्या उद्देशानें झुंझार-रावाला कुरवाळीत तुळाजीला उद्देशून म्हणाला, "धाकटे सरकार म्हणतात कीं आपण पुन्हा विजयदुर्गांत आपल्या राजवाड्यात राहा-वयाला जायचें. त्याना इथें करमत नाहीं. त्याना मी म्हणालों इतक्यात जायचें नाहीं."

झुंझारराव अवघा तीन वर्षांचा चिरमुडला बालक खरा. पण वृत्तीनें जणू सिंहाचा छावा होता. त्याचें तेज थोडेंच झाकून राहतें! त्याला कुशाबाचा विरोध सहन झाला नाही. तो संतापून कुशाबाला झिटकारीत म्हणाला, "नाहीं म्हणून सांगणारा तू कोण? माझ्या गडावर मी जाणार. नाहीं म्हणशील तर खबरदार! मी आईसाहेबाना बाबासाहेबाना घेऊन जाणार. मला कोण अडवणार आहे?" आवेशा-सरसा तो एकदम कुशाबाच्या खांद्यावरून खालीं उतरला, व महिपति समोर उभा असलेला पाहून म्हणाला, "हा पहा महिपतिमामा मला न्यायला आला आहे. आईसाहेब मला रोज सांगतात कीं महिपति-मामा आला म्हणजे त्याच्याबरोबर आपण सुवर्णदुर्गांवर जायचें.– आम्हाला न्यायलाच तू आलास ना रे?"

कुशाबा समोर आल्यामुळें चिंताव्याकुल झालेल्या महिपतीच्या जिवाला झुंझाररावाच्या बाळबोलाचा तेवढाच विलक्षण धीर मिळाला.

कुशाबासमोर तोंड काढावयाला तो ओशाळला होता, तो धीटपणानें हसत हसत झुझाररावाला घेण्यासाठीं हात पुढें करून म्हणाला, "होय बाकटे सरकार! आपण आता लौकरच सर्वजणानीं मिळून सुवर्ण-दुर्गावर जायचें बरें!"

"आणि आईसाहेबदेखील?" झुझाररावानें महिपतीकडे जाऊन विचारलें.

"आईसाहेबदेखील." महिपति झुझाररावाला उचलून कडेवर घेऊन म्हणाला.

"ह्या कुशाबाला मात्र आपण बरोबर न्यायचें नाहीं. त्याला राहूदे इथेंच." झुझारराव रागानें कुशाबाला पाहत म्हणाला.

"आतां सासरे–जावयात भाडण लावायला तूच कायतो बाकी उरला आहेस." तुळाजी मुलाचें कौतुक करीत हसत हसत बोलून गेला.

"हो! मी भाडण लावणार. आणि महिपतिमामाला सागून कुशाबाला तुरुगांत डाम्बून टाकणार." झुझारराव महिपतीकडे पाहत म्हणाला, "चल रे महिपतिमामा! आपण आईसाहेबाकडे जाऊ."

## प्रकरण बारावें

# सासरे-जांवई वैरी वैरी

"आता कुशाबाला तुरुगात डाम्बावयाचें तेवढेंच बाकी उरलें आहे. तेवढें एक केलेंत, म्हणजे तुमचे आमचे पितर उद्धरले." कुशाबा महिपतीवर एकेक डोळा लिंबाएवढा रोखीत म्हणाला.

परतु महिपतीला तेव्हा सासऱ्याशीं वाद खेळावयाचा नव्हता. त्याला माहीत होतें की आपण समोरासमोर आल्याची सधी मिळताच सासरा आपणावर तोंडसुख घ्यावयाला कमी करणार नाहीं. म्हणूनच तो भिऊन वागत होता. तो सासऱ्याला इतका भीत होता अशातली गोष्ट नाहीं भिण्यापेक्षा सासऱ्याला व सर्व वडील मडळीला गुडाळून ठेवून अरेरावीनें वागण्याबद्दलच त्याची जास्त ख्याति होती. सासऱ्याला सासरा म्हणून न ओळखता वैरी समजून त्याचें शासन करण्यालाही त्यानें कमी केलें नसतें. पण तशी ती वेळ नव्हती व तें स्थळही नव्हतें. त्यामुळें तो सासऱ्याचे उद्गार मनात ठेवून झुंझाररावाच्या भाबड्या बोलाचें निमित्त साधून लक्ष्मीला—आपल्या मानलेल्या बहिणी-ला भेटण्यासाठीं म्हणून झुझाररावाला कडेवर घेऊन आंत गेला.

"तुम्हा सासरे जावयात इतका विस्तव देखील जाईनासा केव्हां-पासून झाला?" तुळाजीनें कुशाबाला विचारलें.

"सरकार! तें आपण मला विचारू नये आणि मी आपणाला सागू नये. एवढ्याचसाठीं आजवर मीं कधीं हा विषय आपणापाशीं काढला नाहीं. पण खरें सागावयाचें तर माझा जावई कधींच मेला आहे. आणि माझी एकुलती एक पोरगीही ज्या दिवशीं अशा नादानाच्या नावानें बाटली, त्याच दिवशीं मेली. असें मी समजून आजवर वागत आहें. बाकी, असें बोलणें सोपें असलें तरी [illegible]

आपण हा प्रश्न मला उगीच विचारलात." असें म्हणून कुशाबानें तोंड फिरविलें, व डोळ्यात उभे राहिलेले दुःखाश्रु तुळाजीला नकळत पुसून पुन्हा विचारलें, "बरें, आमचे जावईबुवा आज मुद्दाम कोणत्या निमित्तानें आले होते?"

तुळाजीनें महिपतीच्या आगमनाचें कारण थोडक्यात पण साग्र कुशाबाला निवेदन केलें, व अखेर सांगितलें, "सुभेदाराचें कृष्ण कारस्थान तर यात उघड दिसतें आहे. पण गवळी आणि माणकर यानीं जर ही खासगी बाब मनावर घ्यावयाची नाहीं असें ठरवून सलोख्याची भाषा काढली, तरच सलोखा शक्य आहे. पण माझी प्रभावती पणाला लावल्याखेरीज गत्यतरच नसेल, तर तिच्यावरून मी ही दौलतच काय, माझे पचप्राणही ओंवाळून टाकीन."

"गवळी व माणकर ह्या प्रश्नावर भर देणार नाहींत अशी तरी आपली खात्री आहे का? नाहीं तर हात दाखवून अवलक्षण कशाला उगाच?" कुशाबानें आजूबाजूला कोणी ऐकत तर नाहीं ना, अशी खात्री करून घेऊन हळूच विचारलें.

"महिपति तसें म्हणतो खरें. पण त्याची तरी खात्री काय? पुन्हा मी महिपतीला स्पष्ट विचारू का?"

"नका. दिवेवातीनें आपलीं गृहछिद्रें इतराना दाखविणें बरें नाहीं. महिपति आपला एक विश्वासू गडकरी आहे, आणि माझा तर तो जावईच आहे. त्याच्या बाईलपणाचा गळफास माझ्या पोरीच्या गळ्याला लागलेला आहे त्या अर्थी त्याच्याविषयीं मी अविश्वास दर्शविणें म्हणजे स्वतःच्या हातानें स्वतःच्या तोंडाला काळोखी फासून घेण्यासारखें आहे. पण–" एवढें बोलून कुशाबा अडखळला.

लगेच तुळाजीनें त्याला काहींसें निक्षून सांगितलें, "तें काहीं मला तूं नको सांगूस. कोणत्याही कारणानें तुझें मत महिपतीविषयीं कलुषित झालेलें असो, तें विष तूं पुन्हा माझ्यापाशीं ओकण्याचा प्रयत्न करूं नकोस. कुशाबा! जितका माझा तुझ्यावर विश्वास आहे, तितकाच महिपतीवरही विश्वास आहे. तुला मी पित्याच्या ठायीं पूज्य मानतों,

तर महिपतीला धाकट्या भावाच्या ठायीं पूज्य मानतों. माझी अशी पूर्ण खात्री आहे कीं तसाच प्रसंग आला तर तुम्ही दोघेही सासरे—जावई माझ्या जिवावरून स्वतःच्या पंचप्राणाची कुरवंडी करावयाला कमी करणार नाहीं. मला वाटतें, पेशव्याच्या पत्रांतील कुळंबिणीचा संबंध माझ्या प्रभावतीपावेतों पोंचता हें त्याला अजून माहीत नसावें. एरव्ही त्यानें हें पत्र इतक्या धीटपणें माझ्यासमोर आणलेंच नसतें. तें रहस्य त्यालाही माहीत नाहीं, आणि रंगोबालाही माहीत नाहीं. तू, मी आणि प्रभावती या तिघांखेरीज कुणालाच त्याचा मागमूस देखील नाहीं. पण आता महिपतीला सांगावयाला मला वाटतें कांहीं हरकत नाहीं. प्रभावती तुझी मानलेली लेंक आहे, तशीच ती महिपतीची मानलेली बहीण आहे. पेशव्यांनीं आपल्या नादान हस्तकाच्या नादानें प्रभावतीची—त्याच्या मानलेल्या बहिणीची अब्रू दोन वर्षांपूर्वीपासून हळू हळू सलोख्याच्या कामीं पणाला लावली, त्यामुळेंच आंग्रे आणि पेशवे यांच्यातील सलोख्याचे पूर्वीचे सारे प्रयत्न फोल ठरून त्यांच्यात छत्तिसाचा आंकडा लिहिला गेला, हें आता तरी महिपतीला कळावयाला नको काय?"

"उगी रहा. तोंड आवरा." कुशाबानें आतल्या महालांत महिपति व प्रभावती यांचें संभाषण चाललेलें बाहेर येता येता ओझरतें ऐकून एकदम तुळाजीला सावधगिरीची सूचना दिली.

"तें कांहीं नाहीं. महिपति! तू धन्याच्या जिवासाठीं स्वतःचा जीव देशील व त्यांना आपल्या देहाच्या पायघडीवरून यशवंतगडावर चालवीत नेशील याविषयीं जरी माझी खात्री असली, तरी तुझ्या देहाची पायघडी केवळ माझ्या पायीं आमच्या वैऱ्याकडून निष्कारण तुडवली जावी असें मानणारी निष्ठुर बहीण मी नाहीं. मी कांहीं केल्या आज त्यांना आणि तुलाही जाऊं द्यायची नाहीं." नुक्तेंच अभ्यंगस्नान केल्यामुळें ओले केंस पाठीवर मोकळे सुटले आहेत, हातांत पूजेचें साहित्य आहे व भालप्रदेशाचा कुंकुमटिळक घाईघाईनें शालूचा पदर सावरतां सावरतां नकळत पुसला जाऊन भालप्रदेशावर तांबडा

डाग मात्र दिसतो आहे, अशी प्रभावती आतून बोलत बोलत बाहेर आली. तिच्या मागाहून महिपाते तिच्या लहानग्या झुझाराचा चिमुकला हात आपल्या हातीं धरून लडिवाळपणानें चालत होता.

कुशाबानें तें दृश्य पाहिलें मात्र, आणि त्याचें काळीज चर्रर्र झालें. शरिराच्या भाजलेल्या जागीं ऊन्ह पाण्याच्या थेंबानेंही फोड निघावा, तशी त्याच्या मनाची अवस्था झाली—त्याची अनुकपनीय ओढाताण सुरु झाली त्यानें बसल्या जाग्यावरून ताडकन् उठून प्रभावतीला म्हटलें, "बाईसाहेब! अगोदर आत जाऊन आरशात पाहून कुकु नीट करून या पाहू!"

कुशाबाचे बोल कळकळीचे खरे, पण त्यानादेखील परदुःख शीतळ ही कसोटी लावता येण्याजोगी होती. त्याला जर प्रभावतीचें कुकु चरलेलें पाहून इतकी हळहळ वाटली, तर स्वतः प्रभावतीला किती वाटली असेल? ती आतल्या आत खिजल्यासारखी होऊन त्याच पावलीं आत निघून गेली.

"आईसाहेब म्हणतात कीं आज आपण जायचें नाहीं." झुझार हिरमुसलें तोंड करून म्हणाला.

"काय विचार ठरला तुमचा आत?" तुळाजीनें महिपतीला विचारलें.

"माझें मत विचाराल तर सरकार! बायकाची बुद्धि अशा कामीं विचारात घ्यायची नसते कसले शकून आणि अपशकून? असल्या शकून अपशकुनाची गुलामगिरी पत्करून कर्तव्याला चुकणारीं माणसें दुसऱ्याचीं गुलाम होऊन राहतात बाईसाहेब म्हणतात कीं त्याना आज पहाटेच्या वेळीं एक भयकर स्वप्न पडलें" असें म्हणून महिपतीनें साशक मुद्रेनें कुशाबाकडे पाहिलें. त्याबरोबर कुशाबाच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन झोंबली. तो तिरिमिरीनें तेथून बाहेर निघून गेला.

"भलत्याच गोष्टींत बायकाची सल्ला घेऊन चालत नाहीं." तुळाजी म्हणाला,

"मी तरी तेंच म्हणतों." महिपतीनें त्याला दुजोरा दिला.

"कसलें तरी स्वप्न पाहिलें झालें त्याला ना शेंडा ना बुडखा! म्हणे, सरखेलाना यशवतगडावर कैद झालेले आपण स्वप्नात पाहिले, आणि सरखेलाची सारी दौलत शत्रूच्या हातीं जिंकली गेलेली दिसली. मला वाटतें, नेहमी घरात समोपणात येणाऱ्या गोष्टी भयपूर्वक मनात घोळविण्याची सवय बायकाना असते. त्या रिकामटेकड्या असतात, त्याना आणखी उद्योग तो कोणता?"

"तेंच खरें. आपण जर बायकाच्या बुद्धीने कारभार हाकावयाचा ठरविला, तर साऱ्या दौलतीचा उन्हाळा व्हावयाला उशीर नाहीं."

"बायकाची बुद्धि आपण जमेला धरू नका, पण त्याच्या मनींमानसी उभा राहून परमेश्वर जें बोलतो, तें जमेला धरल्याखेरीज आपला पहा यायचा नाहीं." प्रभावती तुळु नीट करून बाहेर येता तुळाजीचे उद्गार ऐकून म्हणाली, "आजवर आपलें काय बरें नुकसान माझ्या बुद्धीनें झालें आहे? आपल्या पुरुषाचा पराक्रम बायकाना रुचत नाहीं असे आपणाला वाटतें का? उलट आम्ही बायका परप्रकाशी—पतीच्या प्रकाशात चमकणाऱ्या असतों, आम्हाला स्वतन्त्र असें कांहींच अस्तित्व नसतें, म्हणूनच आम्हाला स्वतःसाठीं आणि पुरुषासाठीं अशी दुप्पट काळजी वाहावयाची असते. कारण आमचें भवितव्य पुरुषावर अवलंबून असतें."

"म्हणूनच बायका स्वार्थी व कुढ्या असतात. स्वतः त्या पराक्रमी व कर्तबगार नसतात, म्हणूनच साठवणीच्या धनाप्रमाणें पुरुषाचा पराक्रम व त्याचें वैभव बायकाना स्वार्थीपणानें कुजुष वृत्तीनें एकट्या स्वतःसाठीं राखून ठेवावेंसें वाटतें. तुला शकुन—अपशकुनाचा इतका बाऊ का वाटतो, हें मी ओळखीत नाहीं अशी का तुझी समजूत आहे प्रभा? तुला वाटतें कीं, मी एकवार इथून बाहेर गेलों कीं तुझ्या सवतीची मला दृष्ट लागेल. पण जिजाऊ आजच इकडे यायची आहे. अर्थात् जिच्यासाठीं मी जात नाहीं हें तर कळलें? तुला कदाचित् माहीत नसेल, सुजनसिंगाकडे मीं कालच यशवतगडावर स्वार पाठविला

आहे. इकडे येण्यापूर्वी तुझ्या सवतीची नीट कानउघाडणी करावयाला सांगितलें आहे. तिच्याकडे मी लक्ष्य देतों, म्हणून तुला वाईट वाटतें काय?"

"शिव शिव!" प्रभावती हातातील पूजासाहित्य खालीं ठेवून दोन्ही कानावर हात ठेऊन म्हणाली, "नाहीं हो नाहीं! असला स्वार्थी दुजाभाव माझ्या मनाला आजवर कधीं शिवलादेखील नाहीं. आपण हा माझ्यावर वृथा आरोप करीत आहा. ज्याना ह्या प्रभावतीच्या अंतःकरणाची खरी ओळख नाहीं, त्यानीं तिच्यावर असा आरोप केला असता तर तो वेळीं जगाची रीत म्हणून शोभला तरी असता. कारण सवतीमत्सराची दुष्कीर्ति रामावतारापासून दिगंतात तशी गाजते आहे खरी. पण आपण—"प्रभावतीच्यानें पुढें बोलवेनासें झालें. तिला दुःखाचा उमाळा आवरेना. डोळ्यावाटे झरझर वाहू लागलेल्या अश्रूंच्या गंगायमुनाना पदरानें निवारीत ती काहीं क्षण उसत खाऊन उसाशावर उसासे सोडीत म्हणाली, "आपण मला अशीं नावें ठेवावीं, यात काहीं अर्थ आहे का? मी ईश्वरसाक्ष सांगत्यें, प्रत्यक्ष थोरल्या बाईदेखील आल्या म्हणजे माझ्या ह्या सरळ बुद्धीचा निर्वाळा देतील. यापेक्षा आणखी कोणती साक्ष पाहिजे आपणाला माझ्या निर्मत्सर वृत्तीची? थोरल्या बाईंना इकडे आणवा, असा मींच आपणाला इतके दिवस आग्रह चालविला नव्हता का?"

"मी कुठें नाहीं म्हणतों? म्हणून तर तिला इकडे आणण्याचें ठरावेलें. नाहीं तर तिला उभ्या जन्मात माझे पाय दिसले नसते."

इतका वेळ स्तब्धपणें बाजूला उभा असलेला महिपति मध्येंच बोलता झाला, "बाईसाहेब! तुमचा हा भोळा भाव सर्वांच्या परिचयाचा आहे पण या ठिकाणीं—मीं स्पष्ट सांगतों म्हणून माझ्यावर रोष करू नका,—तो सर्वांच्या नाशाला मात्र कारण होईल. इतक्या सायासानीं आम्ही राजकारण शिजवून तयार केलें—"

"शिजवून तयार केलें खरें; पण त्या सिद्ध पाकात कोणीं तरी कुठें तरी विष कालविलें आहे, असें माझें मन मला स्पष्ट सांगतें आहे.

आजवर मला मिळालेल्या साक्षात्कारांचा अगदीं हातोहात पडताळा मला मिळाला आहे. असेंच तुमचें राजकारण पूर्वी सुवर्णदुर्गावर रगाला आलें नव्हतें का? असेच तुमचे साह्यकर्ते सेवक तेव्हांदेखील तुम्हाला आपुलकीची सल्ला देत नव्हते का? तेव्हां मला जो साक्षात्कार मिळाला, तो मलादेखील तेव्हां खरा मानण्याची छाती झाली नाहीं. तेथल्या गडकऱ्यापासून सारे सेवक आमचे जिवाभावाचे साह्यकर्ते, ते एकजात आमच्या जिवावर उलटतील हें मलादेखील तेव्हा खरें वाटलें नाहीं पण त्याचा परिणाम काय झाला? तो साक्षात्कार आम्हीं झिडकारला आणि साह्यकाऱ्यावर अवलंबून राहिलों, म्हणूनच रामाजीपंत आणि इंग्रज यांच्या फितुरीला भरपूर वाव तेथें मिळाला, आणि खरें युद्ध न करता फितुरीच्या जोरावर सुवर्णदुर्ग शत्रूला जिंकता आला ना? त्या अनुभवावरून आपणाला काहीं शहाणपण शिकायला नको का? मी म्हणत्यें, तुम्हाला तह करायचा तर तो अवश्य करा. पण त्यासाठीं शत्रूच्या घरात जाऊं नका. सिंहाशीं झुंज खेळण्याचें सामर्थ्य तुम्हा सर्वांच्या अंगीं आहे यात संशय नाहीं. पण कितीही धैर्याचा रणझुंझार झाला तरी त्यानें मुद्दाम आपण होऊन सिंहाच्या गुहेंत शिरू नये. पाहिजे तर असें करा.—महिपति! माणकर, गवळी, सुभेदार या सर्वांना जर खरोखरच तह करायचा असेल, तर त्याना इकडे यायला काय हरकत आहे? ते तरी मूळचे आंग्र्यांच्याच दौलतीचे सेवक ना? धन्याच्या दारीं हक्कानें यायला त्यांना संकोच का वाटावा? कशीही वेळ आली तरी यशवंतगडापेक्षां विजयदुर्ग लाखों पटींनीं सुरक्षित आहे. तहाच्या वाटाघाटी करायच्या तर मी म्हणत्यें—"

"पुरे करा बाईसाहेब! ही तुमची बाईलबुद्धि पुरे करा. माझ्या प्रेमळ व शांत स्वभावाचा तुम्ही वाजवीपक्षा जास्त फायदा घेत आहा. इतके दिवस मी तुमचें मन राखून वागत आलों, त्यावरून तुम्हाला असा नसता अहंकार उत्पन्न झाला आहे कीं सरखेल आपल्या ठायीं पुरे लपट आहेत, त्याना आपण दरवेशी जसा अस्वलाच्या नाकात

वेसण घालून त्याला आपल्या मागोमाग दारोदार हिंडवितो तसें हिंडवायला लावू. पण ती तुमची चूक—निव्वळ भ्रम आहे. बापालाही बाप न म्हणणारा हा तुळाजी आंग्रे विलासमंदिरातील नाजुक मैनेच्या मंजुळ बोलांना भाळून अष्टोप्रहर त्याच नादात कर्तव्य विसरण्याइतका नादान खास नाहीं. माझ्या दौलतींतील दरोबस्त लोकांचा देखील माझ्यावर हाच एक आरोप आहे. तो आरोप खोडून काढण्याला मी आजच्या सुमुहूर्तावर प्रारंभ करीत आहे. जा—तुम्ही अगोदर निघून जा कशा! जा लवकर तुमच्या देवदर्शनाला जा. पण आमच्या राजकारणात तूर्त तरी लुडबूड करू नका. ज्यानें त्यानें आपली पायरी ओळखून वागावें. ऊस गोड झाला म्हणून मुळापासून खाऊ लागलें कीं माती तोंडात जाते."

प्रभावतीला तुळाजीचे ते बोल वज्राघाताप्रमाणें दुःसह झाले. ती बिचारी कमळीच्या खट्टू वृत्तीनें आत गेली. तेवढ्यात यज्ञेश्वरशास्त्री पूर्ववत् सोंवळें नेसलेला रामेश्वराच्या देवालयांतील रोजचें अनुष्ठान—असा पळीपंचपात्री हातीं घेऊन आला व विचारपूस करू लागला, "आज बाईसाहेब देवदर्शनाला कशा नाहीं आल्या? पालखी बाहेर सजून उभी आहे मात्र. आज सोमवार, त्यांचें देवदर्शन चुकावयाचें नव्हे."

"आज बाईसाहेब अपशकुनाच्या फेऱ्यात सापडल्या आहेत. त्यांना त्या फेऱ्यांतून—शास्त्रीबुवा! तुम्हीतरी बाहेर काढा. त्यांनीं म्हणे आज कसलें तरी भयंकर स्वप्न पाहिलें."

"एवढेंच ना?" शास्त्रीबुवा हसत म्हणाले, "अहो! स्वप्नांत पाहिलेल्या गोष्टींचा अर्थ उलटा घ्यावयाचा असतो. स्वप्नात संकटात सांपडलेला मनुष्य प्रत्यक्ष सृष्टींत विजयी होतो, व स्वप्नात मृत्युमुखीं पडलेल्याला खरोखर दीर्घायुष्य लाभतें."

"खरें ना?" तुळाजी महिपतीकडे वळून म्हणाला, "महिपति! जा, आपल्या वहिणाबाईंना समजावून सांग. त्यांचा विश्वास माझ्यापेक्षां शास्त्रीबुवांवर फार आहे. ते काय म्हणतात तें तरी ऐका म्हणावें."

महिपतीनें यज्ञेश्वरशास्त्र्याकडे पाहिलें व त्यानीं त्याच्याकडे पाहिलें. दोघांचेही डोळे एकमेकांशीं काय बोलावयाचें तें बोलले.

"शास्त्रीबुवा! आजचा दिवस महत्त्वाच्या कार्यासाठीं प्रयाण करण्याला कसा आहे? शकुनाचा ताबेदार बनून कार्यनाश करून घेण्या इतका दुबळ्या मनाचा मी नाहीं, तरी पण विचारतों" तुळाजीनें यज्ञेश्वरशास्त्र्याला प्रश्न केला.

पुन्हा एकवार महिपतीनें यज्ञेश्वरशास्त्र्याकडे पाहिलें. त्यानेंही त्याच्या डोळ्याला डोळा भिडाविला. दोन घटकापूर्वी बराच वेळ महिपतीशीं बोलूनदेखील यज्ञेश्वरशास्त्र्याची जी संशयनिवृत्ति झाली नाहीं, ती आतां नुसत्या एका नेत्रकटाक्षानें झाली. लगेच तो तुळाजी-कडे पाहून म्हणाला, "सरकार! दैव निर्माण करणाऱ्या आपणा सारख्या पराक्रमी पुरुषाना शकुन आणि अपशकुन याची पर्वा काय? तथापि आम्हा दुबळ्या जीवांच्या दृष्टीनें मी आपणाला सांगतों, आजची ही वेळा म्हणजे इतकी मंगल व यशस्वी वेळा आहे कीं या वेळीं आपणासारख्या पुण्यवंतानें मुठींत माती धरली तर तिचें सोनें होईल कसलें काम आपण योजिलें आहे तें जरी मला माहीत नाहीं, तरी पण या सुवेळेचा महिमा इतका थोर आहे. मी नाहीतरी आज आपणाला सांगणारच होतों कीं राजकारणाचा गुंता सोडविण्या-चा एखादा नवीन उपक्रम करावयाचा असला तर त्याला प्रारंभ आज करा. आपली पत्रिका माझ्यापाशीं आहे. आपल्या कुंडलींत तर आजचा अमृतयोग असा आहे कीं आज सूर्योदयापूर्वी एखादी अत्यंत मंगल वार्ता आपल्या कानीं आलीच पाहिजे, व आजच्या सूर्योदयापासून अठ्ठेचाळीस प्रहरांच्या आंत आपल्या सर्व संकटांचा निरास झाला पाहिजे."

"होय ना? जा—आंत जा, आणि तुमच्या बाईसाहेब खुळ्या-सारख्या मुळुमुळु रडत बसल्या आहेत त्यांना ही शुभवार्ता सांगून त्यांची समजूत करा" तुळाजी महिपतीकडे वळून म्हणाला, "महिपते! आत्तांच्या आत्ता आपली निघावयाची तयारी कर."

"अगोदर हें तीर्थ घ्यावें." असें म्हणून यज्ञेश्वरशास्त्र्यानें पंच पात्रींतील तीर्थ तुळाजीला देऊं केलें. तुळाजीनें तें घेऊन भक्तिभावानें सेवन केलें.

"आम्ही आज एका अत्यंत महत्त्वाच्या कामासाठीं जात आहों. आमचें काम होताच त्याच पावलीं स्वार इकडे साखर वाटावयाला येईल. तोंवर बाईसाहेबांचा आणि झुझारचा कुशलसमाचार तुम्ही व कुशाबा ह्या दोघांनीं घ्यावयाचा आहे." असें म्हणून तुळाजीनें यज्ञेश्वरशास्त्र्याला नमस्कार केला, व त्यानें त्याला 'सर्वत्र विजयी भव' असा आशिर्वाद दिला.

## प्रकरण तेरावें

# भावी संकटाचा संधिप्रकाश

निवडक सशस्त्र घोडेस्वाराच्या पथकासह महिपतीबरोबर यशवंत-गडावर जाण्याची सर्व तयारी हां हां म्हणता महिपतीच्या चपळाई-मुळें झाली. आता तुळाजी घोड्यावर स्वार होऊन जाणार, तोंवर कुशाबा पुढें आला नव्हता. तो आड एका बाजूला उभा राहून सर्व प्रकार पहात होता. तुळाजी यज्ञेश्वरशास्त्र्याचा आशिर्वाद ऐकून थेट बाहेर पडलेला पहाताच पुढें होऊन तो त्याला म्हणाला, "सरकार! हें काय? निदान एवढें तरी—त्या लेकराचा आणि त्या माउलीचा निरोप न घेता आपण कुठें निघाला?"

तेव्हा कुठें तुळाजीच्या ध्यानीं ती चूक आली. तो तसाच मागें फिरला, व आत गेला. झुंझार अगोदरच चोरासारखा प्रभावती-पाशीं जाऊन उभा होता थोड्या वेळापूर्वीचा तुळाजीचा राग अजून पूर्णपणें ओसरला नसल्यानें त्याला प्रभावतीसमोर जाण्याला जरा सकोच वाटला. पण तो कलह असला तरी प्रेमळ प्रियकर व प्रियतमा याच्या मधाला कलह होता. उषःकालच्या कोंवळ्या सूर्य-किरणांनीं कधीं पृथ्वीवर आगी लागल्या आहेत? अथवा कधीं अग भाजलें आहे का?

एवढें मात्र खरें कीं तारतम्यज्ञान तुळाजीपेक्षा प्रभावतीला जास्त होतें. तुळाजीचें आत पाऊल पडताच एका क्षणात तिनें आपला सारा राग—सारें दुःख—सारा सताप एका आवढ्यासरसा गिळून टाकला, व हसतमुखानें झुंझाराला जवळ घेऊन ती समोर येऊन उभी राहिली

"प्रभा! गेला तुझा राग?" तुळाजीनें प्रसन्न वृत्तीनें पण अपराधी भावनेनें विचारलें. आपण निष्कारण आपल्या प्रियतमेचें मन दुखविलें,

ज्या उदार व प्रेमळ अंतःकरणाची सुवासिक गंधपुष्पांनीं पूजा करावयाची -यावर रागरोषाचे निखारे आपण फेकले, त्याबद्दल त्याचें मन त्याला आतां खाऊं लागलें होतें वास्तविक राग आला होता त्या दोघांत एकट्या त्यालाच. राग आणि त्याच्या बाबतींत असा प्रभावतीला माहीत-देखील नव्हता ती जो विरोध करीत होती तो सद्धेतूनेंच करीत होती, व तुळाजीनें दुराग्रह चालविला होता तोही सद्धेतूनेंच आपण मुद्दाम जावें आणि संकटांत पडावें असें त्याला तरी थोडेंच वाटत होतें! आणि समेटाच्या अंगीकृत कार्यांत तें प्रभावतीला थोडेंच नको होतें!

तशांत महिपतीनें आपल्या परीनें प्रभावतीची समजूत घातलीच होती. 'यावेळीं जर तह करण्याची संधी साधून घेतली नाहीं, तर लौकरच इंग्रज व पेशवे एक होण्याचा संभव आहे. त्यांची एकी झाल्या-वर आपली मग धडगत नाहीं' असें महिपतानें सांगितलेलें प्रारंभीं तिला भावनावशतेच्या भरात पटलें नाहीं. पण ती हाडाची हेकेखोर कांहीं नव्हती. त्यामुळें प्रारंभीं जरी तिनें तुळाजीला बाहेर जाण्याला विरोध केला, तरी मागाहून त्याबद्दल तिला हळुहळू खेद वाटूं लागला होता. तशांत यज्ञेश्वरशास्त्र्यांनीं ही वेळ शुभ आहे असें सांगितलेलें ऐकल्यापासून तर तिला एवढा धीर वाटूं लागला होता कीं, पूर्वींच्या संभाषणामुळें संकोच तिची वाट अडवून उभा होता म्हणून! नाहीं-पेक्षां—हेच यज्ञेश्वरशास्त्र्याचे उद्गार जर तिनें अगोदर ऐकले असते, तर बिछान्यांत झोंपीं गलेल्या तुळाजीला हलवून जागें करून तिनें सांगितलें असतें कीं, "अगोदर उठा आणि या पावलीं जाऊन पेशव्यांशीं सलोखा करा पाहूं!"

"तें तुझ्या रागाचें शेंडेनक्षत्र मावळलें तसा त्याच्या चालीनें उडा-लेला हा धुरळा—हा अबोला कधीं मावळणार?" तुळाजीनें प्रभा-वतीजवळ जाऊन—मात्र सभोंवार एकवार पाहून कोणी आपणाकडे पाहत नाहीं अशी खात्री करून घेतली व हळूच तिच्या हनुवटीला हात लावला, आणि प्रेमाच्या उमाळ्यानें विचारलें.

"मी रागावल्यें नाहीं. मला त्या अमंगळ स्वप्नाचें भय वाटलें

म्हणून बोलल्यें. आधींच परोपरींच्या प्रसगानीं माझें हृदय पोळलेलें आहे—पण आता माझें काहीं म्हणणें नाही. महिपतीनें मला सारी परिस्थिति नीट समजावून सागितली आहे, व आताच गुरुजींनींही भविष्य वर्तविलें आहे. माझी आपणाला एवढीच विनंति आहे कीं आपण मला आणि आपल्या झुझारलाही बरोबर घेऊन जावें.

"तुम्हाला बरोबर नेलें असतें. पण ह्या घाईत मी तुझी काळजी घेऊ कीं राजकारण खेळू? जातो क्षण तो लाखाच्या मोलाचा आहे एवढें तुला कळत नाहीं का?" असें म्हणून तुळाजीनें महिपतीकडे वळून त्याला सागितलें, "महिपति! तूच आता तुझ्या बहिणीची कशी ती समजूत घाल."

"बाईसाहेब! मी तुम्हाला वचन देतों कीं आमचें राजकारण सपल्यावर पहिली गोष्ट जर मी कोणती करीन तर ती आपणला व धाकट्या सरकाराना—एथल्या सर्वच परिवाराला आपल्या सर्व गडावर फिरवून आणायची या वेळी न्यावयालाही माझी काहीं हरकत नव्हती पण—समजा, होऊ नये तें झालें व शत्रु विश्वासघात करूच म्हणाला, तर आम्ही आमचा जीव सांभाळावा कीं कबिले साभाळावे? त्यापेक्षा बाईसाहेबानीं माझें ऐकावें, असला भलताच हेका धरू नये."

"बरें, मीं माझा हेका सोडला. माझें काहीं म्हणणें नाहीं. आपण खुशाल जा. पण माझी आपणाला अखेरची विनंति एवढीच कीं शक्य तितक्या लौकर काम आटोपून विजयी होऊन माघारे या."

"तीन दिवसांच्या आत सरकार विजयी होऊन माघारे येतील." यज्ञेश्वरशास्त्री मध्येच तोंड घालून म्हणाला, "सरकार! हा सारा बाईसाहेबाच्या अढळ तपश्चर्येचा महिमा आहे. त्याचा पुण्यप्रभाव मोठा आहे. आजवर त्यानीं श्री कुणकेश्वराची आणि एथल्या महादेवाची जी अनन्यसामान्य भक्ति चालविली आहे, त्या भक्तीचें हें फळ आपणाला मिळतें आहे. मीं त्यांना प्रारभींच सांगितलें होतें कीं एका महिन्याच्या आत देव तुम्हाला प्रसन्न होईल. त्याचें हें प्रत्यतर

पाहा. तरी अजून फार तर एक आठवडा अवकाश आहे. आज आकाशातील ढग वितळू लागले आहेत. ते आणखी एका आठ ड्यात पूर्णपणें वितळून आकाश अगदीं निरभ्र होईल. माझा ब्राह्मणाचा आशिर्वाद कदापि अन्यथा व्हावयाचा नाहीं."

आपल्या मातापितरातील गुता याप्रमाणें निघाल्यावर त्यांच्या आनदीआनदात झुझार भागीदार नसणें, म्हणजे देवाची षोडशोपचारें पूजा करताना गधपुष्प नसल्यासारखेंच होतें इतका वेळ भीतीनें दूर दूर राहणारा तो चिमखडा आता आईबापाच्या अगदीं जवळजवळ रेंगाळत उभा होता. तुळाजीनें त्याला उचलून त्याचे मटामट पापे घेतले, व बोबड्या बोलात त्याला सागितलें, "मी लौकरच येईन बरें बाळ!"

"तुम्ही येणार नाहीं. तुम्ही मुळींच येणार नाहीं. मला माहीत आहे." झुझार त्या प्रसगाचें पूर्वानुसधान ध्यानीं घेऊन निष्पाप बाळबुद्धीनें म्हणाला.

तुळाजीला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. पण प्रभावतीच्या हृदयात मात्र तो बाळबोल बाणासारखा घुसला. परतु तिनें त्या वेदना जणू कांहीं कांहींच झालें नाहीं इतक्या हसतमुखानें सहन केल्या, व तुळाजीला एवढेंच सागितलें, "जाताना देवघरातून देवदर्शन करून जावें, आणि महादेवाचेंही दर्शन जाता जाता घ्यावें"

प्रभावतीच्या सूचनेप्रमाणें तुळाजी झुझाररावासह देवघरात गेला. त्यानें मनोभावानें देवाना नमस्कार केला, व आपला कार्यभाग सिद्धीला जावा अशी मनोभावानें त्याची प्रार्थना केली. त्यानें आपणाबरोबरच झुझारलाही देवाना नमस्कार करावयाला लावलें यज्ञेश्वरशास्त्री सोवळ्यांतच होता. त्यानें देवावरचें फूल काढून प्रसादादाखल तुळाजीच्या हातीं दिलें.

याप्रमाणें प्रसन्न चित्तानें तुळाजी बाहेर जावयाला निघाला असता त्याला निदान गडाच्या पायथ्यापावेतों पोंचवायला जावें असें प्रभावतीच्या मनांत होतें. पण पुन्हां तिला दुःखातिशयाचा एवढा हुंदका

आला कीं, तो आवरता आवरताच तिला पुरेवाट झाली. खिन्न वृत्तीमुळें ती बाहेर जाण्याला धजली नाहीं.

तरीही तुळाजी घोड्यावर स्वार होऊन महिपति व इतर स्वार यासमवेत निघाला, तेव्हा प्रभावतीनें महिपतीला हाक मारून 'दोघेही साभाळून जा. वर्दळीवर येऊ नका' वगैरे सामोपचाराच्या गोष्टी त्याला सागितल्या. त्या महिपतीनेंही अगदीं शिरसामान्य केल्या.

त्या मडळीचे घोडे खाडीच्या किनाऱ्य वरील माडाच्या सावलीं तून दौडत जाऊ लागले, तेव्हा अगदीं सकाळची वेळ असताही वारा वाहात नव्हता, पक्षी किलबिल करीत नव्हते. जिकडे तिकडे अगदीं शात! अगदीं उदास! तुळाजीला जाताना काहींतरी शुभ शकून व्हावा म्हणून प्रभावतीनें तारेला हाक मारून हळूच सागितलें, "एक दोन तरी सुवासिनी पाणी भरून येताना स्वारीला भेटाव्या असें कर ना! म्हणजे स्वारीला तेवढाच उत्साह वाटेल."

तारा सुवासिनी हुडकावयाला गेली. पण तिला तेवढ्या मुदतींत कोणीच सुवासिनी भेटली नाहीं!

ते सर्वजण बरेच दूर गेले असें पाहताच प्रभावती झुझारला हाताशीं धरून एका दासीसह व एका हुजऱ्यासह पूजासाहित्य घेऊन रोजच्या-प्रमाणें पालखींतून गावाबाहेरील महादेवाच्या देवालयाकडे गेली. नित्य-क्रमाप्रमाणें आज शिवपूजा अजून तिच्या हातून घडली नव्हती. त्या-बद्दल चुटपुटत ती देवालयापाशीं जाऊन पोहोंचते, तोंच तुळाजी बरोबरच्या इतर स्वारासह देवदर्शन करून त्या झाडींतल्या रस्त्यानें वर चढून आला. तेवढ्यात प्रभावतीनें एक विशेष प्रकार पाहिला तो हा कीं, तुळाजी देवदर्शनासाठीं आत देवालयात गेला. असताना बाहेर तारा महिपतीशीं थोडा वेळा गुजगुज बोलत उभी होती. पण तें प्रभा-वतीनें मनावर घेतलें नाहीं. पण त्याबद्दल तारेला अथवा महिपतीला दोष देण्याला तिला तोंड कुठें होतें? तुळाजीची पहिली पत्नी हयात असताना त्यानें जसें आपणाला आपली प्रियतमा मानून जवळ केलें, तशी तारा महिपतीची प्रियतमा असली तर—काय बिघडलें आणि काय

नाहीं, हा प्रश्न निराळा. पण स्वतःच्या पायाखालीं काय जळतें हें तिनें पाहावें, कीं इतराकडे लक्ष्य द्यावें ? दुसरें, नोकरचाकराच्या असल्या गुप्त मैत्रींत व प्रेमसबधात खाशानीं लक्ष्य घालणें इष्ट नाहीं, हा थोराचा थोरपणा आता प्रभावतीच्या अगीं चागलाच बाणला होता.

प्रभावतीला पाहताच तारा चटकन् महिपतीला डोळ्यानें खूण करीत बाजूला सरकली, व महिपात कानात तुळशीपत्र घालून देव-दर्शन करण्यासाठीं गेला. तो देवदर्शन करून आल्यावर सर्वजण घोड्यावर स्वार होऊन निघाले. ते अगदीं दिसेनासे होईतों प्रभावती देवालयासभोंवारच्या झाडींत पालखी उतरवून तो देखावा पहात उभी होती. ती मंडळी अगदीं दिसेनाशी झाल्यावर ती दीर्घ उसासे सोडीत जड अतःकरणानें माघारी वळली.

"गेले ! बाबासाहेब गेले !" झुझार हात हलवीत प्रभावतीच्या निऱ्याना बिलगून म्हणाला.

"गेले !" प्रभावती उद्गारली.

"आता ते पुन्हा माघारे यायचे नाहींत का ग ?" झुंझारनें विचारलें. त्याच्या त्या प्रश्नाचा प्रभावतीच्या हृदयावर पुन्हा वज्रप्रहार झाला. "असें बोलू नये बाळ ! दोन दिवसात माघारे येतील बरें आपणाला न्यायला !" असें म्हणून तीनें त्याची समजूत केली.

तेवढ्यात तारा ओशाळून तेथें आली.

"कोणीच सुवासिनी घरात भेटल्या नाहींत बाईसाहेब !" तारा केविलवाणी चर्या करून म्हणाली.

"बरें. अग ! बाळाना घेऊन तू वाड्यात जा. मी देवपूजा करून येत्यें." असें म्हणून प्रभावतीनें झुझारला तारेच्या स्वाधीन केलें. तारेचें मन आधींच साशक झालें होतें. महिपतीशीं बोलताना आपणाला बाईसाहेबानीं पाहिलें आहे, त्या काय म्हणतील, या भयानें ती आतल्या-आत अगदीं चूर झाली होती. तिला धनीण जरी काहींच बोलली नाहीं, तरी ती आपणावर रागावली आहे असा तिला भास झाला, व पराकाष्ठेचा विषादही वाटला. त्यापेक्षा प्रभावती रागानें आपणाला

काहीं तरी बरें वाईट बोलली असती तर बरें झालें असतें तिला वाटलें.

महिपतीचें अंतःकरण कसें काय होतें, हें कोणालाच नीटसें माहीत नसलें तरी त्याच्याविषयीं संशय घेण्याला लवमात्र जागा नव्हती. बरें, तारा व महिपति यांचा प्रेमसंबंध प्रभावतीला मुळींच माहीत नाहीं अशातलीही गोष्ट नव्हती. त्यांत तारा म्हणजे काहीं चुकत होती असेंही नाहीं. भलत्याच माणसाशीं आपण सलगी ठेवली तर बाई साहेब आपणावर रागावतील, पण महिपतीशीं संबंध ठेवल्यामुळें कां म्हणून रागावतील? बिन् लग्नाची मैत्री म्हणून? मग प्रभावतीचें तरी तुळाजीशीं कुठें लग्न झालें होतें? ती तरी त्याची प्रियतमाच होती कीं नाहीं?—हें सारें खरें असलें तरी तारेला तेव्हां संकोचल्यासारखें झालें हें काहीं खोटें नाहीं. तरी बरें कीं महिपति प्रवासाची तयारी करण्यासाठीं पागेकडे गेला तेव्हां तारा महादेवाच्या देवालयांतून माघारां येत असतांना तिची त्याची गांठ पडली व त्या दोघांचें संभाषण झालें, तें प्रभावतीला माहीत नव्हतें. तें तिला माहीत झालें असतें तरी तें तिनें ऐकून न ऐकल्यासारखें केलें असतें हें खरें. पण तितकेंच हेंही खरें कीं त्या भेटीपासूनच तारेच्या वृत्तींत काहींसा चोरटेपणा उत्पन्न झाला होता. यज्ञेश्वरशास्त्र्याच्या राहत्या घरासमोर तिची आणि महिपतीची पहांटेला प्रथम भेट झाली तेव्हां त्या दोघांच्यामध्यें परस्पर गैरसमजाचीं साचलेलीं अभ्रें त्या दुसऱ्या भेटींत पार वितळून जाऊन दोघांचींही मनें अगदीं स्वच्छ झालीं होतीं.

पण मग तारेला महादेवाच्या देवालयासमोर प्रभावतीला पाहून चोरट्यासारखें कां व्हावें?—तोच तर प्रश्न होता!

प्रभावतीनें झुझाराला तारेच्या हवालीं करून गडावर जावयाला सांगितलें, व स्वतः देवदर्शनाला जाऊं लागली. आतां दोन घटका वर सूर्य आल्यामुळें तिला रोजच्याप्रमाणें सोबतीची आवश्यकता नव्हती. नाहींपेक्षां एरव्हीं रात्रीं पहांटेच्या वेळीं त्या देवालयांत जाणें एकट्या दुकट्या माणसाला अंमळ धाडसाचेंच होतें. गडापासून एक

मैलावर तें देवालय, आणि तेंही अगदीं किर्रर्र झाडींत. देवालय कसलें तें! एका चिरेबंदी चकुत्र्यावर एक शिवलिंग व त्यावर तात्पुरती बांधलेली चिरेबंदी घुमटी. रस्ताही चांगला पायाखालीं मळलेला होता असें नाहीं. तरीही अलीकडे प्रभावतीची त्या देवावर भक्ति जडल्यापासून रस्ता सरकारी खर्चानें काहींसा तयार झाला होता, व देवाच्या घुमटीसभोंवारची थोडीशी झाडी तोडून सभोंवार प्रदक्षणेपुरती जागा मोकळी करण्यात आली होती. प्रभावतीची शिवदैवतावर फार श्रद्धा. म्हणूनच ती कुणकेश्वर ह्या जागृत शिवस्थानीं जाऊन राही. पण अलीकडे राजकारणाची दगदग एकसारखी वाढू लागल्यामुळें प्रभावती जिथें असेल तिथें जाऊन राहणें अथवा वारवार तिच्या भेटीला जाणें तुळाजीला शक्य नव्हतें त्यामुळें प्रभावती कुणकेश्वरीं गेली कीं ओघानेंच तिची व तुळाजीची ताटातूट होई. ही तिची कुचंबणा थांबविण्यासाठीं विजयदुर्गातल्या विजयदुर्गातच यज्ञेश्वरशास्त्र्यानें जंगलांत त्या महादेवाची स्थापना केली होती. त्या पूर्वी ती जागा चोरालुटारूंना दडून बसण्याला अथवा वाघाला निर्धास्तपणें आपलें सावज फाडून खाण्याला सोईची. कधीं कधीं त्या झाडींत दिवसाढवळ्यादेखील खुनासारखे भयंकर गुन्हे घडत तीच जागा यज्ञेश्वरशास्त्र्यानें देवाच्या स्थापनेसाठीं कां पसंत केली, हा एरव्हीं न सुटण्याजोगा प्रश्न होता. देव आणि देवालयें यांना त्या गावातच काय पण गडावरही दुष्काळ नव्हता. पूर्वीचे जे देव होते, त्यापैकीं कितिएकांचे हाल कुत्रा खात नव्हता. तपश्चर्येला अथवा अनुष्ठानाला प्रशांत जागा पाहिजे, तर तसें देवालय गडावर होतें, व गावातही अनेक होतीं. बरें, जीर्णोद्धारच करावयाचा तर मोडकळीला आलेलें एखादें देऊळ यज्ञेश्वरशास्त्र्यानें शोधावयाचें. पण तसें काहीं न करता त्यानें गावाबाहेरच्या जंगलांत हा नवा महादेव निर्माण केला! याचें कारण तो सांगे तें असें कीं त्याला कुणकेश्वराचा त्या जंगलांत प्रगट झाल्याबद्दल साक्षात्कार झाला, व म्हणून त्यानें तेथें जाऊन तें शिवलिंग हुडकून काढून त्याची अर्चा करून त्याला नांवारूपाला आणलें.

प्रभावतीची कुणकेश्वरावर निःसीम श्रद्धा पूर्वींपासूनच होती. तिला ह्या साक्षात्काराची वार्ता कळल्यावर आनंद कसा वाटणार नाहीं? भाविकपणानें तेव्हापासून नेहमीं ती त्या महादेवाच्या दर्शनाला जाऊं लागली. ती जाऊं लागली म्हणून तुळाजी जाऊं लागला. आणि खाशा स्वाऱ्या जाऊं लागल्या म्हणून इतर लोक जाऊं लागले. हां हां म्हणतां तें देवस्थान राजाश्रयामुळें इतकें प्रख्याति पावलें कीं ज्याचें नांव तें. जंगलांत एक मोठें भुयार खणून त्या भुयारांत यज्ञेश्वरशास्त्र्यानें त्या महादेवाची स्थापना केली होती, व रोज बराच वेळ तो तेथें तपश्चर्येसाठीं म्हणून घालवी. निदान लोकांना तरी एवढेंच माहीत होतें. त्यापेक्षां त्यांत यज्ञेश्वरशास्त्र्याचा आणखी कांहीं गूढ हेतु असला, कांहीं कांहीं लोक देवदर्शनाच्या निमित्तानें तिकडे जात ते त्याच्याशीं कांहीं कारस्थानें करीत असले, तरी इतरांना तें कसें कळणार?

असो. आज प्रभावती देवदर्शनाला गेली तेव्हां यज्ञेश्वरशास्त्री तिथें होताच. खाशांना तिर्थप्रसाद देण्यासाठीं म्हणून तो थोड्या वेळापूर्वीं तिथें दुसऱ्यानें आला, तो प्रभावती देवदर्शनाला आल्याची वर्दी ऐकून मुद्दाम थांबला होता.

प्रभावती देवालयांत जातांच यज्ञेश्वरशास्त्र्यानें तिला संकल्प सांगितला व तिनें महादेवाची पूजा केली. नवेद्य वगैरे दाखवून झाल्यावर तिनें सुवर्णाची पंचारती शिवलिंगावरील फुलांना तिच्या ज्योतीची झळ लागूं लागली म्हणून जरा बाजूला ठेवण्यासाठीं उचलली. तोंच ती हातांतून सुटून खालीं पडली, व तिच्यांतली तुपाची वात विझली.

सकाळपासून अपशकुनावर अपशकुन! प्रभावतीला हा नवा अपशकून पाहून काय बरें वाटलें असेल?

## प्रकरण १४ वें

# यज्ञेश्वरशास्त्र्याचा कावा

दुसऱ्या दिवशींची गोष्ट. दिवस सपला, सूर्यास्त झाला. सर्वत्र काळोख पडू लागला. गडावरील व गडासभोंवारच्या बिनूरहदारीच्या वृक्षाच्छादित भागांतून निशाचर दिवाभीतांची हालचाल सुरू झाली. यज्ञेश्वरशास्त्री त्या काळोख्या वेळीं घराबाहेर पडला, तो वटवाघुळांची आगणासमोरच्या वटवृक्षावर फडफड चाललेली पाहून क्षणभर दचकला. त्याला वाटलें, आपण कोठें जातों व काय करतों यावर कोणी पाळत तर ठेवलेली नाहीं ना?

त्याचें आगणाबाहेर पाऊल पडतें न पडतें, तोंच समोरून कोणी-तरी एक मध्यमवयी मराठा शिपायी गडी नेमका त्याच्या घराच्या रोखानें आला त्याची यज्ञेश्वरशास्त्र्याला ओळख पटण्यापूर्वीच त्यानें आपण होऊनच जवळ येऊन हाक मारली, "भटजी!"

"कोण?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें चमकून विचारलें. त्याला ती हांक धड ओळखीचीही वाटेना व अनोळखीचीही वाटेना.

"मी आहें धोंडबा शिंदे." उत्तर मिळालें.

धोंडबा शिंद्याचें नांव ऐकतांच यज्ञेश्वरशास्त्र्याच्या चर्येवर कसे संशयाचे हिरवेपिवळे रग एकदम उमटले, तें इतर दुसऱ्या कोणाला त्या काळोखांत दिसणें शक्य नव्हतें.

"तुमच्यापाशीं कांहीं महत्त्वाच्या कामासाठीं मी आलों आहें." धोंडबा म्हणाला, "सरखेलाकडून मला तुमच्याशीं एका महत्त्वाच्या गोष्टीविषयीं चर्चा करण्याची आज्ञा झाली आहे. म्हणूनच माझ्या-बरोबरचे कैदी गडावर नीट बदोबस्तानें किल्लेदाराच्या स्वाधीन करून मी तुमच्याकडे आलों आहें."

"कैदी? कोणते कैदी?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें विस्मयचकित होऊन विचारलें.

"कैदी तुमच्या खारेपाटणच्या ठाण्यावरून पळून गेलेले दुल्लभजी माने आणि रुद्राजी धुळप हे दोघे आहेत. त्यांच्या जोडीला गौळ्याचा पोरगाही हातीं लागला आहे."

"आणि त्या कैद्याना तू पकडून आणलेंस?" यज्ञेश्वरशास्त्री अगदीं जवळ जाऊन धोंडजीकडे न्याहाळून पाहत म्हणाला, "धोंडजी शिंदा—कर्नाळ्याच्या किल्ल्यावरचा धोंडजी शिंदाच ना तू?"

"होय. तोच मी. तो मी आता सरखेलाच्या बाजूला कसा वळलों याविषयीं शका तुम्हाला उत्पन्न झाली असेल, नाहीं?"

"एकेक ऐकावें तें नवलच!"

"नवल कसलें यात? भटजी! तुम्ही नाहीं का सुभेदाराचा आश्रय सोडून सरखेलाच्या पदरीं आला? ज्या कारणासाठीं तुम्हीं सुभेदाराला सोडलें त्याच कारणासाठीं मींही सोडलें."

यज्ञेश्वरशास्त्र्याला वाटणाऱ्या सशयाच्या गुत्याची गुतागुत अधिकच वाढली. त्याला प्रश्न पडला, धोंडजी शिंदा खरोखरच फितूर होऊन सरखेलाकडे आला आहे, कीं आपणासारखीच भेदाच्या गुप्त कामगिरीवर सुभेदारानीं त्याची नेमणूक केली आहे?

पण धोंडजीला मात्र वाटत होतें कीं जसा मी तसा येज्ञश्वरभटजी. परिवर्तन त्या दोघातही घडल्याचें दिसत होतें. पण त्या देखाव्यामागचें खरें जग मात्र अगदीं निराळें होतें. आता वाचकाना माहीत झालेंच आहे, कीं यज्ञेश्वरशास्त्री हा सुभेदार रामाजीपंताचा हस्तक केवळ गुप्त बातमीदार या नात्यानें तुळाजीपाशीं येऊन राहिला होता.

रामाजीपताच्या पदरीं जे थोडे पहिल्या प्रतीचे पाताळयत्री लोक होते, त्यापैकीं यज्ञेश्वरशास्त्री हा एक होता. तितका धोंडजीवर विश्वास पेशवे, रामाजीपत अथवा त्याच्या पक्षाचे इतर थोर थोर लोक याचा मुळींच नव्हता. धोंडजी हा नुसता सडेसोट शिपाईगडी होता. डावपेंच कशाशीं खातात हें त्याला जरादेखील माहीत नाहीं. त्याची

खावी पोळी त्याची वाजवावी टाळी या न्यायानें तो सदैव वागे. चार वर्षांपूर्वी जजिऱ्याच्या सिद्दीच्या ताब्यातील करनाळा व माणिकगड हे दोन गड जिंकण्याच्या कामीं त्याची पेशव्यानीं नेमणूक केल्यावरून त्यानें तेव्हाची आपली कामगिरी अगदीं सोळा आणे बजावली होती. त्यानतर काहीं काळ तो स्वतःच कर्नाळ्याचा किल्लेदार होता. परतु दरम्यान् कोणींतरी सुभेदारापाशीं त्याच्याविषयीं भलभलत्या चुगल्या करून त्याच्याविषयीं सुभेदाराचें मन कलुषित केलें. त्यामुळें त्याला त्या किल्लेदारीला मुकावें लागलें, व निर्वाहासाठीं नवा रोजगार पाहणें प्राप्त झ लें. ही सुमारें सहा महिन्यापूर्वींची गोष्ट. कर्नाळ्याचा आसरा सुटताच धोंडजी सरळ तुळाजीच्या आश्रयाला आला, व तुळाजीनेंही त्याचें शौर्यधैर्य ओळखून त्याला आपल्या पदरीं आश्रय दिला. त्याला आश्रय देण्यात तुळाजीचा मुख्य हेतु असा कीं, धोंडजी जरी तेव्हा पेशव्याच्या पदरीं नोकर असला, तरी तो आंग्र्याच्या अन्नावर पिढ्यान्‌पिढ्या वाढून मोठा झाला होता. तुळाजी आंग्रे आणि मानाजी आंग्रे याच्यातील बेबनाव विकोपाला गेल्यावर जरी धोंडजी मानाजीच्या बाजूला झुकला होता, तरी तुळाजीनें त्याबद्दल त्याला कधीं दोष दिला नाहीं अथवा त्याचा कधीं द्वेष केला नाहीं. कारण त्याला माहीत होतें की धोंडजी हा इमानी सेवक आहे, तो ज्याचें अन्न खाईल त्या धन्याच्या जिवाला जीव द्यावयाला कमी करणार नाही. म्हणूनच धोंडजी मानाजीच्या पदरीं असताना आपल्या माणसामार्फत त्याला इतक्याचपुरतें वश करुन घेतलें कीं त्यानें मानाजीच्या हितसबधाना बाध न आणता दोघा भावाची एकी शक्य तर करून द्यावी. तुळाजीची ही सूचना धोंडजीच्या कानीं जाण्याच्या पूर्वीपासून धोंडजी, व मानाजीकडचे आणखी काहीं लोक याना वाटू लागलें होतें की आंग्र्यामधील भाऊबदकी जी सर्व दौलतीची वाताहात करीत आहे, ती एकदाची सपलेली चागली. त्यासाठीं त्या मडळीनें अगोदर मानाजीचें मत घेतलें, व खासगी रीतीने भाऊबदकी सोडून तुळाजीशीं एकी करण्याची मानाजीची तयारी आहे असें

कळताच त्याच मंडळीनें धोंडजी शिंद्याला पुढाकार देऊन दोघा आंग्रे बधूंची एकी घडवून आणण्याचा घाट घातला होता.

त्या निमित्तानें धोंडजी थोड्या दिवसापूर्वी अत्यंत गुप्तपणें विजयदुर्गावर तुळाजीला येऊन भेटला, व तुळाजीही प्रतिकूल परिस्थितीच्या कचाट्यात सापडलेला असल्यानें त्याला सलोख्याची योजना सोळा आणे पटली. आता प्रश्न एवढाच राहिला, कीं दोघा खाशाची भेट— जर मानाजी पेशव्याचा पक्ष सोडून तुळाजीला सामील झालाच तर— कुठें व्हावी? दोघाचीही इच्छा कीं आपण आपलें ठाणें सोडून दुसऱ्याच्या दारीं जाणार नाहीं तसें करण्यात दोघानाही नामुष्की वाटे. आणि हा प्रश्न तर कोणीं तरी एकानें थोडी तरी माघार घेतल्या खेरीज मिटण्यासारखा नव्हता. तो प्रश्न कसा तरी युक्तीनें मिटविण्याची काहीं तरी योजना मानाजी आंग्र्याच्या संमतीनें ठरवून धोंडजी आज माघारा आला होता.

परंतु यज्ञेश्वरशास्त्री रामाजीपंताचा आश्रय सोडून तुळाजीच्या पदरीं कां आला याचें खरें कारण मुळात जिथें तुळाजीलाही माहीत नव्हतें, तिथें धोंडजीला कोठून माहीत असेल? त्याला वाटलें कीं आपण जसे सुभेदाराच्या घालमेल्या स्वभावाला कंटाळून आंग्र्याच्या पदरीं आलों, तसाच यज्ञेश्वरशास्त्रीही आला असावा.

आणि 'ज्या कारणासाठीं तुम्ही सुभेदाराला सोडलें, त्याच कारणासाठीं मीं सोडलें' या धोंडजीच्या आतांच्या उद्गारावरून यज्ञेश्वर शास्त्र्याला प्रश्न पडला कीं, आपल्यासारखीच ह्या आणखी एका नव्या गुप्तहेराची सुभेदारानीं विजयदुर्गाच्या ठाण्यावर नेमणूक केली आहे कीं काय? कीं हा तुळाजीला फितूर झाला आहे?

धरलें तर चावतें आणि सोडलें तर पळतें, तशी यज्ञेश्वरशास्त्र्याची द्विधा वृत्ति झाली. तो घरातून काळोखाची वेळ पाहून बाहेर पडला होता, तो आनंदराव सुर्वे वगैरे मंडळीशीं पुढील योजनेची वाटाघाट करण्यासाठीं. तों मध्येंच हें शेंडेनक्षत्र उगवलें या भानगडीचा पुरा उलगडा केल्याखेरीज पुढील बेत रचणें यज्ञेश्वरशास्त्र्या-

ला सुरक्षितपणाचें वाटेना. त्यानें लगेच आपल्या एका नोकराला हाक मारून त्याला जरा बाजूला घेऊन त्याच्या कानात हळूच काय-साशा निरोप सांगितला. त्या निरोपाचे प्रारंभींचे उद्गार धोंडजीला ऐकावयाला मिळाले नाहींत. पण पुढचे शब्द मात्र ओझरते त्याच्या कानीं पडले. "त्याना म्हणावें, धोंडजी शिंदा आला आहे. त्याच्याशीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टींत चर्चा करावयाची आहे. जमलें तर त्यालादेखील घेऊन मी गडावर येतों, मामासाहेबाना म्हणावें." आपल्या कानमत्राचा धोंडजीला संशय येऊ नये यास्तव तो तसाच नोकराला गडावर पाठवून मग धोंडजीकडे वळून म्हणाला, "सरखेल सरकार कालच बाहेर गेले आहेत. ते कुठें गेले तें आम्हाला सागून गेले नाहींत. त्याच्या मागें आपणालाच सर्व सधानें साभाळावयाचीं आहेत. इथली परिस्थिति अशी आहे कीं इथें प्रत्येक घराच्या भिंतीला झाडा-झुडपाना आणि दगडधोंड्यानाही कान आहेत. यासाठीं आम्हाला—सरखेलानादेखील अशी कांहीं महत्त्वाची वाटाघाट करावयाची झाली, कीं आम्ही थेट महादेवाच्या देवालयाकडे जातों. चल, आपण तिकडेच जाऊ."

ते दोघेही जास्त आढेवेढे न घेता महादेवाच्या देवालयाकडे वळले. मनुष्यवस्तींतून दूर निघून जाईतों ते दोघेही महत्त्वाचें असें कांहींच एकमेकाशीं बोलले नाहींत. अखेर खडा टाकून तर पाहावा, म्हणून यज्ञेश्वरशास्त्र्यानें धोंडजीला मोघम प्रश्न विचारला, "ज्या कामगिरी-वर गेला होतास, ती कामगिरी कशी काय पार पडली?"

खरें पाहतां तुळाजीनें धोंडजीला आपण कोणती कामगिरी सांगि-तली आहे, वगैरे अवाक्षरही यज्ञेश्वरशास्त्र्यापाशींच काय पण कोणा-पाशींदेखील काढलें नव्हतें. याचा अर्थ तुळाजी त्या बाबतींत आपल्या सभोंवारच्या मडळीवर विश्वास टाकण्याला तयार नव्हता असा नव्हे. पण मानाजीशीं एकी करण्याच्या कामीं आपणाला कितपत यश येईल याविषयीं तो अजून अतिशय साशक होता. त्यामुळें यज्ञेश्वर-शास्त्र्यापाशींच काय पण प्रभावती त्याची इतकी जिवाची जिवलग ना;

तरी तिच्यापाशींही तुळाजीनें त्या रहस्याचा परिस्फोट केला नव्हता.

तरी पण धोंडजी मात्र आपल्या मनाशीं अटकळ बांधून बसला होता कीं, यज्ञेश्वरशास्त्र्याला सर्व कांहीं माहीत असलेंच पाहिजे. त्याच धोरणानें यज्ञेश्वरशास्त्र्यानें कामाची माहिती आपणाला विचारली असें समजून धोंडबा उत्तरला, "काम झालें तर! न व्हायला काय झालें! ह्या धोंडजीनें एखादी गोष्ट हातीं घेतली आणि ती यशस्वी झाली नाहीं असें कधीं तरी झालें आहे?"

"मग पुढची योजना कशी काय ठरली?"

"पुढची योजना मीं माझ्या मतें काय ती ठरविली आहे. पण ती सरखेलाना पसंत पडेलच अशी खात्री वाटत नाहीं. वास्तविक अशा वेळीं मुंगी होऊन साखर खावयाला हवी."

"खरें—अगदीं खरें. सध्याचें संकट निवारण होण्यापुरतें तरी सरखेलानीं आम्हा विश्वासांतील सेवकाच्या तंत्रानें वागण्याचें ठरविलें आहे. आज जातांनाच त्यानीं मला सांगून ठेवलें आहे कीं धोंडजी शिंदा आला तर त्याच्याकडून सर्व वाटाघाटींचें स्वरूप नीट समजून घेऊन पुढील राजकारणाची निश्चित दिशा काय ती तुम्ही तुमच्या विचारानें ठरवा, आणि आपणाला कळवा."

एवढें त्या दोघाचें संभाषण होईतों ते महादेवाच्या देवालयापावेतों येऊन पोहोंचले. यज्ञेश्वरशास्त्र्यानें एका झाडाला टांगून ठेवलेला पलिता हुडकून काढला, व तेलाचा गडवा भरून देवालयाच्या घुमटींत ठेवलेला होता त्यातील तेल त्या पलित्यावर ओतून देवासमोरच्या नंदादीपावर तो पलिता पेटवून प्रकाश केला. त्या प्रकाशांत तेथल्या एका मोठ्या शिलाखंडावर बसल्या बसल्या धोंडबा म्हणाला, "इतका समजूतदार-पणा जर सरखेलांच्या ठायीं आला असेल, तर मग सुभेदार अथवा पेशवेच काय, त्यांचे महापेशवे आमच्यावर चालून आले तरी त्यांना टक्कर देऊन नामोहरम करण्याइकी आमची बाजू आम्ही बळकट करूं शकूं." आपली चोरटी वृत्ति बाहेर उमगू न देतां यज्ञेश्वरशास्त्री जणूं काय धोंडबाच्या तोंडचे बोल ऐकून हर्षून म्हणाला, "तू ही शुभ-

वार्ता आणलीस, ती नुसती मोघम ऐकूनच मला किती धीर वाटू लागला आहे म्हणून सांगू? आता मीं काय केलें पाहिजे तेवढें सांग."

"तुम्ही आता एवढेंच करा,—मानाजीराव वजारतमाब सरखेलाशीं गोडी करायला तयार आहेत पण आनंदराव धुळपानें गेल्या वर्षी मानाजीरावाच्या मुलुखावर हल्ला केला आणि तेव्हा मानाजीरावानीं सरखेलाची मदत मागितली असतांना त्यानीं ती देण्याचें नाकारून वर आणखी मानाजीरावाच्या वकिलाची अप्रतिष्ठाही केली होती.— स्वतः सरखेलच सांगतात म्हणून मला तरी माहीत! इतका प्रकार एकदा झाल्यावर पुन्हा मानाजीरावानी सरखेलावर भरवसा ठेवणें जरा कठीणच काम आहे."

"परंतु तें कठीण कामही मी सोपें केलें आहे. मीं मानाजीरावांना भेटून एकीला त्याची पूर्ण मान्यता मिळविली आहे."

"पण एकी कोणाशी?"

"कोणाशीं म्हणजे? आंग्रेबंधूंची एकमेकाशीं."

"पण मानाजीराव तर श्रीमंत पेशव्याचे अंकित आहेत."

"पण असल्या राजकीय नात्याच्या बंधनापेक्षा प्रेमाचें बंधन—रक्ताचें बंधनच मानाजीराव अधिक मानतात, असें मी माझ्या अनुभवावरून सांगू शकतों मीं अगदी प्रथम त्याच्याशीं एकोप्याची गोष्ट काढली, तेव्हां त्यांनीं ती कबूल केली, इतकेंच नव्हे तर तेव्हा त्याच्या नेत्रावाटे अखंड अश्रुप्रवाह चाललेला पाहून—खरोखर भटजी! पाषाणासारखे पाषाणही द्रवले असते."

"तें कांहीं असलें तरी मानाजीराव हे पेशव्यांचे पक्षपाती आहेत. पेशव्यांनीं त्यांना दौलत मिळवून दिली आहे, त्यांचा कैवार पेशव्यांनीं घेतला म्हणून त्याचा टिकाव आजवर लागला. नाहींपेक्षा अगोदर संभाजीबाबाच्या कारकीर्दीत व नंतर आजकालच्या सरखेलांच्या कारकीर्दीत तर त्यांचा केव्हाच चेंदामेंदा होऊन गेला असता.—असें मानाजीराव समजतात हो!"

"ह्या तुम्ही रामावतारातल्या गोष्टी सांगत आहां भटजी! पण

जग वर दिसतें तसें नसतें. मानाजीराव तसें बोलत आले असतील, व मी म्हणतों, पुन्हाही वेळीं अवेळीं तसें बोलावयाला कमी करणार नाहींत. मानाजीरावांना आपण स्वतंत्र व्हावें असें वाटत नसेल का? पेशव्याचा अंकितपणा त्याना आवडत असेल का? पण करतात काय? घरातली कटकट पचनीं पाडण्यासाठीं त्याना पेशव्याच्या आहारीं जाणें भाग होतें."

"पण अशानें लोकांचा समज किती विपरीत झाला आहे! लोक समजतात कीं वजारतमाब मानाजीराव हे पेशव्याचे हस्तक आहेत."

"लोकाचें कशाला सांगता? खुद्द सरखेलाचाही कालपावेतों तसाच समज होता व अजूनही थोडाफार आहे मग इतराची काय कथा?"

"हा समज चुकीचा आहे असें तू तरी कशावरून म्हणतोस?"

"मी प्रत्यक्ष स्वानुभवावरून तसें म्हणतों. एरव्हीं मी त्यांची सरखेलाशीं दिलजमाई करून देण्याच्या फंदात कधींच पडलों नसतों."

"एकूण तू आपण होऊन ही जबाबदारी पत्करली आहेस. पण याद राखून ठेव बरें! त्या मानाजीरावाशीं गाठ आहे. नाहींतर तो तुझें सारें हृद्गत काढून घेईल, आणि गुप्तपणें पेशव्याना किंवा सुभेदाराला वळवील. मग कोणता प्रसंग तुझ्यावर ओढवेल याचा पूर्ण विचार करून वाग तू. नाहींपेक्षा तू स्वतः तर तोंडघशीं पडशीलच, पण तुझ्याबरोबरच सरखेलानाही तोंडघशीं पाडशील."

"तेवढी मीं पूर्ण खबरदारी घेतली आहे. म्हणूनच तर मानाजी-रावाचा आग्रह कुलाब्यांतच उभय बंधूचें एकीचें बोलणें व्हावें असा असतांना मींच त्यांना फारशी भर दिली नाहीं."

"तसें तूं मनांत आणलें असतेंस तरी सरखेल त्याला कांहीं केल्या तयार झाले नसते."

"तेंही खरेंच. अगदीं बरोबर ओळखतां तुम्ही सरखेलाना भटजी! मीं प्रारंभींच तसा शब्द टाकून पाहिला. पण तुम्ही म्हणतां त्याप्रमाणेंच अनुभव मलाही आला."

"मग आतां तडजोडीची योजना कशी काय ठरली आहे?"

"रत्नागिरीच्या गडावर दोघांनींही जमावें व तेथें तडजोडीची बोलणीं व्हावीं असें तूर्त मीं ठरविलें आहे. हें जर सरखेलाना मान्य झालें, तर मी ताबडतोब मानाजीरावाना तसें कळवीन."

"तें ठीक आहे. पण समज, याप्रमाणें दोघा भावाची दिल-जमाई झाला, आणि आंग्र्याची दौलत पूर्ववत् एक झाली, तरी आता त्याचा उपयोग काय?"

"का? उपयोग का नाहीं? आजदेखील पेशवे सरखेलाशीं तह करावयाला तयार आहेतच. तोच तह पेशव्याना जर दोघाही आंग्र्यांशीं एकदम करावा लागला, तर त्याना आंग्र्याच्या दौलतींत सध्यासारखा ऐसपैस हातपाय पसरण्याचा मोह आवरता घ्यावा लागेल. त्याना बरोबरीच्या नात्यानें आंग्र्याशीं तह करावा लागेल."

"पण पेशव्याच्या वतीनें सुभेदाराकडून घालण्यात येणाऱ्या अटी इतक्या सोप्या नसल्याच तर?"

"सोप्या नसल्या तरी त्या सुभेदाराला सोप्या कराव्या लागतील. नाहीं पेक्षा ऊस गोड झाला म्हणून तो मुळापासून खाऊं पाहणाऱ्या अधाशाच्या तोंडात माती जाते तसें होईल. इतकेंही करून तसाच प्रसग आला, तर मी म्हणतों कीं आंग्र्यानीं आपल्या कामापुरतें खुशाल कोणाही परक्याना हाताशीं धरावें. जे प्रसगीं आपल्या बाजूनें धावून येतील ते सारे आपलेच."

"एकूण तू मोठीच कामगिरी सिद्ध करून आला आहेस म्हणावयाचें."

"पण ती तुम्हां सर्वांच्या प्रयत्नानीं यशस्वी झाली तर उपयोग!"

"यशस्वी होईल. अवश्य यशस्वी होईल. मात्र याला दिवसगत लावतां कामा नये."

"तेंच मी तरी म्हणतों. पण सरखेल लौकर भेटतील तर!"

"आजचा दिवस तू इथेंच गडावर थाब बहुधा आज सरखेल येतील.—खरें, दुल्लभजी माने, रुद्राजी धुळप आणि गवळी हे तुझ्या हातीं कसे लागले तें तू सागितलें नाहींस!"

"योगायोग म्हणूनच केवळ ते हातीं लागले. त्यांच्या तारवाचा मला संशय आला, म्हणून मीं रत्नागिरी बंदरात तें तारू पकडलें. पाहतों तों आत हे तिघे! त्यानीं मला परोपरीनें सांगून पाहिलें कीं आपण सरखेलाच्या बाजूचे. पण मी त्यावर—तशात श्रीपति गवळी त्याच्याबरोबर असल्यावर त्यावर विश्वास कसा ठेवीन? तात्याबा विचाऱ्याला त्यानीं पकडून त्याचें जहाज बुडवून त्याला ठार मारल्यावर-देखील त्याना सरखेलाच्या बाजूचे असें समजण्याइतका मी मूर्ख नाहीं. सरखेलाना पाहिजे तर त्याची चौकशी करून त्यांना खुशाल सोडून्द्या. परंतु मी माझ्या कर्तव्यात चुकलों नाहीं. बाकी, मी सरखेलाना स्पष्ट सांगणार कीं निदान श्रीपति गवळ्याला तरी तह आपल्या मनासारखा होईतों मुळींच सोडू नका.—बरें आहे तर. मी आतां तांबडतोब सरखेलाकडे जाऊं कीं नको?"

"जायला तर हवेंच. पण रातोरात न गेलास तरी चालेल."

"विनाकारण वेळ दवडता उपयोगाचा नाहीं. मला तांबडतोब गेलें हें पाहिजेच. रात्रीं नाहीं तरी सकाळीं हा मी जाणारच. सकाळीं पुन्हा एकदा—पण नाहीं. मी परस्परच जाईन. भरतीच्या ताणावर जहाज हांकारायला सांगेन."

"हो. तेंही एका अर्थीं खरें आहे. चल तर मग. पण जाताना गडावरच्या मंडळीपैकीं कोणाची सल्ला घ्यावयाला नको काय?"

"मला नाहीं वाटत या कामीं कोणाच्या सल्याची गरज आहेशी. पण तुम्ही म्हणता तर चला जाऊन विचारू त्याना."

धोंडजीनें जर गडावर जाण्याच्या बाबतींत आढेवेढे घेतले असते, तर त्याला आणखी कांहीं काळ—कबुतरावर बहिरीससाणा सोडतात त्याप्रमाणें त्याच्या पाठीवर कोणातरी विश्वासांतल्या माणसाला सोडण्याची तयारी करण्यापुरती फुरसत पाहिजे होती. काय पाहिजे तें झालें तरी आज धोंडजीला मोकळा सोडणें इष्ट नाहीं, अशी यज्ञेश्वर-शास्त्र्याची पूर्ण खात्री होऊन चुकली होती. प्रश्न होता तो त्याला कसें कोंडावें हाच. त्यासाठीं त्याला गडापावेतों चालवीत नेण्याचा

डाव यज्ञेश्वरशास्त्र्यानें टाकला होता. तो डाव अनायासें सिद्धीला गेला. धोंडजी आपण हाऊन गडावर जावयाला राजी झाला!

लगेच ते दोघेही गडावर जाण्यासाठीं म्हणून देवालयातून बाहेर पडले जाताना वाटेंतही त्याच्या पूर्वीप्रमाणेंच गोष्टी चालल्या होत्या. पण यज्ञेश्वरशास्त्र्याला त्या पुनरुक्तींत काहीं स्वारस्य वाटत नव्हतें त्याच्या मनात एकच विचार प्रामुख्यानें घोळत होता, "या कानचें त्या कानाला न कळता ह्या बेभरंवशाच्या माणसाचा काटा आपल्या वाटेंतून कसा बेमालूम दूर करावा?"

ती कल्पना यज्ञेश्वरशास्त्र्याच्या मनांत घोळत असतानाच ते दोघे बोलत बोलत गडापासून अर्ध्या मैलाच्या अतरावर आले. तों समोरून येणाऱ्या तिघां लोकांपैकीं एकाकडे पाहून धोंडजी एकदम खवळून म्हणाला, "कोण, आनदराव सुर्वे काय हा?—अरे हरामखोरा! आता इकडे संधान बांधलेंस काय?"

## प्रकरण पंधरावे

# आंग्रे बंधूंच्या सख्याची वाटाघाट

धोंडजी वास्तविक ते शब्द स्वतःशीं उद्गारला. पण ते यज्ञेश्वर शास्त्र्याला ऐकू गेले. तो बुचकळ्यात पडल्यासारखा झाला, "आनदरावाला पाहून इतकी याच्या तळपायाची आग मस्तकाला का जाऊन झोंबावी?"

तोंच पुढें मशालजी व मागें आनदराव आणि सुजनसिंग असे तिघेजण तेथें येऊन पोहोंचले. आनदरावानें मशालीच्या प्रकाशात धोंडजीची चर्या निरखून पाहत प्रश्न केला, "कोण?"

"मी आहें धोंडजी शिदा. ओळखतोस तू मला?" धोंडजीनें विचारलें.

"धोंडजी शिदा!" आनदरावानें एक सुस्कारा सोडला व म्हटलें, "एकूण मला फितुरीबद्दल नावें ठेवता ठेवता तूदेखील माझ्याच पावलावर पाऊल ठेवून आलास म्हणावयाचा!"

"मी आलों खरा, पण तुझ्यासारखा फितूर होऊन नाहीं आलों." धोंडजी सुजनसिंगाकडे वळून म्हणाला, "धनी! ह्या फितुराची खरी ओळख तुम्हाला नसेल तर करून देतों. चार वर्षोपूर्वी कर्नाळ्यावर पेशव्याच्या वतीनें फितूर करून तेथल्या पाण्याच्या टाक्यातून विष कालवायला लावणारा हा आनदराव सुर्वे आज त्याच पेशव्याच्या विरुद्ध सरखेलाना सामील आहे यावरून याच्या पोटात कोणता काषा असेल तें ओळखा. कनक आणि कान्ता याच्यासाठीं सृष्टीवर हा कोणताही अघोर अनर्थ करावयाला कमी करणार नाहीं. हा आणि याचा जोडीदार तो सुभानराव सोडकर—मीं ऐकलें आहे कीं सुभानरावाचा पिंड आंग्र्याच्या अन्नावर पोसलेला असताना आज त्या

मात्रागमन्यानें श्रीमत पेशव्यांची बाजू पत्करली आहे. मला ह्या दोघाचाही स्वभाव चांगला माहीत आहे. शेण पडलें तें माती घेतल्या-खेरीज उठावयाचें नाहीं, त्याप्रमाणें हीं दोन माणसें कोणत्याही कामात पडलीं तरी त्याची कशी ना कशी वाताहात केल्याखेरीज तेथून निघा-वयाचीं नाहींत.'' अकस्मात् हा कठोर शब्दाचा भडिमार आपणावर झालेला पाहून आनदरावाच्या ऐवजीं दुसरा कोणी रेमाडोका माणूस असता तर त्याच्याही सर्वांगाचा तिळपापड झाला असता. मग आनद-रावाला सताप आला–समर्थांघरचा श्वान वेळीं अवेळीं गुरगुरला तर त्यात नवल तें काय? पण धोंडजी आनदरावाच्या डोळेवटारणीला मुळींच बधला नाहीं. तो आपल्या कमरेच्या तरवारीची मूठ हातीं धरून पवित्र्यांत सावधपणें–तसाच प्रसग आला तर दोन हात कर-ण्याच्या तयारीनें उभा राहून पुढें म्हणाला, ''माझ्यावर दांतओंठ खाऊन माझें काय वांकडें होणार आहे? तरवार तुझ्या कमरेला आहे, आणि मी माझी तरवार घरीं विसरून आलों आहें असें समजूं नकोस. वास्तविक याच क्षणीं–तुझ्यासारखा बदफैली पाताळयंत्री हरामखोर जिथें सापडेल तिथें त्याचें शीर धडावेगळें करावयाला हवें. पण ज्या धन्याचा सेवक म्हणून तू आज मानभावीपणानें मिरवत आहेस, त्याच धन्याची सेवा करण्याचें परमेश्वरानें माझ्या वाट्याला आणल्यामुळें तुझें पारिपत्य करण्याच्या बाबतींत माझे हात बाधल्या-सारखे झाले आहेत म्हणून. नाहींपेक्षां—''

''बोलतां बोलता धोंडजीनें आनदरावाचा हात त्याच्या कमरेच्या तरवारीकडे वळलेला पाहून आपली तरवार म्यानातून सरकन् बाहेर काढली व म्हटलें, ''एखाद्याला त्याच्या दुष्कर्माचा जाब विचारणें हा जर तुझ्या मतें अपराध ठरत असेल, तर मी तुझ्याप्रमाणेंच तरवारी-च्या साक्षीनें त्या अपराधाची शहानिशा करून घ्यावयाला तयार आहें. द्वद्वयुद्धाला तुझी तयारी असेल तर माझीदेखील तयारी आहे.''

सुजनसिंग त्या प्रसगाला अगदींच अपरिचित असल्यानें त्याला अगदींच बुचकळ्यांत पडल्यासारखें झालें. थोड्या वेळापूर्वी त्यानें

बाबाजी धुळापाच्या तोंडून धोंडजी शिंदा आल्याचें व त्यानें तीन कैदी पकडून आणले असून त्या तिघात जावजी गवळ्याचा पुत्रही असल्याचें ऐलेंक होतें. हें कृत्य धोंडजीनें काहीं चागलें केलें नाहीं, असा आनंदराव व बाबाजी याचा अभिप्राय पडलेलाही त्यानें ऐकला होता. इतकेंच काय पण निदान श्रीपतीला तरी तावडतोब सोडलें पाहिजे, नाहींपेक्षा आपल्या तडजोडीच्या भाषेंत खो पडल्यासारखें होईल, असें आनदरावाचें स्पष्ट मत पडलें होतें. तो तावडतोब श्रीपतीची सुटका करावयाला निघालादेखील होता. पण सुजनसिंगाचें पान यज्ञेश्वर-शास्त्र्याच्या संमतीखेरीज हलेना, आणि बाबाजीही सरखेलाच्या प्रत्यक्ष आज्ञेखेरीज कोणतीच ढवळाढवळ कारभारात करण्याला तयार होईना. तेथें आनदरावाचा निरुपाय झाला होता. तेव्हाही आनदरावानें श्रीपतीला सोडविण्यासाठीं इतकें अधीर का व्हावें ही शका सुजन-सिंगाच्या मनात उत्पन्न झाली होतीच. पण त्या बाबतींत जास्त चवकशी करण्याचें त्यानें मुद्दामच टाळलें. कारण, त्याची स्वतःचीच स्थिति त्या किल्ल्यावर बिनबुडाच्या भाड्यासारखी होती. त्याला आपल्या बहिणीचें हितही साधावयाचें होतें, आणि तुळाजीचें काहींही झालें तरी विजयदुर्गाची किल्लेदारी आपणाकडे राखून ठेवावयाची होती. चिखलातली मेढ ज्याप्रमाणें जिकडे चिखल अधिक पातळ तिकडे कलंडते, त्याप्रमाणें सुजनसिंग अलीकडे तुळाजीची पडती बाजू पाहून आनंदराव व यज्ञेश्वरशास्त्री वगैरे मडळीच्या—अर्थात् सुभेदाराच्या तंत्रानें वागू लागला होता. अर्थात् आजला तरी तुळाजीच्या पदरीं अस्तनींतल्या निखाऱ्याचा मान सुजनसिंगाला होता. रामाजीपतानें विजयदुर्ग पाडाव करण्यासाठीं यज्ञेश्वरशास्त्री, आनदराव सुर्वे वगैरे मडळीच्या साह्यानें विजयदुर्गावर जें अभेद्य कारस्थान रचिलें होतें, त्या कारस्थानाचे सुजनसिंग व जिजाबाई हे दोन प्रमुख घटक होते. जिजाबाईचा रोख तुळाजीच्या विरुद्ध नसला तरी सवतीच्या—प्रभा-वतीच्या विरुद्ध होता. एकूण एकच.

परंतु धोंडजी शिंदा व आनदराव यांच्यात इतकें वितुष्ट असण्या-

चें कारण काय हें सुजनसिंगाला मुळींच माहीत नसल्यानें कैवार कोणाचा घ्यावा व दूर कोणाला लोटावें हेंच त्याला कळेना. म्हणून ते दोघे वर्दळीवर आलेले पाहूनही तो यज्ञेश्वरशास्त्र्याच्या तोंडाकडे पाहात उभा राहिला.

यज्ञेश्वरशास्त्री मात्र लगेच पुढें झाला, आणि आनदराव व धोंडजी याच्या मध्यें जाऊन दोघाचेही हात आपल्या दोन हातानीं घट्ट धरून त्याना एकमेकापासून दूर सारीत म्हणाला, "एकाच धन्याचे नोकर तुम्ही आणि असे वर्दळीवर येता, ही काय रीत झाली?" चला व्हा बाजूला." तो आनदरावाला म्हणाला, "धोंडजी शिंदा हा आमचा एक मोठाच आधारस्तभ आहे. त्याला उद्या रत्नागिरीवर सरखेलाची भेट घेण्यासाठीं जावयाचें आहे. जाऊ द्या त्याला नीटपणें."

"रत्नागिरीला?" सुजनसिगानें आपल्या साध्या स्वभावाला अनुसरून विचारलें, "सरखेल याला रत्नागिरीला कसे भेटतील?"

त्याबरोबर 'काय बरळतो आहे हा मूर्ख!' असें मनात म्हटल्यासारखी चर्या करून यज्ञेश्वरशास्त्र्यानें डोळ्यानीं सुजनसिंगाला खुणावलें. ती सावधगिरीची सूचना आनदरावालाही देण्यासाठीं हलकेच त्याचा हात आपल्या हातात घेऊन दाबला.

"सरखेलाचा मुक्काम आज उद्या रत्नागिरीलाच आहे ना?" धोंडजीनें पुन्हा खात्री करून घेण्यासाठीं विचारलें.

"होय." यज्ञेश्वर सुजनसिंगाकडे तिरप्या नजरेनें पाहात लगेच धोंडजीकडे वळून म्हणाला, "आमचे मामासाहेब तुला अजून परकाच समजतात. म्हणून ते सरखेलाचा पत्ता तुला सागावयाला टाळाटाळ करीत होते. तू आता जा पाहू लौकर! सकाळींच उठून रत्नागिरीचा मार्ग सुधार कसा! आणि सरखेल काय म्हणतात तें ऐकून तावडतोब माघारा ये. आम्ही तुझी वाट पाहात आहों."

धोंडजी तेथें बोलण्यात जास्त वेळ दवडीत बसला नाहीं. तो त्याच पावलीं तेथून निघाला. आनदराव तेव्हा त्याच्याकडे मारक्या रेड्यासारखा रोखून पहात होता. पण धोंडजीनें तिकडे लक्ष दिलें नाहीं.

थोडा वेळपावेतों तिघेही अगदी स्तब्ध होते. यज्ञेश्वरशास्त्र्यानें मशालजीला अमळ पुढें जाऊन धोंडजी खरोखरच गेला कीं नाहीं तें पाहावयाला सांगितलें. धोंडजी गेल्याची वर्दी घेऊन मशालजी माघारा आल्यावर यज्ञेश्वरशास्त्र्यानें मशालजीला धोंडजीचा दुरून माग काढीत पुढें जावयाला सांगितलें, व तेथें सुजनसिंग आणि आनंदराव हे दोघेच राहिल्यावर त्याच्या समवेत हळू हळू चालत जातां जातां हलकेच आनंदरावाला म्हटलें, "आनंदराव! आतां तुझ्यासाठीं निकडीची एक कामगिरी आहे. आज रातोरात तूं धोंडजीच्या पाठीवर गेलें पाहिजे."

"आणि जाऊन काय करावयाचें?"

"या कानाचें त्या कानाला न कळतां त्याला जगांतून नाहींसें करावयाचें. दुसरें काय करावयाचें?"

"कां? एकदम इतक्या जालीम उपायाची योजना करण्याचें कारण काय?" सुजनसिंगानें मध्येच प्रश्न केला. इतका वेळ चाललेल्या भानगडींचा त्याला कांहींच उमज पडला नव्हता.

"सारें सांगतों. पण मामासाहेब! त्यापूर्वी तुमच्याकडून आम्हांला एक आश्वासन पाहिजे आहे. एरव्हीं विश्वास कसा पटावा?" यज्ञेश्वरशास्त्री म्हणाला.

"कसलें आश्वासन पाहिजे आहे? मागा म्हणजे देतों." सुजनसिंग उत्तरला. त्याच्या दृष्टीनें त्याचें हें उत्तर अत्यंत शहाणपणाचें व दूरदर्शीपणाचें होतें. त्याला माहीत होतें कीं आग्र्याची दौलत तरली अथवा बुडली तरी आपणाला तें भवितव्य बदलण्याचें सामर्थ्य खास नाहीं. सध्याच्या एकंदर रागरंगावरून त्याला ती दौलत टिकण्यापेक्षां बुडण्याचाच संभव जास्त दिसत होता. यावेळीं विरुद्ध पक्षाचें समाधान नुसत्या आश्वासनांनीं होण्यासारखें असल्यावर तितक्या क्षुल्लक किंमतींत भलें मोठें घबाड मिळालें तर आपण तें कां दवडावें!

"आज तुमचा आमच्याकडे ओढा दिसतो आहे तो कायम आहे ना?"

"याविषयीं अजूनही तुम्हांला संशय आहे भटजी? मला सांगा, मीं काय केलें म्हणजे तुमची तशी खात्री होईल?"

"तुम्ही एवढेंच करा.–आता धोंडजी शिंदा कोणती बातमी घेऊन आला आहे आणि तो कुठें चालला आहे, तुम्हाला कल्पना आहे का? तो मानाजीराव आग्र्याना आणून आपल्या दौलतींत घुसवणार आहे. मानाजीरावानीं त्याला हाताशीं धरलें आहे. सरखेलाशीं गोडी करून त्याना आपल्या हातातील बाहुलें बनवून सोडावयाचें, आणि अचानक त्याना बेसावध स्थितींत पकडून पेशव्याच्या स्वाधीन करावयाचें, असा त्याचा डाव आहे. पेशवे मग त्या मोबदला सरखेलाची दौलत–तिच्यातले विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग व सिंधुदुर्ग असे महत्त्वाचे गडकोट स्वतःच्या ताब्यात ठेवून बाकीची सारी कोंकणपट्टी स्वतःच्या घशात टाकणार. असें झालें तर मग तुमची आणि तुमच्या बहिणीची-सरखेलाच्या परिवाराची किती बरें दैना उडेल?"

"असा त्याचा डाव आहे? भटजी! तर मग धोंडजी शिंद्याचा नायनाट करण्याची कल्पना तुमच्या डोक्यातून निघाली ती अगदीं बरोबर. आतां मीं इथें आणखी काय केलें पाहिजे सागा."

"उद्या कदाचित् अशी वेळ येईल, सरखेलाच्या मर्जीविरुद्ध हा गड लढविण्यासाठीं अथवा दौलत टिकविण्यासाठीं आम्हाला काहीं काहीं गोष्टी कराव्या लागतील. हेंच पाहाना! धोंडजी शिंद्याचें शासन करण्यासाठीं आम्ही जर सरखेलाच्या अनुमतीकरिता अवलबून बसलों, तर परिणाम काय होईल?"

"आलें. सर्व काहीं माझ्या ध्यानीं आलें. तुमच्या साऱ्या शकांना मी एकच अखेरचें व कायमचें उत्तर देऊन ठेवतों कीं एथल्या राजकारणांत तुम्ही, आनदराव वगैरे मडळी जें धोरण आखाल त्याबरहुकूम मी वागेन. मग तर झालें? मी वागेन इतकेंच काय पण जिजाबाईसाहेबदेखील वागतील. त्यांच्या समजुतीसाठीं आणि सरखेलाच्या इभ्रतीसाठींही एक मात्र तुम्हीं सर्वांनीं मिळून अवश्य केलें पाहिजे.—"

"काय केलें पाहिजे?"

"जिजाबाईसाहेबांच्या वाटेंतला प्रभावतीचा काटा—"

"एवढेंच ना? तो काटा लौकरच मुळापासून निघालेला तुम्हांला दिसून येईल. त्याची तुम्हाला मुळींच काळजी नको."

एवढें बोलून सुजनसिंगानें यज्ञेश्वरशास्त्र्याचें घर जवळ आलेलें पाहून त्याचा निरोप घेतला. एथवर झालेल्या गोष्टींची कुठेंही वाच्यता करावयाची नाहीं असें यज्ञेश्वरशास्त्र्यानें पुन्हा एकवार त्याला बजावलें व एखाद्या सराईत फितुराप्रमाणें त्यानें तें मान्य केलें.

आता यज्ञेश्वरशास्त्री व आनदराव हे दोघेच तिथें राहिले.

"आनदराव! आतां तुलाही तुझ्या कामगिरीवर गेलें पाहिजे. हातचें सावज निसटता उपयोगी नाहीं." यज्ञेश्वरशास्त्री म्हणाला.

"सावज तर हातून निसटता कामा नयेच. पण मीं स्वतः त्या सावजाला पकडायला जाणें तितकेंसें सुरक्षितपणाचें नाहीं. कारण मला धोंडजी चागलाच ओळखतो. आम्ही समोरासमोर आल्यावर तो बाचाबाची करावयाला कमी करावयाचा नाहीं; आणि तो प्रकार षट्कर्णी झाला तर हा हा म्हणता इतके गैरसमज आपसातच माजतील कीं आमचें आम्हांलाच ही परिस्थिति काबूत राखणें अशक्य होऊन बसेल. सरखेलांचा स्वभाव तुम्हांला माहीत आहे. ज्या माणसाचा एखाद्यावर विश्वास फार जलद बसतो, त्याचा विश्वास जलद उडतोही. यासाठीं जपायला हवें."

"म्हणूनच रातोरात रत्नागिरीला गडकऱ्याकडे चिठ्ठी घेऊन जहाज रवाना करू. यावेळीं तात्याजी जर इथें असता, तर सोळा आणे काम झालें असतें."

"तो केव्हां येईल?"

"येईल बहुधा आज उद्यां इतक्यांत. मुबईला जावें लागलें तर जास्त दिवस लागतील. पण तिथवर जावेंच लागायचें नाहीं त्याला. इंग्रजी जहाजाच्या कप्तानाला सर्व परिस्थिति नीट समजावून सांग आणि तावडतोब माघारा ये असें मीं त्याला सांगितलें आहे."

"पण सुभेदाराच्या संमतीखेरीज आम्हीं हा उद्योग आरंभिला आहे. याचा सुभेदाराना राग बीग तर नाहींना यायचा? त्याचे बेत यामुळें नाहींना फिसकटायचे?"

"काहीं नाहीं फिसकटत त्याचे बेत."

"सुभेदाराचा मानस तुला अगदीं पूर्णपणें माहीत आहे?"

"अगदीं पूर्णपणें माहीत आहे. जिवात जीव असेतों सुभेदार सरखेलाचा पेशव्याशीं तह होऊं देणार नाहींत."

"तरीपण मला वाटतें, इतकी उघड उघड मुबईकर इग्रजाशीं फितुरी करण्यापूर्वी सुभेदाराना कळविता आलें असतें तर फार बरें झालें असतें. त्याच्या डोक्यात काहीं निराळा डाव असला तर?"

"त्याच्या डोक्यात काहींही डाव असला, तरी आपली एक बाजू ढासळत चालली आहे. माणकर व गवळी वगैरे मंडळीचा ओढा हलके हलके सरखेलाकडे वळू लागला आहे व ते तहाच्या बाबतींत सरखेलाना मदत करण्याला तयार आहेत हें त्याना अजून नीटसें कुठें माहीत आहे? तें त्याना काल कळलें असेल. तथापि प्रत्यक्ष सरखेलाची भेट होऊन त्याचा रागरग माहीत होईपावेतों त्यानादेखील पुढील नक्की योजना आखता येणें अशक्य आहे. त्याना अजून असेंच वाटत असेल कीं अपमानकारक अटी पेशव्यानीं तहात घातलेल्या सरखेलाना मानवणार नाहींत, व त्याच्याच तोंडून तह मोडेल. तसें झालें तर तिथल्या तिथें सरखेलाना कैद करणें सुभेदाराना जितकें सोपें जाईल, तितकें गौळी व माणकर सरखेलाची कड घेऊन बोलूं लागल्यावर व त्याच्या भिडेला बळी पडून सरखेल तहाला तयार झाल्यावर सोपें जाणार नाहीं. आणि सरखेल कैद झाल्यावर ताबडतोब जर हा गड पाडाव झाला नाहीं, तर आपली काहीं घडगत नाहीं. मी आपणा दोघापुरतें बोलतों आहें. सुभेदाराची वृत्ति अशी आपलपोटेपणाची आहे कीं ते ताक घुसळायला आम्हाला लावतील आणि लोणी आपण गट्ट करतील. यासाठीं म्हटलें, बातमीदारीबद्दल तरी इंग्रजाकडचें बक्षिस आपण पदरात पाडून घ्यावें."

"पण हा डाव—तूं सुभेदाराप्रमाणेंच माझ्यादेखील तोंडाला पानें नाहींना पुसणार?"

"हें काय बोलणें झालें भटजी? तुमच्या साह्याशिवाय व समती शिवाय कोणती तरी गोष्ट मीं आजवर केली आहे का?"

"आजवर केली नाहींस. पण—हो त्याचा काय नेम? लढायला —मरायला भटजी आणि देणगी उपटायला आपण असा धूर्तपणाचा बेत यायचा एखाद वेळीं तुझ्या डोक्यात. आपलें उगीच म्हटले हें! सावधगिरीची सूचना देऊन ठेवली."

"काहीं हरकत नाहीं. पण ज्या अर्थीं इतका विकल्प तुमच्या मनांत आला आहे, त्या अर्थीं यापुढें हीं सारीं सूत्रें तुम्हीच हलवा आणि मला यातून मुक्त करानाॽ"

"तसें नको. तूं आणि मी दोन आहोंत का? माझें सांगणें इतकेंच कीं मुबईकर इंग्रजांकूडून लग्गा साधायचा म्हणजे पळतें पीक आपणाला घ्यायचें आहे हें साधून. यात जर जरा कुठें ढिलाई अथवा दिरगाई झाली, तर सगळ्या प्रयत्नावर पाणी पडायचें. इग्रज तसे साधे भोळे नाहींत बरें! स्वतःच्या धन्याशीं व देशाशीं बेइमान होणाऱ्या लोका-वर मोठा कटाक्ष असतो इग्रज लोकाचा म्हणे!"

"आणि इग्रज तरी काय एरव्हीं इमानदारीचे पुतळे लागून गेले आहेत ते? सुभेदार काय, मी काय अथवा तुम्ही काय, आज आम्हा सर्वांना मुबईकरात थोडाफार मान आहे तो काय खरा मान तुम्ही समजतां? कुठेंही पाहिले तरी कामापुरता मामा हाच न्याय. हें ओळखून आपण वागलें म्हणजे झालें. आपण सुभेदाराचीं माणसें, तेव्हा जिथें त्याचें ताट तिथें आपल्या वाट्या.—निदान पानाचे द्रोण तर खरे? सरखेलाची सरशी झाली तर आपण त्याचे पक्षपाती व विश्वासू सेवक आहोंतच. इंग्रजाचा जय झाला तरीदेखील निदान आंग्रे आणि सुभेदार याच्या माणसापेक्षा तर आम्ही त्याना अधिक जवळचे खरे?—तें राहूंद्या तूर्त. माझ्यावर तुम्हीं धोंडजीचें पारिपत्य करण्याची जबाबदारी टाकली आहे, ती मी पार पाडीन. रत्नागिरीचा

किल्लेदार माझ्या ओळखीचा व वगीचा आहे. त्याला मी पत्र लिहितों, कीं काम भागलें. तो धोंडजीला हटकून कैद करून ठेवील. मग त्याची वासलात काय लावायची ती आपणाला लावता येईल. पण त्यापूर्वी एक महत्त्वाची भानगड आपणाला मिटवायची आहे."

"ती कोणती?"

"धोंडजीनें कैदी आणले आहेत म्हणाला ना, त्यांची."

"त्यांची भानगड काय मिटवायची?"

"काय म्हणजे! त्यात दोन माणसें—दुल्लभजी व रुद्राजी हे दोघे सरखेलांचे आहेत, आणि श्रीपति गवळी—"

"त्याचा एकट्याचाच काय तो प्रश्न आहे दुसऱ्या दोघांना आपण जन्मभर कैदेंत कोंडून ठेवलें तर असें का असें आपणाला कोण विचारणार आहे? प्रश्न आहे काय तो श्रीपति गवळ्याचा."

"आणि ते दोघे तरी तुम्हांला वाटतात इतके साधे सुधे नाहींत भटजी! त्यांची आणि सरखेलाची गाठ पडली तर ते हटकून मोकळे सुटतील. सरखेलाचा विश्वास आमच्यापेक्षां त्याच्यावर बसणार हें उघड आहे. त्याचा सासुरवास मग आपणाला सहन व्हायचा नाहीं. मी म्हणतों, ते कैदेंत राहिले तरीदेखील आम्हाला भारी होऊन बसतील. गडावर व आसपास त्यांचें वजन फार आहे. आमच्या कारस्थानांतला गुप्तपणा अखेरपावेतों कायम टिकविण्याच्या कामीं त्याचा आम्हाला अतिशय अडथळा होईल त्यापेक्षा त्याना आपण आजच्या आज जर नाहींसे केले, आणि ते फितूर होते असा त्यांच्या नांवाचा मागाहून बोभाटा केला, तर सुठीवाचून खोकला गेल्यासारखा होईल."

"पण काय रे, श्रीपति आणि ते दोघे याची मैत्री जमली तरी कशी? कीं श्रीपतीनें त्या दोघाना आपल्या बाजूला वळवून घेतलें आहे?"

"काय असेल तें आपण उशीर न लावतां ताबडतोब जाऊन समक्ष पाहिलें पाहिजे. पहिली गोष्ट म्हणजे श्रीपतीची मुक्तता झाली पाहिजे. चला आपण अगोदर गडावर तर जाऊं खरे! आणि मामासाहेब व बाबाजी यांच्या विचारानें काय तें एकदांचें करून टाकूं."

असें ठरवून ते दोघे गडाकडे जाऊ लागतात, तोंच महिपति त्याना समोरून येताना दिसला.

"काय रे! इतक्या तातडीनें माघारा आलास?" यज्ञेश्वर-शास्त्र्यानें विचारलें.

"माघारा आलों.–तसेंच जरुरीचें काम आहे. तुमच्याकडेच येत होतों. आता चला असेच गडावर. जाता जाता सांगतों." असें म्हणून महिपति त्या दोघांसह बोलत बोलत माघारा गडावर निघाला.

## प्रकरण सोळावे

# तीन धूर्तांचें कारस्थान

त्या दिवशींच तडजोडीच्या वाटाघाटीसाठीं तुळाजीला नेण्यासाठीं महिपति सावंत विजयदुर्गावर आला काय, तुळाजीला घेऊन गेला काय, आणि लगेच रात्रौ प्रभावतीला तुळाजीच्या सांगण्यावरून देवगडी घेऊन जाण्यासाठीं येतो काय? पण याचें आश्चर्य असें कोणालाही वाटलें नाहीं, उलट ज्यानें त्यानें प्रभावतीला महिपतीबरोबर जाण्याला भरच दिली, हेंच आश्चर्य!

तथापि जरा खोलात डोकावून पाहिल्यावर तेंही आश्चर्य वाटण्याचें तितकेंसें कारण नव्हतें. जिजाबाई व तिचा भाऊ सुजनसिंग या दोघांनाही आंग्र्यांच्या घरातून प्रभावतीचा कांटा शक्य तितक्या लौकर व शक्य तितक्या बिनबोभाटपणानें दूर करावयाचाच होता. प्रत्यक्ष यज्ञेश्वरशास्त्री, आनंदराव वगैरे मंडळीला जरी प्रभावतीची अडचण अथवा साह्यताही नव्हती, तरी ते दोघे अगोदरच वचनाला गुंतून पडले होते. जिजाबाई व सुजनसिंग यांना आपल्या बाजूला वळवून घेण्यासाठीं प्रभावतीचा ज्या प्रकारें बळी कोणाकडून तरी घेतला जाईल, त्या प्रकारें तो देण्याचें त्यांनीं त्या दिवशीं सायंकाळींच सुजनसिंगापाशीं कबूल केलें होतें. त्याखेरीज आणखी त्यांचें कांहीं संभाषण महिपतीशीं झालें असेल तें नकळे. पण महिपतीनें प्रभावतीला भेटून रातोरात देवगडीं जाण्याचा मानस कळविला व प्रभावतीनें लगेच यज्ञेश्वरशास्त्र्याला बोलावून आणवून त्याचें मत घेतलें, तेव्हां त्यानें तिला खासगी सल्ला दिली, "महिपतीच्या सांगण्यावरून मलादेखील वाटतें कीं ह्या गडावर शत्रूची टोळधाड केव्हां पडेल याचा नियम नाहीं. मग सरखेलांना कदाचित् देवगडासारख्या विश्वासाच्या ठिकाणीं

राहूनच त्यांना शत्रूशीं टक्कर देण्याची तयारी करावी लागेल. यास्तव खाशा मंडळीनें गडाबाहेर देवगडासारख्या सुरक्षित ठिकाणींच जाणें इष्ट होय.

प्रभावतीचा जितका देवावर तितकाच यज्ञेश्वरशास्त्र्यावर विश्वास असल्यानें तिला तो विचार पटला. ती महिपतीबरोबर देवगडीं जाण्यास तयार झाली. पण तिला वाटलें, सकट जर कोसळलेंच, तर ते जितकें आपणाला तितकेंच जिजाबाईसाहेबानाही जाचक होणार नाहीं का? त्यानींदेखील आपणाबरोबर स्थलातर करावें हें उत्तम. जिजाबाई तिची सवत खरी, पण प्रभावती तिच्याशीं सवतीमत्सरानें कधींच वागत नसे. ही प्रभावतीची जिजाबाईच्या ठायींची निःसीम स्वामिनिष्ठा यज्ञेश्वरशास्त्र्याच्याही पूर्णपणें अनुभवाला आली होती. थोड्याच दिवसापूर्वी एक काळ असा येऊन गेला होता कीं तेव्हां यज्ञेश्वरशास्त्र्यानें, कोठून तरी सरखेलाच्या ससारात फूट पाडून आपला कार्यभाग साधावयाचा ह्या हेतूनें जिजाबाईविरुद्ध प्रभावतीच्या कानात विष ओतण्याचा प्रयत्न करून पाहिला होता. प्रभावतीचा एकुलता एक झुझार याला सरखेलाच्या पश्चात् सरखेली मिळवून द्यावयाची असेंही आमिष त्यानें प्रभावतीला तेव्हा लावलें होतें. सरखेलाच्या घरात कोणत्या ना कोणत्या निमित्तानें कलहाग्नि चेतवावयाचा आणि त्या कलहाग्नींत त्याना भाजून मरावयाला लावावयाचे, असा यज्ञेश्वरशास्त्र्याचा तो डाव होता. पण तो साधला नाहीं. प्रभावती आपली पायरी सोडून भलतीकडे जाण्याला तयार झाली नाहीं. तिचें जिजाबाईशीं वितुष्ट आणणें अवघड—किंबहुना अशक्य आहे अशी खात्री झाल्यावर त्यानें तोच फासा जिजाबाईवर टाकला. प्रभावती ही सरखेलाची अत्यत आवडती आहे याचें कारण ती चेटकें करते व सरखेलाना नादीं लावते, तिला आपला झुझार सरखेलीचा धनी व्हावा असें वाटतें, व त्यासाठीं ती वेळींवखतीं सरखेलाचा कोणत्या तरी गुप्त उपायाने घातदेखील करावयाला कमी करणार नाहीं, असें विषारी वातावरण सभोंवार निर्माण करतांच जिजाबाई नेमकी त्यात हुरळून

गेली. तें आगलावेपणाचें काम अगदीं बेमालूमपणें साधण्यासाठींच यज्ञेश्वरशास्त्र्यानें सुजनसिंगाला आपल्या हाताशीं धरलें होतें.

परतु आपल्या पायाखालीं शत्रूनें किती खोल व भयकर भुयार पोखरून ठेवलें आहे याची जिजाबाईलाही दाद नव्हती. तिला वाटत होतें कीं यज्ञेश्वरशास्त्री आपला केवढा हितकर्ता! तिला वाटे, साताऱ्यात राणी ताराबाईचें एवढें प्रस्त आहे, कोल्हापूरात सारा कारभार राणी जिजाबाईच्या मर्जीनुरूप चालला आहे, आग्ऱ्याच्या दौलतींतही कान्होजीरावाच्या व त्यानतरच्या अमदानींतदेखील मथुराबाईचें प्राबल्य होतें, तसलें महत्त्व ह्याच अमदानींत आपणाला का सपादन करता येणार नाहीं?

सवतीचा नाश व सत्तेचा लाभ!—ससाराच्या चार भिंतींबाहेरचें जग जिनें आजवर कधींच विशेषसें अवलोकन केलेलें नाहीं व राजकारणातील एखादी जबाबदारीची गोष्ट पार पाडलेली नाहीं, अशा जिजाबाईला आपल्या सभोंवार गोंडा घोळणारीं सारीं जवळचीं व दूरचीं माणसें आपापल्या स्वार्थाला जपत आहेत असें मुळींच वाटलें नाहीं. तिला वाटलें, ही या सर्वांची स्वामिभक्ति आपल्या प्रत्ययाला येत आहे. म्हणूनच प्रभावतीनें आपणाबरोबर जिजाबाईलाही सुरक्षित जागीं पाचारण केलें, तेव्हां जिजाबाईनें सुजनसिंगाला, त्यानें यज्ञेश्वरशास्त्र्याला, अशी त्या प्रश्नाची परवड लागली. अखेर जिजाबाईनें प्रभावतीबरोबर बाहेर जावयाचें नाहीं असें ठरलें. अर्थात् तसें ठरवितांना प्रभावतीवर भलभलते दोषारोप केले गेले ते निराळेच, आणि महिपति पडवळाला जिजाबाईपक्षाच्या खास मडळीकडून अशी कळकळीची सूचना देण्यांत आली, "प्रभावती जी एकदां इथून बाहेर जाईल, ती कांहीं केल्या माघारी येऊं नये."

अर्थात् प्रभावतीला मुद्दाम अवेळीं बोलावून देवगडीं नेणारा महिपति हा एका बाजूनें सुभेदाराच्या हातांतील बाहुलें तर होताच; पण दुसऱ्या बाजूनें तो जिजाबाईच्याही हातांतलें बाहुलें होता. पण जिजाबाईला आणि यज्ञेश्वरशास्त्र्याला देखील स्वतंत्र अस्तित्व कुठें

होतें ? त्या सर्व कृष्णकारस्थानांचा जिथें उगम तिथेंच सगम.—सुभेदार !

त्याच सुमाराला महिपति प्रभावतीला देवगडीं न्यावयाला आला. त्याच सुमाराला सुभेदारांकडील कोणी एक गुप्त दूत येऊन यज्ञेश्वर-शास्त्र्याला परस्पर भेटून गेला. त्याचें काय सभाषण झालें हें मात्र कुणाला कळलें नाहीं.

एक मात्र त्या वेळीं झालें. तो कोणी गुप्त माणूस भेटून गेल्या वर इकडे प्रभावतीच्या महालात कुशाबा व महिपति वगैरे मडळी प्रभावतीसह देवगडीं जाण्याची तयारी तातडीनें करीत असताना यज्ञे-श्वरशास्त्री त्या मंडळीचा निरोप घेऊन म्हणून जो निघाला, तो पुन्हा थेट जिजाबाईच्या महालांत गेला. तिथें त्याचें जिजाबाई व सुजन-सिंग यांच्याशीं एकान्तांत थोडा वेळ खलबत झालें. त्या खलबताचा मुख्य विषय 'मानाजी व तुळाजी ह्या दोघां भावाची एकी होऊन प्रभावती जर सरखेलांच्या तुटक्या फुटक्या दौलतीची मालकीण होणार असली, तर पुढें काय ?'

हा प्रश्न उत्पन्न केला तो यज्ञेश्वरशास्त्र्यानेंच, व त्याचें उत्तरही त्यानेंच दिलें. जिजाबाई व सुजनसिंग यांनीं केवळ 'मम' म्हटलें.

तशीच आणीबाणीची वेळ आली तर स्वसरक्षणासाठीं सरखेलांना-ही न जुमानतां काय उपाययोजना करावयाची, याविषयीं नक्की योजना जी यज्ञेश्वरशास्त्र्यानें आपल्या मनानें ठरविली होती, तिला जास्त चिकित्सा न होतांच खाशा मालकिणीची व मामासाहेबाची संमति मिळाली. आणि तीही साधी नव्हे, चांगली सही शिक्क्याची.

प्रभावति, तिची विश्वासू दासी तारा, तिचा धाकटा झुझार व कुशाबा यांच्यासह महिपति रातोरात देवगडावर रवाना झाला. त्या सासरेजांवयांचें आपसांत जरी वैमनस्य होतें, तरी तें त्या आणी-बाणीच्या प्रसगीं वर डोकें करूं शकलें नाहीं. कुशाबानें पोक्तपणानें विचार केला, आपलीं भांडणें व बेबनाव केवळ घरगुती. खाशांची सेवा करतांना ती अडगळ मुद्दाम पुढें कशाला आणा ! शिवाय आज बऱ्याच दिवसांत त्याला त्याची लेंक भेटली नव्हती ती या निमित्तानें

आता भेटणार होती. त्याचा व्याही रंगोबा साटमही अनायासें देवगडावर होता. तो फार सज्जन माणूस आहे असा त्याच्यावर कुशाबाचा भरवसा होता. तो आपल्या मुलाचा संसार सुरळित चालावा या विषयीं खटपट करावयाला चुकणार नाहीं अशी त्याची खात्री होती. प्रभावतीनें तर महिपतीला आपला पाठचा भाऊ मानलें होतें. तिला जर आपणाविषयीं इतका आदर वाटतो,—कुशाबाचे विचार हे—तर ती आपल्या एकुलत्या एका लेंकींविषयींही पाठच्या बहिणीसारखा अभिमान बाळगणार नाहीं काय? तिचा संसार सुखाचा होण्यासाठीं महिपतीला चार उपदेशाचे शब्द अधिकारवाणीनें सांगण्याची गरज पडली तर प्रभावति ऐवढें करणार नाहीं काय?

पण— !

दुसराही एक महत्त्वाचा प्रश्न त्या रात्रीं विजयदुर्गावर सुटला—अथवा सोडविण्याचा प्रयत्न झाला. श्रीपति, दुल्लभजी व रुद्राजी यांच्या विषयींचा तो प्रश्न होय. आनंदराव सुर्व्यानें आपले विश्वासू माणूस धोंडजी शिंद्याच्या पाठलागावर एका वेगवान जहाजांतून पाठविल्यावर व प्रभावति वगैरे मंडळीला देवगडाकडे रवाना केल्यावर सुजनसिंग व यज्ञेश्वरशास्त्री यांच्यासह प्रथम जर कांहीं केलें असेल, तर रातोरात बाबाजी धुळपाला बरोबर घेऊन गडावर तो गेला आणि काळजीपूर्वक बंदिवासात असलेल्या त्या तिघा कैद्यांची भेट घेऊन चौकशी केली.

ती चौकशी करण्यापूर्वीच त्या तिघांचा आपसांत विचारविनिमय होऊन त्या तिघा कैद्यांना कोणत्या प्रकारें वागवावयाचें, याचें जवळजवळ निश्चित धोरणही ठरलें होतें. श्रीपति गवळी आपल्याच पक्षाचा आहे. त्याला या कानाचें त्या कानाला न कळतां मोकळा सोडावयाचा, व रुद्राजी आणि दुल्लभजी यांना जागच्याजागीं ठार करावयाचें, हा त्यांच्या धोरणाचा निष्कर्ष होता.

पण त्या तिघांनाही अनुभव आला तो मात्र प्रथमपासूनच अगदीं निराळा. पहिल्याप्रथम ते बाबाजी धुळपाला भेटावयाला गेले, तिथेंच

माशी शिंकली. त्या म्हाताऱ्यानें पहिल्याच सपाट्याला त्या तिघाऱ्याही कपाळाला वाटाण्याच्या अक्षता लावल्या.

आधीं मुळीं रात्रीच्या वेळीं बाबाजी त्या मंडळीशीं आपल्या ताब्यातील कैद्याविषयीं वाटाघाट करण्यालाच तयार होईना. तो सरळ वृत्तीचा माणूस. आपले धनी सरखेल, त्याची इमानेंइतबारें सेवा करावयाची. अगदीं रामाचा जसा हनुमान तसा सरखेलाचा बाबाजी असें लोकदेखील म्हणत. रामाला एकच एकनिष्ठ हनुमान सेवक लाभला होता. पण सरखेलाना दोन हनुमान लाभले होते. एक कुशाबा साटम आणि दुसरा हा बाबाजी धुळप. हे दोन्ही हनुमान असे कीं त्याचा धन्याकडून अनेकवार उपमर्द व्हावा, पण तें मनावर न घेता त्यानीं आपलें कर्तव्य करून धन्याच्या हिताला जपावें.

कुशाबा आणि बाबाजी याच्यात फरक असलाच तर इतकाच कीं कुशाबानें स्वतःला अलीकडे प्रभावतीच्या सेवेला वाहून घेतलें होतें, आणि बाबाजी सरखेलाच्या सेवेंत रुजू होता. वास्तविक कुशाबा जसा सदैव प्रभावतीच्या छायेसारखा तिच्याबरोबर असे, तसा बाबाजी सरखेलाबरोबर असे. पण अलीकडे—अगदीं अलीकडेच कोणींतरी कांहींतरी विष कालवल्यामुळें सरखेल त्याला पूर्वींइतकें जुमानीनासे झाले होते. पण त्याची बाबाजीला पर्वा नव्हती. पर्जन्याला जसें वर्षावयाचें एवढें फक्त माहीत, आपलें वर्षाजल नदीनाल्यातून वाहतें कीं त्यावर शेतें पिकतात कीं तें महापूर आणून पृथ्वीवर जलप्रळय करतें, याचा विचार पर्जन्याला नसतो, तशीच बाबाजीची स्वामिभक्ति होती.

राजकारण बाबाजीला कळत नव्हतें खरें. तरी कोणतीही गोष्ट आपल्या धन्याच्या अनुमतीखेरीज करावयाची नाहीं, इतका सावधपणा त्यानें अलीकडे बाळगावा. हा सावधपणा कधीं कधीं खुद्द तुळाजीलाही इतका त्रासदायक वाटे कीं असल्या सागकाम्या माणसाला किल्लेदारीच्या कामावरून दूर करावें असेंदेखील त्याच्या मनात अलीकडे बारवार येऊ लागलें होतें. पण सभोंवार सर्वत्र फितुरीचा बुजबुजाट माजला असल्यानें अशा बुजबुजाटात किल्लेदार तरी बाबाजीसारखा

खबीर व निष्ठावंत असावा, म्हणूनच त्यानें बाबाजीला विजयदुर्गावर कायम ठेवलें होतें.

तसाच अनुभव आज आनदराव, सुजनसिंग व यज्ञेश्वरशास्त्री याना आला. यज्ञेश्वयशास्त्र्यानें नुसती आज धोंडजी शिंद्यानें आणून ठेवलेल्या कैद्याची भेट घेण्याची इच्छा दर्शविली, त्याबरोबर बाबाजीनें स्पष्ट सागितलें, "सरखेल येतील आणि त्या कैद्याचें काय करावयाचें तें करतील. तोंवर मी कोणाला त्याची भेटही घेऊ देणार नाहीं."

"हें उत्तर तू कुणाला देतो आहेस?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें सुजन सिंगाकडे अगुलीनिर्देश करून म्हटलें, "हे धनी समोर उभे आहेत, त्याना तू पाहतोस ना?"

बाबाजी सुजनसिगाला नम्रतापूर्वक अभिवादन करून म्हणाला, "मी धन्याच्या पायाचा दास आहें, पण खासगी नात्यानें. किल्लेदार या नात्यानें मी एका सरखेलाखेरीज दुसऱ्या कोणत्याच धन्याना धनी म्हणून ओळखू शकत नाहीं. सरखेलाचीच मला तशी आज्ञा आहे."

"काय आज्ञा आहे?" सुजनसिंगानें संतापून विचारलें.

"काय आज्ञा आहे ती आपणही जाणताच. आपणही सरखेलाच्या गैरहजेरींत त्यांच्या कारभारात अशी ढवळाढवळ करणें इष्ट नाहीं..." एवढें बोलून बाबाजी थबकला. त्याला आणखीही बोलावयाचें होतें. पण तें एकट्या सुजनसिंगापाशींच त्याला बोलता आलें असतें. यज्ञेश्वर-शास्त्री व आनदराव याच्याविषयीं आपणाला भरवसा वाटत नाहीं, असें तो त्या दोघाच्या तोंडावर कसें बोलेल?

"मला असलीं उडवाउडवीचीं उत्तरें नको आहेत. सरखेलाच्या गैरहजरींत मी इथला मालक आहें. मी तुला आज्ञा करतों; मुकाट्यानें तुरुगाच्या किल्ल्या माझ्या स्वाधीन कर."

"नाहीं."

"ह्या उद्दामपणाबद्दल तुला शिक्षा भोगावी लागेल."

"मरण भोगावें लागलें तरी बेहेत्तर!"

"मग भोग तर मरण!" असें म्हणून सुजनसिंगानें आपल्या

कमरपट्ट्यांतील जबिया सरकन् बाहेर काढून आवेशासरसा बाबाजी-वर वार केला. त्यासरसा बाबाजी घायाळ होऊन बेशुद्ध स्थितींत खालीं पडला.

यज्ञेश्वरशास्त्री आनंदरावाला जरा बाजूला घेऊन हळूच त्याच्या कानाशीं लागून म्हणाला, "सरखेलानीं विचारलें तर आपल्या कानीं हात बरें! तिकडे मेहुणे मेहुणे पाहून घेतील."

तेवढ्यात सुजनसिंग त्या दोघाकडे वळून म्हणाला, "आता तरी आपला मार्ग मोकळा झाला कीं नाहीं?"

"होय. पण—"

"पण बीण सारें मागाहून. अगोदर आपण तुरुंगाकडे जाऊ." असें म्हणून सुजनसिंगानें बाबाजीच्या कमरपट्ट्याला लटकत असलेला किल्ल्यांचा घोंस काढून घेतला, व तुरुंगाचा मार्ग धरला.

"सरकार!" आनंदरावानें यज्ञेश्वरशास्त्र्याच्या कानात कांहींतरी कुजबुजून त्याची संमति घेऊन कांहींतरी बोलण्यासाठीं सुजनसिंगाला हाक मारली व म्हटलें, "हें प्रकरण आपणाला पुढें नडेल. उद्यां सरखेल आल्यावर हा थेरडा जर त्याना सागू लागला, तर मोठाच अनर्थ गुदरेल. त्यापेक्षा—"

"त्याला कांही उपाय आहे का आता?"

"आपल्या अविचाराचा मुद्देमालच नाहींसा केला तर तेवढा मात्र उपाय आहे."

"मुद्देमाल नाहींसा करायचा म्हणजे बाबाजीला ठार करायचा काय?"

"त्याखेरीज दुसरा उपाय नाहीं. हा प्रकार आपणां तिघांखेरीज चौथ्या कोणालाही माहीत नाहीं, हें एका अर्थी फार चांगलें आहे. कोणींतरी किल्लेदाराला मारलें अशी हाकाटी आपण केली तर ती चालण्यासारखी आहे."

"पण हकनाहक एका निरपराधी माणसाची हत्या!"

"हें पाहा, आम्हांला बाबाजीनें विरोध केला हा त्याचा अपराध;

आता त्याला चहाडी करावयाला जिवत ठेवलें तर तो आपला अपराध. मी तर म्हणतों कीं अपराध अथवा निरपराध ज्याचा त्यानें आपल्या मनाप्रमाणें व मगदुराप्रमाणें ठरवायचा असतो. आता तुम्ही ह्या बाबाजीला जखमी केलें, त्याचा असा काय अपराध होता? पण तुमचें मन त्यानें दुखविलें हा तरी त्याचा अपराध नव्हे का? आणि त्याला तुम्हीं आमच्यादेखत ठार मारलें हा तुमचा अपराध नव्हे का? थोडक्यात सागावयाचें म्हणजे असें आहे, अपराध करण्यात खरा अपराध नसून केलेला अपराध उघडकीला येऊ देण्यात अथवा शाबीत होऊ देण्यात खरा अपराध आहे."

यज्ञेश्वरशास्त्र्याची ही अपराधमीमासा ऐकून सुजनसिग विस्मयपूर्वक हसून म्हणाला, "तुमच्या मुखानें हें धर्मशास्त्रच बोलतें आहे म्हणावयाचें, भटजी!"

यज्ञेश्वरशास्त्री लगेच रोखठोक उत्तरला, "धर्मशास्त्राला आम्ही शास्त्री पडित जन्माला घालतों, धर्मशास्त्र आम्हाला जन्माला घालीत नाहीं."

"धर्मशास्त्राचा वाद मागाहून. सध्या आपल्यापुढें प्रश्न दुखवलेल्या सापाला ठार करण्याचा आहे." आनदराव म्हणाला.

सुजनसिंगालाही तें पटलें. "ह्या नखाच्या कामाला कुऱ्हाडी थोड्याच लागतात!" असें म्हणत तो तसाच चार पावलें माघारा गेला, व त्यानें तरवारीच्या एका घावासरसें बाबाजीचें शीर धडावेगळें केलें.

तो मुडदा तसाच तिथें बाजूला लोटून ते तिघेही गडावरील तुरुंगाकडे वळले.

तें त्रिकूट तिकडे तुरुगाकडे जात असताना इकडे एक नाव बदरांत येऊन उभी राहिली, व तिच्यातून एक तरुण मराठा सरदार सरखेलाची चौकशी करीत खालीं उतरला. त्याला जेव्हा सरखेल गडावर नाहींत असें कळलें, तेव्हा त्यानें जिजाबाईची भेट घेण्याची इच्छा दर्शविली. प्रथम पहारेकऱ्यानीं त्या तरुणाला तशा रात्रीच्या वेळीं

जिजाबाईकडे नेण्याचें नाकारलें पण आपण तातडीच्या कामासाठीं मुद्दाम कल्याणकडून आलों आहों, व आपली भेट खाशाशीं लौकर न झाल्यास भयंकर कार्यनाश होण्याचा संभव आहे असें त्या तरुणानें सांगितलें, तेव्हां पहारेकरी विरोध करावयाला धजला नाहीं. त्यानें त्याला खाशा स्वारीच्या महालाकडे नेऊन सोडलें.

परंतु ती अवेळ—रात्रीची वेळ असल्यानें प्रथम त्या तरुणाची भेट खाशा मंडळीशीं होण्याचें कांहीं चिन्ह दिसेना. अखेर त्या तरुणानें जिजाबाईला त्याच पहारेकऱ्याच्या हातीं निरोप पाठविला, "बाई-साहेबांना म्हणावें, गणोजी मान्याची लक्ष्मी आपल्या आश्रयाला आली आहे, व तिला एक अत्यंत महत्त्वाची वार्ता खाशाच्या कानीं घालावयाची आहे"

तेव्हां कुठें जिजाबाईनें लक्ष्मीची भेट घेण्याची इच्छा दर्शविली व लक्ष्मीला आंत प्रवेश मिळाला यज्ञेश्वरशास्त्र्याला हें आगाऊ कळलें असतें, तर त्यानें लक्ष्मीची इतक्या सुधेपणानें जिजाबाईशीं भेट होऊं दिली असती काय?

## प्रकरण सत्रावे

# तुळाजी आंग्रे

वाघाला कोंडण्यासाठीं सापळा उभारावा, तसा रामाजीपंत बिवलकरानें तुळाजी आग्र्याला कोंडून नेस्तनाबूद करण्यासाठीं समेटाच्या वाटाघाटींचा जो एक सापळा तयार केला होता, त्याची खुद्द तुळाजीला तो यशवतगडावर जाऊन पोहोंचेपावेतों व तेथें जाऊन पोहोंचल्यावरही दाद नव्हती. तशी दाद असण्याचा काहीं संभवही नव्हता. खडूजी माणकर व जावजी गवळी हे दोन्ही कर्ते पुरुष त्याच्या परिचयाचे होते, व त्या दोघांनीं पेशवे आणि आग्रे याचा सलोखा करून देण्याचें मनावर घेतलें होतें. ही भेट होऊन सलोखा वास्तविक यापूर्वींच व्हावयाचा. पण सुभेदार बिवलकराला ती तडजोड मान्य असल्याखेरीज तिचा काहीं उपयोग नव्हता. म्हणून ते आजवर थाबले होते. अखेर आपण अमूक दिवशीं यशवतगडावर वाटाघाटी करण्यासाठीं येतों असें सुभेदाराचें पत्र येताच गवळी व माणकर यानीं रगोबा बाबूराव ऊर्फ महिपति पडवळामार्फत तुळाजीला यशवतगडीं पाचारण केलें होतें.

त्या पाचारणाप्रमाणें तुळाजी दुसऱ्या दिवशीं सकाळीं यशवंतगडावर जाऊन पोहोंचला. तुळाजी येणार अशी आगाऊ वर्दी मिळाल्यामुळें खडूजी माणकर व जावजी गवळी त्याचें स्वागत करण्यासाठीं वाट पाहत हजर होते. तें स्वागत स्वीकारताना तुळाजीला एकदर परिस्थितीविषयीं इतका विश्वास वाटू लागला कीं, आपल्या खात्रीच्या महिपति साटमाच्या मनात आपणाविषयीं काहीं काळेंबेरें असल्यामुळें तो अर्ध्या वाटेवरून माघारा वळला असेल, असा सशयही त्याला आला नाहीं. महिपतीनें कबिले—विशेषतः प्रभावति व झुझार

यांना तूर्त ह्या भानगडीचा शेवट होईपावेतों विजयदुर्गावर ठेवणें इष्ट नाहीं असें सागून प्रभावतीला देवगड अथवा कुणकेश्वर या दोहोंपैकीं एका ठिकाणीं नेऊन ठेवणें इष्ट होय असें सागितलें, व तुळाजीनें त्याला ताबडतोब होकार देऊन त्याला त्याच पावलीं मागें परतविलें. यात महिपतीचा काहीं दुष्ट हेतु असेल असा सशयही तुळाजीला आला नाहीं.

तथापि आपणाला आपला गड सोडून एथवर तडजोडीसाठीं दातीं तृण धरून यावें लागलें, हें काहीं तुळाजीला कमी दुःखदायक नव्हतें, व त्यानें तें रात्रौ बैठकखान्यात जाताना बोलूनही दाखविलें. तडजोडीच्या वाटाघाटी खड्डूजी माणकर व जावजी गवळी यानीं मुद्दाम थोडा वेळ लाबविण्याचें कारण ते बिवलकराची वाट पाहत होते. त्यांना म्हणजे बिवलकरांच्या तोंडानें पाणी प्यावयाचें होतें असें नाहीं. पण हळकुंडासाठीं लग्न मोडावयाला नको,—आपल्या अपरोक्ष यानीं वाटाघाटी केल्या असें किल्मिष सुभेदाराच्या मनांत यावयाला नको, म्हणून ते इतके भिऊन वागत होते. शेवटीं जेव्हा तुळाजीनें ह्या चालढकलीच्या धोरणाविषयीं सशय प्रगट केला व चालढकलीचा आरोप त्या दोघावर केला, तेव्हा त्याच्या समाधानासाठीं त्यानीं रात्रौ दोन घटका रात्रीनंतरची वेळ मुक्रर केली.

बैठकीची सर्व तयारी झाल्यावर स्वतः खड्डूजी माणकर व जावजी गवळी तुळाजीच्या महालात गेले. त्याबरोबर तुळाजीनें आपल्या बसल्या जाग्यावरून उठून त्या दोघा वृद्धांचा सन्मान करीत विचारलें, "आपल्यासारख्या थोरानीं माझ्याकडे येण्याची तसदी घेतली, हें कसेंसेंच विचित्रच दिसतें. मीच आपणाकडे येणार होतों."

"नाहीं सरकार! यांत विचित्र काहीं नाहीं." खड्डूजी माणकर नम्रतापूर्वक मुजरा करून म्हणाला, "किती झालें तरी खासे ते खासे व प्यादे ते प्यादे. आपण आमच्याकडे येण्यापेक्षा आम्ही आपल्याकडे येण्यांतच आपला तसाच आमचाही गौरव आहे."

जावजी लगेच खड्डूजीचें अनुकरण करून म्हणाला, "सरकार!

आपणाला काहींही वाटलें तरी आम्हीं आमची पायरी सोडलेली नाहीं."

"पण आम्हीं आमची पायरी सोडलेली आहे ना? मीं माझें स्थान सोडल्यावर खाशाच्या नात्यानें मिरवण्याचा अधिकार तरी मला काय राहिला? सरखेली सर्व गेली, व समुद्रकाठीं ओहोटीच्या वेळीं झरत्या वाळूत उभें राहावें तशी माझी स्थिति आहे. मीं स्वतःच्या पायानें दरवेशाच्या अस्वलाप्रमाणें तुमच्या दारीं येऊन एक प्रकारें मृत्यूच्या जबड्यातच उडी घेतली आहे असें मला वाटू लागलें आहे."

"सरकार! आपल्यासारख्या धडाडीच्या वीराच्या तोंडून असे उद्‌गार! "

"मी मरणाला भीत नाहीं जावजी! पण विटबनेला भितों. सध्या माझी होणारी विटबना मला मरणापेक्षाही जास्त तापदायक वाटते. तेथें माझा काहीं इलाज नाहीं."

"पण असले अभद्र बोल बोलण्याचें आता कारणच उरलें नाहीं. आपण आज सर्वजण एकत्र जमलों आहों, ते असल्या सर्व अप्रिय गोष्टींना मूठमाती देण्यासाठीं होय." जावजी गवळी म्हणाला.

"ही मूठमाती आपणाला अगोदर देता आली नसती का?" तुळाजी म्हणाला, "मीं सलोख्यासाठीं इतके दिवस पुढें केलेला माझा हात ताटकळून मोडून तुकडा पडण्याची वेळ आली तरी दुसरा हात टाळी देण्याला पुढें आला नाहीं म्हणून ही यातायात. कारण मला एथला एकदर रागरग असा दिसतो आहे कीं टाळीसाठीं पुढें सरणारे हात एकट्या सुभेदारालाच काय ते आहेत. इतर सर्वांचे हात लुले पागळे आहेत. तुमचे आमचे हात–पेशव्याची अमदानी अशीच आहे. त्याना मरायला आणि मारायला तेवढे तुमच्या आमच्या-सारख्या लढवय्याचे हात हवे असतात, पण यशाचें उदक सोडून घ्यावयाला ब्राह्मणेतराचा हात कुचकामाचा ठरतो. तो कोणातरी सुभेदारासारख्या ब्राह्मणाचाच असला पाहिजे."

"हे आपले आततायीपणाचे उद्‌गारच आजवर आपल्या तोट्याला कारण झाले सरकार! ब्राह्मण ब्राह्मण म्हणजे तुम्ही काय समजता?

पेशव्यांची ब्राह्मणगिरी तुम्ही नका ध्यानीं घेऊ. पण त्याची लढवय्ये-गिरी व राजकारणपटुताही डोळ्याआड कसें चालेल?"

"राजकारणपटुता पेशव्याची? पेशव्याची कसली राजकारणपटुता? आयत्या बिळावरचे नागोबा—पण आज इतक्या स्पष्टपणें बोलायची सोय नाहीं. कारण आज मी गरजू आहें. गरजवताला अक्कल नसते."

"हें मात्र मी नाहीं ऐकणार." जावजी गवळी निग्रहानें उत्तरला.

"आपणदेखील नाहीं ऐकणार." खड्डूजी माणकर म्हणाला, "निदान आमच्या समोर तरी असली भाषा सरकारांनीं काढावयाला नको होती. सरकाराना काहींही वाटो, आमची तर अशी समजूत आहे कीं ऐक्याच्या दृष्टीनें आम्ही सर्वचजण एकमेकाचे गरजवत आहों. मुंबईकर इंग्रजासारखा तिसरा शत्रु आपणा सर्वांना गिळंकृत करावयाला टपून बसला आहे. त्याच्या जबड्यातून बचावण्यासाठीं आपणां सर्वांनाच एकमेकाची गरज आहे. पेशव्यानीं आंग्र्यावर जुना बठलेला वृक्ष म्हणून घाव घालण्याचें मनात आणता कामा नये, आणि आंग्र्यानींही पेशवे हें मराठशाहीवर उगवलेलें बाडगूळ अशी त्याची उपमर्दकारक हेटाळणी करूं नये."

"कसें बोललास खंड्डूबाबा! अगदीं माझ्या मनातलें?" जावजी गवळी हर्षभरित चित्तानें म्हणाला, "मी तरी तेंच म्हणतों. द्वेषानें द्वेष व गैरसमजानें गैरसमज वाढतो. मी अगदीं निःपक्षपातानें बोललों तर सरकाराना राग येईल —"

"नाहीं. राग मुळींच येणार नाहीं. खुल्या दिलानें कोणी बोललें तर त्याचा राग कशाला येईल? आणि इतकेंही करून समजा, राग आलाच, तरी मी तुमचें काय वाकडें करू शकणार आहें? —"

"हें मात्र सरकाराचें खुल्या दिलाचें बोलणें नव्हे. म्हणूनच त्याचा राग आम्हाला आला तर सरकाराच्या मापानें मोजून पाहतांही तो आमचा अन्याय ठरणार नाहीं. आमच्याकडे—निदान हा जावजी गवळी आणि हा खड्डूजी माणकर याच्याकडे तरी अशा परक्या दृष्टीनें सरकारांनीं पाहू नये. आतां आपण खुल्या दिलानें बोलावयाला

एकत्र जमलोंच आहों, म्हणून विचारतों. आमच्या ठिकाणीं जर सरकार असते तर त्यानीं अशा प्रसंगीं काय केलें असतें?"

"अशा प्रसगीं म्हणजे कशा प्रसगीं? जावजीबाबा! स्पष्ट काय तें बोल. मोघम नको."

"स्पष्टच बोलतों आहे मी. अशा प्रसगीं म्हणजे—आंग्रे आणि पेशवे यांचें आपसात वैमनस्य आलें आहे, अशा प्रसगीं."

"त्यापेक्षा माझ्या ठिकाणीं तूं असतास, अथवा हा खडूजीबाबा असता, तर तुम्हीं काय केलें असतें तें सांगा म्हणजे झालें. तुमच्या वर माझा पूर्ण विश्वास आहे."

"पूर्ण विश्वास आहे ना सरकार?" खडूजीनें विचारलें.

"देवी जगदंबेची शपथ, तुमच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे."

"मग काय, हा वाद तोडणें ब्रह्मगाठीसारखें अवघड नसून निसरगाठीसारखें सोपें आहे." जावजी खडूजीकडे पाहून पुन्हा तुळाजीकडे वळून म्हणाला, "सरकारांनीं आम्हांला एका पाव घटकेचा अवधी द्यावा."

"अवधी देणारे सरकार कोण? आजवर हें घोंगडें भिजत पडलें आहे, तें सरकाराच्या आडकाठीमुळें थोडेंच भिजत पडलें आहे?"

"तें झालें गेलें सर्व आपण विसरून जाऊं, व या क्षणीं ईश्वराला स्मरून असा निर्धार करू कीं उगवत्या सूर्यनारायणाला आमच्या सभोंवारचें सर्व राजकीय वातावरण अगदीं निर्मळ—अगदीं निरभ्र दिसलें पाहिजे." असें म्हणून रावजी खंडूजीच्या हातांत हात घालून तेथून लगेच उठला, व दोघेही बाहेर जाऊं लागले.

"तुमच्या तोंडात साखर पडो! तुमची तर एवढीच मनीषा आहे. पण मी तर तुमच्या धीरावर अशी प्रतिज्ञा करतों कीं तडजोड करण्यासाठीं हा तुळाजी आंग्रे मुद्दाम आपलें ठाणें सोडून एथवर आला आहे, तो तडजोड झाल्याखेरीज—ह्या गडाचें 'यशवतगड' हें नांव सार्थ झाल्याखेरीज ह्या गडावर अन्नग्रहण करणार नाहीं."

जावजी गवळी व खडूजी माणकर हे दोघेही खासगी विचार-

विनिमयासाठीं जरा बाजूला गेले, व तुळाजी हें समुद्रांत लोटलेलें तारू बुडणार कीं किनाऱ्याला लागणार याचा एकट्याशींच विचार करीत उभा होता. इतक्यांत हुजऱ्यानें अभिवादनपूर्वक येऊन त्याला वर्दी दिली, "धोंडजी शिंदे सरखेलाची भेट घेऊ इच्छितो."

धोंडजीचें नाव कानीं पडताच तुळाजीचें चित्त अत्यत अस्थिर झालें. त्यानेंच धोंडजीला मानाजी आंग्र्याकडे एकोप्याची खटपट करण्याला पाठविलें होतें. त्या त्याच्या खटपटीला यश येईल अशी जरी तुळाजीला खात्री वाटत होती, तरी 'न जाणो! मानाजीनें जुन्या आगळिकी ध्यानीं घेऊन एकोपा करण्याचें नाकारलें तर!' हें भयही त्याला होतेंच. यांपैकीं आता कोणती वार्ता ऐकण्याचें आपल्या वांट्याला येणार याविषयीं तुळाजीला कोणत्याच प्रकारची खात्री वाटत नसल्यानें त्याच्या चित्तीं अस्वस्थता उत्पन्न झाली होती. त्यानें तावडतोब धोंडजीची भेट घेण्याचें ठरवून हुजऱ्याला आज्ञा केली, "जा. तावडतोब धोंडजीला इकडे पाठवून दे."

हुजऱ्या गेला, व त्याच्या पाठोपाठ धोंडजी तेथें येऊन पोहोंचला. त्यानें प्रफुल्ल वृत्तीनें मुजरा केलेला पाहतांच तुळाजीला पुष्कळच धीर आला–पुष्कळच आशा वाटू लागली.

"काम फत्ते?" तुळाजीनें हसतमुखानें प्रश्न केला.

"काम फत्ते." धोंडजी नम्रतापूर्वक उत्तरला, "सरकारनीं आम्र फलावर नेम धरून धोंडा फेंकला आणि तो नेम लागू पडला नाहीं असें कसें होईल? सरकाराची पुण्यायीच तशी जबर आहे."

बोलतां बोलता धोंडजीनें आपल्याच नावावर कोटी केली, व स्वतःकडे लहानपणा पत्करून स्वामिगौरव केला, तो ऐकून तुळाजीला इतका संतोष वाटला कीं, त्या भरात त्यानें धोंडजीला प्रेमभरानें कडकडून मिठी मारून म्हटलें, "धन्य तू धोंडजी! तुझ्यासारखे मूठभर तरी स्वामिनिष्ठ माझ्या पदरीं असते, तरी मीं सारा हिंदुस्थान पादाक्रांत केला असता, आणि स्वार्थलोलुप, मतलबी, पाताळयंत्री पेशव्यांच्या पगडीचा तुरा व मुंबईकराची टोपी या दोहोंनाही धुळी-

चा शेंदूर चारला असता. पण कालगति कशी विचित्र आहे पाहा! तुझ्यासारखे एका काळचे माझे कट्टे प्रतिस्पर्धी आज माझ्या जिवाचे जिवलग बनून तळहातावर शीर घेऊन माझ्यासाठीं परिस्थितीशीं झगडत आहेत, आणि माझे माझे म्हणून मी ज्याना आजवर भोळ्या भावानें हृदयाशीं कवटाळलें, तेच कुऱ्हाडीचे दांडे गोताला काळ होऊन बसले आहेत. बरें, मानाजीबाबाकडची काय खबर?"

"वजारतमाबाच्या सहानुभूतीविषयीं आपणाला लवमात्र चिंता अथवा संशय नको सरकार! त्याची स्वतःच्या पदरीं थोडासा कमी-पणा पत्करूनही आपणाशीं सलोख्यानें वागून दौलत आबादीआबाद राखण्याला तयारी आहे. ते आपली भेट घेण्यासाठीं इतके अधीर झाले आहेत कीं—"

"मग त्याना एथवर येण्याला कमीपणा का वाटला?"

"कोण म्हणतें त्याना कमीपणा वाटला? ते कालच कुलाब्याहून इकडे यावयाला निघाले असतील. मात्र आपला मुक्काम इथें असल्याचें त्याना माहीत नसल्याने ते परस्पर विजयदुर्गावर जाण्याचा संभव आहे मीदेखील तिकडे जाऊन आलों. आता त्याना आपला मुक्काम इथें असल्याचें कळविण्याची कांहीं सोय जहाज पाठवून करता येईल, तर फार बरें होईल."

मानवी स्वभावाची काय मौज आहे! कांहीं क्षणापूर्वी तुळाजीला जो मानापमान आठवला होता, त्याचा त्याला एका क्षणात विसर पडला, व आपणच मानाजीच्या भेटीला जाऊन त्याला वडीलपणाचा मान देऊन त्याचा गौरव करणें इष्ट आहे असें त्याला वाटू लागलें. तो म्हणाला, "आपणच आणखी अमळशानें एथली कामगिरी आटोपून तिकडे जाऊ. म्हणजे मानाजीबाबा निघाले असले तर मार्गांत भेटतीलच, अथवा आपण त्याना जाऊन भेटू आजचा दिवस एकूण शुभदिवस आहे म्हणावयाचा. इतक्या वर्षाच्या सर्वच कटकटींचा आज एकदम समाधानकारक निकाल लागण्याचा रंग दिसतो आहे. ज्या अर्थी मानाजीबाबानीं मनाचा इतका थोरपणा

दाखविला आहे, त्या अर्थी त्यांच्याच हस्तें वडीलपणाच्या नात्यान तडजोड होणें इष्ट आहे. आणि आमच्या प्रतिस्पर्धी मडळीलाही तडजोड माझ्याशीं करण्यापेक्षा त्याच्याशीं करणें जास्त आवडेल."

"सरकाराची ही योजना काहीं वाईट नाहीं. पण मला असें वाटतें कीं अगोदर आपण सर्व वाटाघाटी करून मगच वजारतमाबाना इरेला घालावें. न जाणो! वाटाघाटी करण्याचा प्रसग त्याच्यावर आला, तर दरम्यान् कोणी त्याच्या कानात विप ओतून सारा व्यूह ढासळून टाकणार नाहीं कशावरून?"

"असा सशय तुला का आला? अगोदर साग."

"का आला.–आता स्पष्ट सागू? मला सरकाराच्या अस्थानीं आपलेपणाचें भय वाटतें सरकारानीं एखाद्याला आपला म्हटलें कीं तें इतक्या मर्यादेपावेतों कीं, त्या अस्तनींतल्या निखाऱ्यानें अस्तनी जाळून आगाला चटका दिला तरी हाय म्हणून म्हणावयाचें नाहीं. इतके जे सरकाराच्या गळ्यातले ताईत, त्याच्याविषयीं माझ्यासारख्यानें उणें दुणें बोलावें तरी कसे? पण सरकार! विजयदुर्गात आपल्या सभोंवार वावरणाऱ्या माणसाविषयीं मला दाट सशय आहे. आपल्यावरचें सकट लौकर दूर व्हावें म्हणून झटणारींच जर सारीं माणसें आपल्या सभोंवार असतीं, तर आजवर अशी ससेहोलपट होत आहे ती होतीच ना. एरव्हीं मला सशय आला नसता. मी देखील कालपावेतों असेंच समजत होतों कीं सरकाराच्या सभोंवारचीं सारीं माणसें सरकाराच्या जिवाला जीव देणारीं आहेत. पण काल मात्र माझा तो समज साफ पालटला. इतक्या महत्त्वाच्या व निकडीच्या कामगिरीवर मी गडावर गेलों असताना यजेश्वरशास्त्री काय, आनदराव सुर्वे काय किंवा आपले मेहुणे काय, कोणींही आपल्या मुक्कामाचा थागपत्ताही मला लागू देऊ नये म्हणजे काय गोष्ट आहे? मला त्यानीं आपण रत्नागिरीला गेला असें सागितलें रत्नागिरीकडे वळताना तिथल्या तिथेंच मला आपण इथें आल्याचें कळलें म्हणून बरें. नाहींपेक्षा केवढी बरें चुकामूक झाली असती!"

"यज्ञेश्वरशास्त्री आणि आनदराव या दोघांनींही असें सांगितलें ?"

"होय. आनदराव पहिल्या प्रतीचा स्वदेशद्रोही व विश्वासघातकी असल्याचें मला कर्नाळयाच्या वेळ्यापासून माहीत आहे. पण यज्ञेश्वरशास्त्रीदेखील त्याच माळेचा मणि आहे, हें मला कालपावेतों माहीत नव्हतें. सरकाराना माझे हे बोल कडू वाटतील. पण मला परमेश्वराला स्मरून स्वतःला काय वाटतें तें सरकाराच्या पायापाशीं निवेदन केल्याखेरीज राहवत नाहीं."

धोंडजीनें यज्ञेश्वरशास्त्री वगैरे मंडळीविषयीं कडू बोल बोलतांच तुळाजीला सताप आला. पण मानाजीकडचें कार्य धोंडजीने सफल करण्याच्या रगाला आणल्यामुळें ते सफल होईतों व एकदर सकटाचा परिहार होईतों त्याला नवीन शत्रु आपल्या सभोंवार निर्माण करावयाचे नव्हते. त्यानें आपल्या मतें धोंडजीची समजूत करण्याचा प्रयत्न केला. "तुझ्यावर त्या मडळीचा अजून तितकासा विश्वास नसेल. तुला ते अजून शत्रुपक्षाचा म्हणूनच ओळखीत असतील."

"किंवा त्यांचे शत्रुपक्षाच्या वतीनें चाललेले डावपेंच मी ओळखीन असें भय त्यांना वाटलें असेल." धोंडजी निस्पृहतेनें म्हणाला.

"असें म्हणण्याला तुझ्यापाशीं काय पुरावा आहे ?"

"अट्टल चोर असतात ते आपला चोरटेपणा उघडकीला येईल असा पुरावा मागें ठेवून थोडीच चोरी करीत असतात !"

तुळाजी काहींसा रागानें उद्गारला, "बरें आहे. त्याची चौकशी मी करीन. तुला त्याची इतकी चिंता बाळगण्याचें तूर्त काहीं कारण नाहीं. तुम्ही सारे एकाच धन्याचे सेवक, तुम्हीं आपापलें काम दुसऱ्याच्या कारभारात ढवळाढवळ न करता पार पाडलें म्हणजे पुष्कळ झालें. बरें, आणखी काहीं खबर ?"

धोंडजीला धन्याची ती किंचित् बेपर्वाईची वृत्ति पाहून वाईट वाटलें खरें. पण उपयोग काय ? स्वामिभक्तीचें व्रत मोडू नये म्हणून त्यानें मूग गिळल्याप्रमाणें तो अपमान गिळला, व श्रीपति गवळी वगैरे तिघेजण कैद करून विजयदुर्गावर आणून ठेवल्याचें सांगितलें.

"हळू! जरा हळू!" श्रीपतीचा उल्लेख ऐकून तुळाजी हलकेंच म्हणाला, "बोललास तें बोललास, पुन्हा इथें त्याचा उच्चारही करू नकोस. जावजी गवळी इथें आहे, हें तुला माहीत आहेना?"

"पण सरकार! माझ्या हातून ती चूक झाली असें आपण म्हणणार नाहीं ना?" धोंडजीनें दीनवाणीनें विचारलें.

"नाहीं. तुझा त्यात कांहींच अपराध नाहीं. मी आतां विजय दुर्गावर गेल्यावर नीट चौकशी करून अपराध्यांची सुटका करीन. तू आतां जरा बाहेर जा कसा! आणि एक कामगिरी कर. आज इथें सुभेदार येण्याचा रग आहे. आम्ही वाटाघाटींत गुतलेले असू; तेवढ्यांत जर ते येत असल्याचा अथवा असाच आणखी कांहीं सुगावा लागला तर मला कळव."

धोंडजी तुळाजीला मुजरा करून बाहेर गेला, तेवढ्यांत जावजी गवळी आणि खड्डूजी माणकर हे दोघे आंत आले.

## प्रकरण अठरावे

# तुरुंगाकडे

बाबाजी धुळपाला जागच्या जागीं ठार करून आनदराव, यज्ञेश्वर-शास्त्री व सुजनसिंग हें त्रिकूट श्रीपति वगैरे कैदी तेथें ठेवण्यात आले होते त्या तुरुगाच्या कोठड्याकडे गेले, तेव्हा जातानाच त्याचें आपसात ठरलें होतें कीं अगदीं प्रथम श्रीपति गवळयाला बाजूला काढून घ्यावयाचा, व मग दुल्लभजी माने आणि रुद्राजी धुळप याची चौकशी करावयाची.

त्याप्रमाणें तें त्रिकूट त्या तुरुगाच्या कोठड्यापाशीं गेलें. तेथें जाताच यज्ञेश्वरशास्त्री सर्वांच्या पुढें होऊन दुल्लभजी व रुद्राजी यांच्या कडे पाहत श्रीपतीला म्हणाला, "श्रीपतराव! तुम्ही ह्या दोघां फितुराच्या नादीं लागला, म्हणून तुमच्या वाट्याला कैद आली. पण सुदैवानें आम्ही इथें आहों, काहीं हरकत नाहीं. आम्ही तुमची मुक्तता करण्यासाठीं आलों आहों तुमच्यासाठीं यापेक्षा केवढी तरी मोठी कामगिरी वाट पाहात बसली आहे."

"कोणती कामगिरी?" श्रीपतीनें विचारलें.

"आमच्याबरोबर जरा बाहेर चला, म्हणजे सागतों." यज्ञेश्वर-शास्त्री म्हणाला.

तोंच दुल्लभजी यज्ञेश्वरशास्त्राकडे वळून एकदम रागानें म्हणाला, "भटजी! आमचें नाव घेऊन उच्चारलेला अपशब्द मुकाट्यानें मागें घ्या." रुद्राजीही तसाच रागावला. यजेश्वरशास्त्री त्या दोघांच्या क्रुद्ध मुद्राकडे पाहून मनातल्या मनात चरकला. आनदराव व सुजनसिंग तेथें उभे नसते, तर त्याच्या सर्वांगाला भीतीनें कापरेंच भरलें असतें.

"का शब्द मागें घ्या?" सुजनसिंगानें रागारागानें पुढें होऊन विचारलें.

"धनी ! तुम्हीदेखील याची कड घेता ?—आम्ही फितूर काय ?" रुद्राजीनें विचारलें.

"होय." आनदराव मध्येंच उत्तरला.

"तुझें बरोबर आहे. तू आपल्यावरून जग ओळखणार. आता ह्या वेषात आग्न्याची दौलत बुडविण्याच्या कामगिरीवर तुझी योजना झाली आहे वाटतें !" दुल्लभजी सुजनसिंगावर दातओंठ खात म्हणाला.

"माझी नेमणूक तुमचा न्याय करण्याच्या कामगिरीवर झाली आहे." असें म्हणून आनदरावानें मदोन्मत्तपणानें आपल्या हातातील तरवार एकदम दुल्लभजीच्या छातींत खुपसली. त्यासरसा दुल्लभजी विव्हळत खालीं पडला. रुद्राजी ती क्रूरतेची परमावधि पाहून एकदम चवताळून आनदरावावर धावला. तेव्हा सुजनसिंगानें हातातील तरवारीनें एका क्षणात त्याचाही बळी घेतला.

"याचा अर्थ काय ?" श्रीपतीनें निधड्या छातीनें पुढें होऊन आनदरावाचें मनगट पकडून विचारले, "या दोघाना का म्हणून ठार केले ?"

"हा प्रश्न तुम्हीं-जावजीबाबाच्या चिरंजिवानीं आम्हाला विचारावा ? श्रीपतराव ! हीं माणसें सरखेलाच्या विश्वासांतलीं होतीं, हें तुम्हाला माहीत नाहीं का ?"

"म्हणून तुम्ही त्याना ठार केलें ?" श्रीपतीनें प्रश्न केला.

"होय." सुजनसिंग व आनदराव एकदम उत्तरले.

"मग तुम्ही कोण ?" श्रीपतीनें भुवया चढवीत विचारलें.

"आम्ही तुमची अशा अवेळीं मुक्तता करण्याला आलों आहों, यावरून तुम्हीच ओळखा." यज्ञेश्वरशास्त्री म्हणाला.

"तुम्ही खरोखरच सरखेलाच्या बाजूचे आहा, असा या क्षणापावेतों माझा समज आहे. मी त्याबद्दल तुम्हाला मुळींच दोष देत नाहीं." तो सुजनसिगाकडे बोट दाखवून म्हणाला, "याच्याविषयीं तर शंका घेण्याचेंच कारण नाहीं. हे सरखेलांचे मेहुणेच आहेत- पण तुम्हालाही दोष देण्याला मला तोंड नाहीं. यदाकदाचित् माझी आणि

सुभेदाराची भेट झालीच नसती, त्याचे देशद्रोहीपणाचे डावपेंच मला कळलेच नसते, तर मी आजवर फसत आलों तसाच पुढेंही फसलों असतों. पण आता परमेश्वरानें माझे डोळे चागलेच उघडले आहेत. सुभेदार आधळ्या स्वामिभक्तीनें प्रेरित होऊन श्रीमत पेशव्यांच्या वतीनें आंग्र्याच्या पारिपत्याला उभा राहिला आहे हें निव्वळ नाटक आहे. तो इग्रजाना फितूर आहे. आता मला तुम्ही सागा, असल्या फितुराला आपण साह्य करावयाचें काय?"

त्या तिघापैकीं कोणी काहींच बोलेना. तिघेही आश्चर्यपूर्वक एकमेकाच्या तोंडाकडे टकमक पाहत उभे होते.

"असे एकमेकांच्या तोंडाकडे काय पहाता? मी बोललों ते स्वानुभवाचे बोल बोललों आहें. तुम्ही दुळभजी व रुद्राजी याना ठार करण्यांत मोठाच अपराध केला आहे. ते सरखेलाचे एका काळचे डावे उजवे हात होते—"

"म्हणूनच ते हात आम्हीं तोडले." आनदराव म्हणाला.

"म्हणजे? या उप्परही तुम्हाला सरखेलाशीं दावेदारीच करावयाची आहे काय?" श्रीपतीनें विचारलें.

"आम्हाला श्रीमत पेशव्यांची सेवा करावयाची आहे." आनदराव उत्तरला.

"पेशवे काल नव्हते, व परवां असतील याचाही भरवसा नाहीं. ते उपरे. असल्या आंधळ्या व्यक्तिनिष्ठेपेक्षां देशनिष्ठा श्रेष्ठ होय असें तुम्हांला वाटत नाहीं काय?" श्रीपतीनें प्रश्न केला.

"स्वामिद्रोही माणूस देशनिष्ठ कसा होऊ शकेल?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें प्रश्न केला.

"का?" श्रीपति म्हणाला, "स्वामि स्वजनद्रोह करूं शकतो. राजा प्रजाद्रोही निपजतो. पुढारी अनुयायांना तोंडघशीं पाडू शकतो. पण देश कधींच आपल्या लेंकरांशीं बेइमान होत नाहीं."

"तुमचा रोंख कोणावर आहे तेंच मला कळत नाहीं. पेशव्यांवर तुमचा दांत आहे काय?" यज्ञेश्वरशास्त्री म्हणाला.

"नाहीं.—पण नाहीं तरी कां? तसें पाहू जातां पेशव्यावरही थोडा-फार दात ठेवण्यासारखी परिस्थिति आज उत्पन्न झाली आहे खरी."

"ती कशी काय?" आनदरावानें विचारलें.

"आजची एथली परिस्थिति अशी आहे की पेशवे राहिले पुण्याला आणि इथें त्याचे प्रतिनिधि म्हणून सुभेदार बिवलकर मात्र सगळीकडे सावळागोंधळ माजवून बसले आहेत. सुभेदाराच्या देशद्रोहीपणा-बद्दल भरपूर पुरावा माझ्यापाशीं आहे—"

"कुठें आहे दाखवा?"

"तो यावेळीं माझ्या हातीं नाहीं. पण तो ज्याचा त्यांच्याकडे रवाना झाला आहे." असें म्हणून श्रीपतीनें ठाण्याला कौपिनेश्वराच्या देवालयात घडलेला सारा प्रकार त्या तिघानाही निवेदन केला, व मग विचारलें, "आता सागा, सुभेदार देशद्रोही आणि स्वामिद्रोहीही आहे कीं नाहीं? अशा आणिबाणीच्या वेळीं आपण सरखेलांना निष्ठापूर्वक साह्य करणें हेंच आपलें कर्तव्य आहे."

इतके उदार मनाचे तुम्ही होता तर धोंडजी शिंद्यानें तुम्हांला कैद कां म्हणून केलें?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें नाखुषीच्या स्वरात विचारलें.

"धोंडजीला वाटलें असेल कीं जसा बाप तसाच बेटा. मींही त्याला मुद्दामच माझ्या विचारांचा थांगपत्ता लागू दिला नाहीं. कारण मला तातडीनें सरखेलाची भेट घ्यावयाचीच होती, व त्याचा पत्ता मला नीट माहीत नव्हता. शिवाय सुभेदाराचा माझ्यावरचा विश्वास साफ उडून गेल्यामुळें तोही परस्पर माझा नाश करण्यासाठीं टपून बसला असेल."

"एकूण जावजीबाबाच्या विरुद्ध सरखेलांचा कैवार घेऊन तुम्हांला यापुढें वागावयाचें आहे तर?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें विचारलें.

"अर्थात्! पण बाबाच्यावर तुम्हीं आतां जो आरोप केला, तो मात्र वृथा आहे. जसा मी देशद्रोही होऊं इच्छीत नाहीं, तसेच माझे बाबाही देशद्रोह करू धजतील असें मला वाटत नाहीं. माझी खात्री आहे कीं एकंदर परिस्थिति त्याना समजल्यावर ते माझ्याच मार्गावर

येतील, व सुभेदाराचा पक्ष सोडून सरखेलाचे अनुयायी होतील. आणि तुम्ही तरी सुभेदार इंग्रजाचा फितूर आहे हे कळल्यावरदेखील त्याचाच पक्ष संभाळून रहाणार काय?"

"आमचें आम्ही पाहून घेऊ. पण तुम्हाला आम्ही आतां मोकळे सोडू इच्छीत नाहीं." आनदराव सुजनसिंगाकडे पाहत म्हणाला.

"नका सोडू. माझीही तशी इच्छा नाहीं. मीं कुठें तुम्हांला तशी विनवणी केली? बधमुक्त होऊन तरी मला सरखेलाचीच भेट घ्यावयाची, ती बदिवासात असल्यानेंच लौकर होईल. ते जो न्याय करतील तो मला मान्य आहे मी तुझा कैदी नाहीं, सरखेलाचा कैदी आहें."

"पण सरखेल तरी तुमच्यावर विश्वास ठेवतील का? आमची अशी पूर्ण खात्री आहे कीं सरखेल पहिल्या सपाट्याला तुमचा शिरच्छेद करतील."

"तशी इच्छा त्याना झाली तर तें देशाचें दुर्दैव!"

"पण खुळ्या माणसा! देशाच्या दुर्दैवापूर्वी तुझें मरण तुझ्यासमोर उभें राहील त्याची वाट काय?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें विचारलें.

त्याचाच अनुवाद करून आनदराव म्हणाला, "हो! आणि इतक्या उतार वयात जावजीबाबाना पुत्रशोक व्हावयाचा! परवाच ते ही भानगड मिटल्यावर लौकरच सूनमुख पाहणार असे सागत होते.

एकाहून एकाचे बेदरकारपणाचे बोल ऐकून श्रीपतीच्या सर्वांगाचा मानखंडनेमुळें व सतापामुळें नुसता भडका उडू लागला. नेमकी तेव्हाच मशालजीच्या हातातील तेवती मशाल मिणमिणू लागली. तिला अनुलक्षून श्रीपति म्हणाला, "पाहा—पाहा! तुमची एकाहून एक भयकर कृष्णकारस्थानें ओळखून ह्या मशालीलाही लाजेनें तोंड लपवावेंसें वाटलें. पिंजऱ्यात सापडलेल्या वाघाला खडे मारण्यासारखा भ्याडपणा तुम्हीं एकाहून एक वरचढ चालविला आहे. तुमची मला कींव येते. भ्याडानो, मरणाचें भय कोणाला घालता, मला? देशासाठीं, व देशोद्धारार्थ झटणाऱ्या धन्यासाठीं एकदा सोडून हजारदां मरण्याला स्वखुषीनें तयार असणाऱ्या ह्या श्रीपति गवळ्याला तुम्हीं

ह्या वाकुल्या दाखविता काय? आता मी तुमच्या तावडींत सांपडलों आहें खरा. पण ध्यानात ठेघा, ह्या श्रीपति गवळ्याच्या नखाला तरी धक्का लागला, तर जावजी गवळ्याशीं गाठ आहे.—"

श्रीपति आणखीही पुष्कळच तोडून बोलला असता. पण तेवढ्यांत यज्ञेश्वरशास्त्री, आनदराव व सुजनसिंग याचा आपसात कांहीतरी नेत्रसंकेत झाला. त्याबरोबर आनदरावानें कोठडीचा दरवाजा लगेच बद करून घेतला, व लगेच तिघेही माघारे वळले.

"हा मोठाच पेंच येऊन पडला आहे " अमळ दूर जाताच यज्ञेश्वरशास्त्री आपल्या दोघा साथीदाराकडे पाहून म्हणाला, "ह्याला ठार करावें, की यशवतगडावर जावजीकडे नीट बदोबस्तानें पाठवून द्यावें, कीं इथेंच कैदेंत ठेवावें, काय करावें हेंच सुचत नाहीं."

"मला वाटतें, या बाबतींत जिजाबाई आईसाहेबांची समति घ्यावी. म्हणजे आपल्या शिरावरची जबाबदारी तेवढीच कमी झाली." आनदराव सुजनसिगाकडे वळून म्हणाला, "मामासाहेब! आपलें काय मत?"

गुळाच्या गणपतीला गुळाचा नैवेद्य! सुजनसिगानें लगेच मान डोलविली

"मग आपण एक करा ना! आमच्या पुढें जाऊन आईसाहेबाना एवढें विचारून घ्या. तोंवर आम्ही आलोंच. तुमच्याबरोबर येत नाहीं, कारण त्याना एकट्या तुमच्याशी व तुम्हाला त्याच्याशीं मन मोकळेपणानें बोलता येईल." यज्ञेश्वरशास्त्र्यानें आपलें मत दिलें.

अशीं कोणीं वर वर तोंडाला मोठेपणाचीं पानें पुसलीं, तरी तेवढ्यानें हुरळून जाण्याची सुजनसिंगाला सवयच होती तो लगेच एकटाच पुढें खाशा स्वारीच्या महालाकडे निघून गेला.

"सागा, आता काय करावयाचें?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें आनदरावाला म्हटलें, "खासगी बोलता यावें यास्तव ती ब्याद मीं पुढें घालविली."

"मींदेखील तेवढ्यासाठीं ती युक्ति शोधून काढली." आनदराव

म्हणाला, "श्रीपति सरखेलाना फितूर झाला आहे हें तर निश्चित. पण अडचण अशी आहे की त्याला फितूर म्हणावयाचीही चोरी! न जाणो! जावजीबाबा बिथरला तर? तो आमच्या बाजूचा खरा, पण आमच्यापेक्षा त्याला पुत्र जवळचा वाटणारच. अर्थात् श्रीपतीला तर मारता येतच नाहीं.–निदान आज तरी!"

"पण आपला मुलगा सरखेलाना फितूर आहे असें कळल्यावर-देखील जावजीबाबा त्याचा कैवार घेईल?"

"नाहीं घेणार, असें क्षणभर गृहित धरले तरी, तो फितूर आहे अशी आपण जावजीबाबाची खात्री कशी पटवून देणार? हा जळता निखारा इथें आपल्या पदरीं नको तो फेंकून तरी दिला पाहिजे किंवा विझवून तरी टाकला पाहिजे मला वाटतें, उत्तम मार्ग म्हणजे आपण त्याला नीट बदोबस्तानें जावजीबाबाकडे पाठवावें, व त्याना खरा प्रकार कळवावा."

बोलत बोलत ते दोघे महालापाशीं जाऊन पोहोंचतात, तों त्या पूर्वींच सुजनसिंग व जिजाबाई यांचें संभाषण होऊन श्रीपतीला शासन करण्याचा विचार नक्की झाला होता श्रीपतीचें नाव ऐकताच लक्ष्मीला आपण होऊन त्या विषयात तोंड घालावेसें वाटलें. तिनें जिजाबाईला दुजोरा दिला, "बाईसाहेब! त्या नीचाला नुसतें शासनच काय पण देहान्त शासन दिलें पाहिजे. मला आपण मोकळीक द्याल, तर मी माझ्या हातानें त्याला ठार करीन व माझ्या बाबाच्या खुनाचा सूड त्याच्यावर घेईन"

"अग! पण तो तुझा वाग्दत्त पति ना?" जिजाबाईनें मुद्दाम हसन विचारलें. तिला श्रीपति व लक्ष्मी याचा वाङ्निश्चय झाल्याचें माहीत होतें.

"तो वाङ्निश्चय सपला आता वैर–हाडवैर तेवढें बाकी उरलें आहे" लक्ष्मी सतापानें उत्तरली

तोंच यजेश्वरशास्त्री व आनदराव तिथें येऊन पोहोंचले. तेव्हा लक्ष्मी तिथें होतीच,

"ही कोण?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें सकृद्दर्शनीच विचारलें.

जिजाबाईनें लक्ष्मीचा वृत्तान्त त्या मंडळीला निवेदन करून तिनें आणलेला लखोटा न उघडताच जसाचा तसा यज्ञेश्वरशास्त्र्याच्या हातीं देऊन म्हटलें, "तुमचीच वाट पाहत होत्यें मी. हा खलिता पाहा, आणि याचा काय तो विचार करा."

' नाहीं—नाहीं. तो सरखेलाखेरीज दुसऱ्या कोणींही उघडायचा नाहीं सरखेलाच्या पायाची शपथ आहे तुम्हाला. सरखेल कुठें आहेत सांगा."

"सरखेल देवगडीं सध्या असावे." यज्ञेश्वरशास्त्री एकवार त्या लखोट्याकडे व लगेच लक्ष्मीकडे न्याहाळून पाहत म्हणाला.

जिजाबाईनें लगेच लक्ष्मीकडे पाहिलें, व लक्ष्मीनें तिच्याकडे पाहिलें दोघींच्याही नजरा कावऱ्याबावऱ्या होत्या. पण त्याचा अर्थ त्या दोघींनाच कळला. जिजाबाई नुक्तीच सरखेल यशवंतगडाकडे गेल्याचें लक्ष्मीला सांगून मोकळी झाली होती. यज्ञेश्वरशास्त्र्यानें देवगडाकडे बोट दाखविलें, त्यावरून खरा पत्ता लक्ष्मीला सांगावयाला नको होता हें तिच्या ध्यानीं आलें. तिनें आपली व इतरांची ढासळती बाजू सावरून धरण्यासाठीं आपल्या पहिल्या भाषणावर नव्या भाषणाचें सारवण घातलें, "ते चार दिवसांनीं देवगडावर जावयाचे होते ना?"

"होय." यज्ञेश्वरशास्त्री म्हणाला, "पण त्यांना धाकट्या बाईसाहेब देवगडावर असतांना मागें थोडेंच करमतें! तुम्हांला सारें माहीत आहेच."

"तर मग मी देवगडीं जाऊन त्यांना भेटेन." लक्ष्मी म्हणाली, "मीं जी त्यांची एवढी मोठी कामगिरी केली आहे, तिच्याबद्दल मला त्यांच्या पायापाशीं एक मागणें मागावयाचें आहे." ती जिजाबाईकडे वळून म्हणाली, "आपणाला माहीत आहेच मला काय मागणें मागावयाचें आहे तें."

"होय." जिजाबाई उत्तरली.

"तें काय आणखी?" आनंदरावानें विचारलें.

"श्रीपतीनें तिच्या बापाचा खून केला आहे.—"

"त्या खुनी चाडाळाला ठार करून माझ्या बाबाच्या खुनाचा सूड त्याच्यावर उगवल्याखेरीज मी स्वस्थ बसणार नाहीं, अशी माझी प्रतिज्ञा आहे." लक्ष्मी आवेशानें उत्तरली, "तेवढ्यासाठीं तर ही दुखावलेली नागीण शेंपन्नास कोसावरून फुत्कारत एथवर आली. अनायासें आज माझा वैरी तुमच्या हातीं सापडला आहे. त्याला ठार करायचें धैर्य तुम्हाला जर होत नाहीं, तर मला सरखेलापाशींच जाऊन दाद मागितली पाहिजे मला देवगडी जाणारी एखादी सोबत मिळेल का?"

"बरें, तें असो." असें दुर्लक्ष्य करून, व तो लखोटा लक्ष्मी परत मागत असता तो तावडतोब सरखेलाकडे परस्पर पाठविण्याच्या सबबीवर देण्याचें नाकारून यज्ञेश्वरशास्त्र्यानें सुजनसिंगाला जरा बाजूला घेतलें. बाजूच्या दिवाणखान्यात त्याचें सभाषण थोडा वेळ चाललें होतें बोलता बोलता यज्ञेश्वरशास्त्र्यानें दुल्लभजी माने व रुद्राजी धुळप याच्या हत्येचा प्रश्न काढला. तेव्हा सुजनसिंग त्याच्या तोंडावर हात ठेवून हळूच म्हणाला, "हळू बोला इथें त्या दोघाचे नाव देखील उच्चारू नका पुन्हा माझीही अशीच फसगत झाली मी त्याची नावें घेऊन चुकलों, आणि लगेच मला कळून आलें की लक्ष्मी ही दुल्लभजीची बहीण! आणि तिची बहीण रुद्राजी धुळपाच्या भावाला—कर्णाजीला दिली होती! तेव्हा मी कसेबसे माझे शद्ब सावरून घेतले."

"असा प्रकार आहे काय? मग मोठी पचाईतच आहे म्हणायाची! पण ही मुलगी इकडे खरोखर आली तरी कशासाठीं?" यज्ञेश्वरशास्त्र्याने हलकेच प्रश्न केला.

"तिनें सागितलें ना, त्यात काहीं लबाडी नाहीं. स्वामिभक्तीचें व स्वदेशप्रीतीचें वारें कानात शिरून अनेक भावनाप्रधान तरुणतरुणी वेडीं होतात, त्यांतलीच ती एक आहे. सरखेलावर तिचा सारा भरवसा आहे तिचा पिता—तो गणोजी माने पूर्वी सरखेलाच्या पदरीं नोकरीला होता म्हणे, व मान्याच्या कुटुबातील अनेक मडळी आजवर

आंग्र्याच्या दौलतीच्या रक्षणाच्या कामीं बळी पडलीं आहेत आता वेळ अशी चमत्कारिक आहे पाहा! ही पोरगी इतकी तरुण व सुदर, व सरखेलाचा स्वभाव पडला रगेल. तिची त्याची गाठ पडली तर—त्याच्ना काय नेम! जिजाबाईसाहेबांचें पाप पुन्हा उभें राह्यचें! असल्या व्यादी जेवढ्या म्हणून उपस्थित होतील, तितक्या मुकाटपणें देवगडीं पाठविणेंच सुरक्षितपणाचें आहे सध्याच्या आणीबाणीच्या प्रसगीं आमच्या मसलतींत खो घालू पाहणाऱ्या सर्वांना दूर डाबून ठेवण्यासाठीं देवगड हें ठिकाण फार सोईचें आहे. मला वाटतें, आपण श्रीपतीलाही तूर्त देवगडावरच सुरक्षितपणें पाठवावें, व इकडे बोभाटा मात्र जावजीबाबाकडे त्याला पाठविल्याचा करावा. पाहिजे तर आपण खाजगी रीतीनें जावजीबाबाना हा प्रकार कळवू."

"आणि कोणाला कांहींच न कळविता तूर्त स्वस्थ बसलों तर काय वाईट?" यज्ञेश्वरशास्त्र्यानें मध्येंच विचारलें.

"तरीही काहीं हरकत नाहीं उगाच आपण होऊन खाजवून खरूज काढा कशाला?" सुजनसिंगानें दुजोरा दिला.

जिजाबाई व लक्ष्मी ज्या दिवाणखान्यात बसल्या होत्या, त्याला लागून असलेल्या दिवाणखान्यातच त्या तीन धूर्तांची मसलत चालली होती. त्या दोन दिवाणखान्याच्या मध्यभागीं भिंतींत दरवाजा असून तो किनखापी पडद्यानीं आच्छादिलेला असल्यानें इकडचीं माणसें तिकडे व तिकडचीं इकडे जरी दिसत नव्हतीं, तरी सभाषण एकमेकाचें एकमेकाना जरा लक्ष्यपूर्वक ऐकताना सहज ऐकता येण्याजोगें होतें. लक्ष्मीला त्या तिघाविषयीं प्रथमपासूनच सशय असल्यानें, ती जरी जणू काय आपण त्या गावचीच नाहीं असें भासविण्यासाठीं तिकडे दुर्लक्ष्य केल्यासारखी मधून मधून जिजाबाईशीं एखादा शब्द बोलत होती, तरी तिचे कान त्या तिघाचें सभाषण आड्न ऐकण्यासाठीं ओंशाळून राहिले होते. त्यांची मसलत तिला जरी नुसती ओझरती ऐकू गेली, तरी तेवढ्यावरून तिला कळून चुकलें कीं तिथें सारा चोर—हरामखोर—दगलबाजाचा अगदीं बुजबुजाट झाला आहे.

विशेषत: रुद्राजी व दुल्लभजी याच्या हत्येची दुष्ट वार्ता ऐकून तर तिचें कोमल स्त्रीहृदय अगदीं ठाव सोडण्याच्या बेताला आलें होतें. कशी झाली तरी ती दुल्लभजीची बहीण. इतका वेळ तिला एकट्या श्रीपतीचा द्वेष वाटत होता. पण आता त्याची तीव्रता कमी झाली, त्याची तिच्या हृदयातील जागा त्या त्रिमूर्तींनीं घेतली. त्या तिघानाही कठोर शासन झालेंच पाहिजे असें तिच्या मनानें घेतलें पण तें शासन सरखेलाखेरीज दुसरा कोण करण्याला समर्थ होणार! आणि सरखेलाना तरी ही फितुरी कळेल, तेव्हा ते न्याय करणार ना? त्यासाठीं लक्ष्मीला सरखेलाची भेट घेणें अवश्य होऊन बसलें. ती भेट घेण्यासाठीं तिथेंच खोळंबून राहणें तिला सुरक्षितपणाचें वाटेना तिनें आपल्या मनाशीं निर्धार केला, आपण काहीं झालें तरी देवगडीं जावयाचेंच. मग पुढचें पुढें.

असे निश्चित विचार मनान घोळत असताना लक्ष्मी पलीकडच्या दालनांतील यज्ञेश्वरशास्त्री, आनंदराव व सुजनासिंग याचें सभाषण ऐकतच होती. तें ऐकता ऐकता तिच्या आश्चर्याला अधिकाधिक भरती येत होती. तोंच मध्येच सुजनसिंगाचे उद्गार लक्ष्मीच्या कानी पडले.

"बाईसाहेबाचें तुम्हाला पूर्ण पाठबळ आहे. पण तें मीं सागितलेल्या अटींवर. दौलतींतील ह्या प्राताची सुभेदारी मला मिळाली पाहिजे, किंवा सरखेलाच्या सर्व दौलतीवर मालकी बाईसाहेबाची शाबीत होऊन त्याची मुखत्यारी माझ्याकडे आली पाहिजे. आणि दुसरें, हा निकाल लागण्यापूर्वी सगळ्याच्या अगोदर त्या बयेचा—त्या मुलुख-भवानीचा काटा आमच्या मार्गांतून कायमचा निघाला पाहिजे."

त्यावर यज्ञेश्वरशास्त्री उत्तरल्याचें लक्ष्मीला ऐकू आलें, "तो काटा आतां निघाल्यासारखाच आहे. प्रभावती देवगडीं गेली, ती तेथून परस्पर देवघरीं जाण्यासाठींच गेली असें समजा. ती आता काहीं केल्या माघारी यावयाची नाहीं. असें पाहा, वृक्षाची फादी तुटली कीं तिच्यावरची कोकिळा भुर्रकन् उडून जावयाचीच."

"अरे गुलामानो!" लक्ष्मी स्वतःशीं म्हणाली पण त्याच वेळीं तिचें जिजाबाईच्या चर्येकडे लक्ष्य गेलें त्याबरोबर तिला दचकल्यासारखें झालें. आपण तें सभाषण चोरून ऐकत असल्याबद्दल सशय तर सरखेलीणबाईंना आलेला नाहींना, असेही तिला वाटलें एकदा तिला वाटलें, हे तुमचें चुकतें आहे, सवतीमत्सराच्या भरीं पडून तुम्ही दौलतीचा नाश करायला ह्या कावळ्याना प्रोत्साहन देत आहा, हें बरें नाहीं, असे सरखेलीणबाईंना बजावून सागण्याचेंही तिच्या मनात आलें.

जी भूमिका आपण घेतली, ती वठवून दाखविण्यात लक्ष्मीचा अगदीं हातखडा होता अवघी एकच रात्र ती विजयदुर्गावर होती. पण तेवढ्या मुदतीत जिजाबाई व तिचे इतर कैवारी याच्या कलानें वागून व इकडच्यातिकडच्या माहितीच्या अनेक गोष्टी सागून त्याना तिनें इतकें भारून टाकलें कीं देवगडीं तर तिनें जावें असें सर्वानुमतें ठरलेंच, पण तिथें गेल्यावर तेथील लोकाच्या हालचालींवर गुप्तपणें नजर ठेवून तो वृत्तान्त वेळच्या वेळीं इकडे कळविण्याची जबाबदारीची कामगिरीही तिलाच सागण्यात आली इतक्या साऱ्या श्रमाबद्दल तिची स्वतःची अशी एकच मागणी होती, व ती पुरविण्याचें यज्ञेश्वरशास्त्री वगैरे मडळीने तिच्या कल्पनेबाहेर उदार वृत्तीनें मान्य केलें होतें. तिला तिच्या पित्याची हत्या करणाऱ्या श्रीपतीचा न्याय करण्याची कामगिरी स्वतःकडे पाहिजे होती ती तर मिळालीच, व त्याच रात्रौ श्रीपतीला नीट बदोबस्तानें कैद करून ठेवण्यासाठी देवगड निजोजित करण्यात येऊन तिकडे दुसऱ्या दिवशीं त्याची रवानगीही करण्याचेंही बहुताशी ठरलें. स्वतः लक्ष्मी मात्र त्याच्या पूर्वीच मोठ्या पहाटेला देवगडाकडे निघून गेली.

एवढें ठरल्यावरही त्या रात्रौ यज्ञेश्वरशास्त्री वगैरे मडळीने पुन्हा एकवार तुरुगात जाऊन श्रीपतीचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण फुकट! तो त्याच्या सागण्याप्रमाणें एकही गोष्ट मान्य करीना. त्याचें एवढेंच मागणें होतें कीं आपणाला शासन करण्यासाठीं का

होईना पण आपल्या वडिलाकडे पाठवा. प्रथम त्या मंडळीपैकीं कांहींचा तसा विचार होताही. श्रीपति जर नको म्हणाला असता, तर त्या मंडळीनें त्याला मुद्दाम जावजी गवळ्याकडे पाठविलें असतें. पण तो पाठवा म्हणू लागला, तेव्हां मंडळीचा विचार बदलला. त्यांनीं त्याला देवगडींच पाठविण्याचें निश्चित केलें. मात्र त्याला सांगतांना सांगितलें कीं आपण तुला जावजीबाबाकडे बसवतगडावर पाठविणार आहों!

## प्रकरण एकोणिसावें

# सरखेल व सुभेदार

"एकूण आपली ही योजना ठरली तर ?"

"ठरली. ही अमलात आणायला माझ्या फक्त दोनच अटी आहेत."

"कोणत्या त्या ?"

"अटी महत्वाच्या अशा नाहींत. पण इभ्रतीच्या दृष्टीनें त्यांना महत्त्व आहे. पहिली गोष्ट, मानाजीबाबाच्या हस्तें पेशवे व आंग्रे याच्या तडजोडीवर सही झाली पाहिजे."

"मानाजीबाबा याला कबूल होतील का ?"

"हो होतील. त्याची तशी स्पष्ट कबुली मला मिळालीही आहे."

जावजी गवळी व खडूजी माणकर हे खासगी विचारविनिमय करून माघारे तुळाजीच्या महालात आले, तेव्हां आणखी थोडा वेळ वाटाघाटी होऊन वरच्याप्रमाणें समारोपाचें सभाषण त्यांच्यात चाललें होतें तडजोडीचीं कलमें वगैरे सर्व बोलून मुक्रर झालीच होतीं, व तोंडीं ठरलेल्या गोष्टी लेखी करण्याच्या इराद्यानें जावजी गवळी आतां तुळाजीशीं बोलत होता. पहाटेपावेतों त्या वाटाघाटी एकसारख्या चालल्या होत्या. एकमतानें दिलजमाई करण्याचें ठरलें, तरी कलमवारीनें दिलजमाई करण्याचा उपक्रम झाल्यावर दरएक कलमाचा थोडा फार कीस निघणारच. त्या वादाचें मूळ आंग्र्याच्या घरगुती बेबनावांत, तो बेबनाव मिटविण्यासाठीं जावजी गवळी व खडूजी माणकर यांनीं जीं कलमें सुचविलीं, तीं तुळाजीनें बिन्तक्रार मान्य केलीं. आंग्र्याच्या दौलतीची इभ्रत व आबादानी कायम राहील अशा बेतानें पेशव्यांशीं करावयाच्या तडजोडीचीं इतर कलमें ठर-

विण्याचें काम त्यानें त्या अनुभवी वृद्धावरच सोंपविलें. आग्ऱ्यातील आपसातील भाऊबदकीचें मूळ तुळाजीनें स्वखुषीनें नाहींसें केल्यावर वस्तुतः गवळी व माणकर याचा विरोध उरलाच नाही. पेशव्यानीं आग्र्याचा मोड करण्यापुरतें इग्रजाना सुभेदार रामाजीपतामार्फत हातीं धरलें होतें त्या इग्रजाची वृत्तिही आग्रे व पेशवे याच्या भाड णात स्वतःचा डाव साधण्यापुरती बाबनकशी स्वार्थी असल्यानें त्याचा तडजोडीच्या वाटाघाटींत समावेश न होणेंच तुळाजी प्रमाणेंच गवळी व माणकर यानाही वाटत होतें आता तुळाजीच्या मतें मुख्य व सभवनीय अशी आडकाठी सुभेदाराची होती. पण पहिली गोष्ट, ती आडकाठी होणारच नाहीं, व दुसरें, झालीच तरी आपण ती जुमानणार नाहीं, आपण काय वाटेल तें करून सुभेदाराची समजूत करू, असे आश्वासन त्या दोघानी दिलें असल्यानें तोही प्रश्न तेवढ्यापुरता तरी त्या तिघाच्याही मतें मिटला होता

आता ह्या एकदर सलोख्याला मानाजी आग्रे तयार होतील कीं नाहीं, ही एकच शका गवळी व माणकर याना होती. तो प्रश्न त्यानी आपण होऊन तुळाजींशीं झालेल्या वाटाघाटींत धसाला लावला नव्हता. याचें कारण, त्या दोघा भावाचें विळयाभोपळयाइतकें सख्य असल्याचें माहीत असताना त्या वाळलेल्या जखमेवरची खपली ते मुद्दाम कशाला म्हणून काढतील? पण तुळाजीनें आपणाकडे शक्य तितका लहानपणा घेऊन अगोदरच भाऊबदकीचा प्रश्न बहुतेक सोडविला असल्यानें, तो वृत्तान्त आता तुळाजीच्या तोंडून ऐकून तर आपल्या शिरावरचा एक मोठा भार हलका झालासें त्याना वाटलें.

"आधळयानें मागावा एक डोळा व देवानें द्यावे दोन, तसाच प्रकार झाला हा!" जावजी गवळी खड्डजी माणकराकडे पाहून हसून म्हणाला.

"एकूण तुमचा या योजनेला अडयळा नाहीं तर?" तुळोजीनें विचारलें.

"का असेल? इतकी आग्रे बधूची एकी झाल्यावर आपण सारी

पृथ्वि पादाक्रात करू कीं!" खडूजी उद्गारला, "पेशव्याना देखील हें ऐकून किती समाधान वाटेल!"

"त्याविषयी मात्र मला आजच काहीं खात्री देववत नाहीं. राज-वटीची आबादानी हा एकच उदात्त हेतु जर आग्र्यांशीं तटा मांड-ण्यात पेशव्याचा असेल, आणि आग्र्याच्या घरातील भाऊबदकीमुळें राजवटीची घडी बिघडते असा त्याचा प्रामाणिक समज असेल, तर आता-आग्रे बधु एक विचारानें वागून राजवटीची सेवा करतील व पूर्ववत् आपल्या वाडवडिलाच्या पावलावर पाऊल ठेवून राजवटीचें वैभव वाढावितील असा भरवसा बाळगावयाला पेशव्याना काहीं हरकत नाहीं."

"काहीं हरकत नाहीं" गवळी व माणकर एकदम उत्तरले.

"पण त्याचा तसा भरवसा आग्र्यावर बसेनासा झाला तर?" तुळाजीनें प्रश्न केला

"तर मग आम्हाला पेशव्यापेक्षा आग्रे जवळचे आहेत." गवळी उत्तरला, 'बस्स! एवढेंच उत्तर मला पाहिजे होतें. पेशव्याचा निर्वाळा देऊन सुभेदारानीं तडजोडीची आणखी एक नाजुक अट म्हणून पुढें केली आहे, सरखेलाच्या अब्रूवर किटाळ आणूनही आज वर सुभेदाराचें समाधान झालें नाहीं, म्हणून त्यानीं आता सरखेलाच्या सबधी बायकाची अब्रू चवाठ्यावर माडण्याचा डाव रचिला आहे. सुभानराव सोडकराचें प्रकरण तुमच्या कानीं आलें असेलच."

"होय. पण त्याचा इथें काय सबध?" गवळ्यानें विस्मयपूर्वक प्रश्न केला. खडूजी माणकरही तितक्याच विस्मयाने गवळ्याकडे पाहू लागला

"सुभानजी सोडकराची कुलवीण मी पुन्हा त्याच्या स्वाधीन केली पाहिजे, ही तडजोडीची एक अट म्हणून पेशव्याकडून म्हणजे पेशव्याच्या तर्फेनें सुभेदाराकडून म्हणाना, पुढें करण्यात आली आहे,"

"इतक्या हलक्या गोष्टींत पण मी म्हणतों, पेशव्यानीं तरी लक्ष्य का घालावें?" गवळी कांहींसा चिडून उद्गारला.

"आपण असल्या गोष्टींना महत्त्व देता कामा नये." माणकर म्हणाला.

"पण सुभेदार आल्यावर त्याच्यासमोरदेखील आपण दोघे इतक्या निस्पृहपणानें बोलाल काय?" तुळाजीनें विचारलें.

"सुभेदारच काय, त्याचा देव आला तरी त्याच्या समोरदेखील इतक्या स्पष्टपणें बोलायला कोणाची हरकत?—"

असे शब्द गवळयाच्या मुखावाटे निघतात न निघतात, तोंच त्या महालाचा दरवाजा एकदम उघडला गेला, व सुभेदार रामाजीपंत बिवलकर आत प्रवेश करून म्हणाले, "सुभेदाराच्या देवापाशीं मग काय स्पष्टपणानें बोलाल तें बोलाच. पण तूर्त सुभेदार तुमच्यासमोर उभे आहेत, याच्याशीं अगोदर काय तें बोला"

"आपण आमचें संभाषण असें चोरून कां ऐकलें?" गवळी व माणकर सुभेदाराला उत्थापन देऊन एकदम म्हणाले, "आपणासारख्या थोरामोठयानीं असली चोरटी वृत्ति बाळगणें बरें नाहीं"

"हा नियम फक्त सुभेदारानाच लागू आहे, की तुम्हालादेखील?" आपणाला तुळाजीनें उत्थापन दिलें नाहीं, त्यामुळें चिडल्यासारखी मुद्रा करून तुळाजीपासून दूर एका कोंपऱ्यात मांडण्यात आलेल्या उच्चासनावर बसत रामाजीपंत म्हणाले, "असें आहे, तुम्ही हे आमचे डावे उजवे हात. ज्या मार्गानें तुम्ही जाल, त्याच मार्गानें आम्हालाही जावयाला नको काय? तुम्ही आम्हाला धाब्यावर बसवून परस्पर सरखेलाशीं तडजोडीची भाषा सुरू केली, ह्या तुम्हा तिघा धूर्तांच्या मसलतीचा सुरा आधारात आमच्या छातीत घुसू नये, या साठीं आम्हाला सावधगिरी बाळगावयाला नको काय? तें राहो. सुभेदाराशीं स्पष्टपणें काय बोलावयाचें आहे तें बोला. तुमचें खासगी संभाषण अजून संपलें नसेल तर आम्ही निघून जातों."

तुळाजी त्रासून उत्तरला, "नाहीं—प्रथम लाथ मारून मागाहून नमस्कार करण्याचें काही कारण नाही. तुमचा खलिता मला मिळाला. त्यावर वाटाघाट करावयाची मला इच्छा नाही."

"मग आपलें इथें येणें कशासाठीं झालें?" जितक्या निस्पृहपणें तुळाजी बोलला, तितक्याच निस्पृहपणें सुभेदारानीं पृच्छा केली.

माझें येणें ह्या दोघाशीं त्याच्या सहानुभूतिपूर्ण धोरणावरून तड-जोडीची चर्चा करण्यासाठीं झालें आहे आणि तुम्हाला कळविण्यास मला आनद वाटतो कीं, त्या चर्चेतून पुष्कळच एकमुखी निर्णय निर्माण झाला आहे."

"वा! मग तर फारच छान! ज्या अर्थी निर्णय झाला आहे म्हणता, त्या अर्थी आता त्याची अमलबजावणी होण्याला मुळींच हरकत नाहीं" सुभेदार आपल्या नेहमींच्या स्वभावाला अनुसरून कुत्सितपणें म्हणाले.

"हरकत तसें पाहता काहींच नाहीं फक्त आपली मान्यता काय ती आमच्या वाटाघाटींना मिळावयाला हवी आहे." गवळी म्हणाला.

"माझी मान्यता पाहिजेच म्हणता! माझ्या मान्यतेसाठीं वास्तविक तुमचें काय अडणार आहे?"

"असें आपण विचारणें, म्हणजे नवरदेवाशिवाय लग्न कां लागू नये असें विचारण्यासारखेंच होय." माणकर म्हणाले.

"आजचे नवरदेव सरखेल आहेत"

"पण उपाध्ये आपण आहा." माणकर म्हणाला.

"सरखेलाना ब्राह्मण उपाध्या—त्यातून मी कोंकणस्थ चालेन का? कोंकणस्थावर तर त्याचा सारा दात आहे! तसें नसतें, तर हा लढा इतका विकोपाला गेलाच नसता." सुभेदार तुळाजीकडे वळून म्हणाला, "सरखेल! आपण आजवर कोंकणस्थाचा जेव्हा अमानुष छळ केला, पेशव्याची जन्मभूमिदेखील पेशव्याच्या स्वाधीन करण्याला नाकारून त्याच्या मानखडनेची पराकाष्टा केली, तेव्हा या गोष्टीचा विचार केला होता काय?"

"हें पाहा सुभेदार! तीं मतभेदाचीं जुनीं मढीं उकरून काढण्यात काहीं अर्थ नाहीं. एका हाताने टाळी वाजत नाहीं, हें तर तुम्हांला

कबूल ना?" तुळाजीनें आपल्या तापट स्वभावाला शक्य तितकी गवसणी घालण्याचा प्रयत्न करीत विचारलें.

"हाच प्रश्न मी आमच्या—पेशव्याच्या बाजूनें आपणाला विचारतों!" सुभेदारानें उलट विचारलें, "पेशव्यानीं आंग्र्याना विरोध केला, तेव्हा तरी एका हातानें टाळी थोडीच वाजली?"

"सुभेदार! आपण आता त्या उखाळ्या पाखाळ्या काढीत बसू नये असें मला वाटतें. सुदैवानें सर्व गोष्टी आपल्या मनासारख्या झाल्या आहेत —"

माणकराला तोंडचें वाक्य पूर्ण करण्याची संधी न देता रामाजीपंत उतावळेपणानें म्हणाला, "त्या सरखेलाच्या मनाजोग्या झाल्या असतील."

"का? आता सरखेलाचें मन आमच्या मनावेगळें उरलेलें नाही."

"म्हणजे पेशव्याना सतावून सोडण्यात त्याचें व तुमचें एकमत झालें आहे, असेंच ना?"

रामाजीपंताच्या त्या एका प्रश्नानें तेथलें सारें वातावरण बदलून गेलें—अगदीं प्रक्षुब्ध झालें.

"आमच्यावर—तुमच्या खाद्याला खादा भिडवून सरखेलाशीं झगडणाऱ्या गवळी—माणकरावर हा आरोप? सुभेदार! तुमचे हे उद्गार मला मोठे धार्ष्ट्याचे वाटतात." गवळी संतापून म्हणाला, "आम्हीं जी ही सारी धडपड केली, ती स्वार्थासाठीं अथवा पेशव्याशी विश्वासघात करण्यासाठीं काय?"

"पेशव्याची आज्ञा काय आहे याचा विचार न करता तुम्ही सरखेलांशीं मथला, याचा अर्थ मीं काय बरें समजावा?" रामाजीपंतानें एका कसानें नमता नूर धारण करून विचारलें त्याला कळून आलें कीं आता आणखी ताणल्यास तुटण्याचा संभव जास्त आहे. म्हणून त्यानें इतका तरी सौम्यपणा पत्करला.

"पेशव्याची कोणती आज्ञा आम्हीं जुमानली नाही?" गवळ्यानें प्रश्न केला.

"तुम्हीं ती जुमानली नाहीं असें मी म्हणत नाहीं पण पूर्ण चौकशी केल्याखेरीज व मला भेटल्याखेरीज तुम्हीं तडजोडीच्या वाटाघाटी परस्पर करावयाच्या नव्हत्या." रामाजीपंत लगेच तुळजीकडे वळून म्हणाला, "सरखेल! रंगोबा सांटमाच्या हातीं श्रीमंत पेशव्याचा खलिता आपणाला पोंचला कीं नाहीं?"

"पोंचला." तुळाजी उत्तरला

"मग त्या खलित्यातील पेशव्याच्या आज्ञेची अमलबजावणी आपण केली काय?"

"इतक्या वर्षानंतर अजूनही पेशव्याना ह्या तुळाजी आंग्र्याची ओळख पटली नाहीं काय? आंग्र्याच्या वरच्या बायकाची इभ्रत व अब्रू हीच किंमत जर आंग्र्याच्या दौलतीबद्दल पेशव्याना पाहिजे असेल, तर पेशव्याना सांगा, हें क्षत्रियाचें बीज आहे. स्त्रियाच्या अब्रूसाठीं दौलतच काय पण प्राणदेखील गमावण्याला मागे पुढें न पाहणाऱ्या ह्या तुळाजीशीं गाठ आहे म्हणावें माझें गृहछिद्र शोधून त्याच्या इरेला मला घालताना पेशव्यानीं थोडा तरी सारासार विचार करावयाला हवा होता. तो यःकश्चित एक दीड दमडीचा शिपुर्डा सुभानराव सोंडकर–किती मात्रागमनीपणा त्यानें प्रभावतीच्या बाबतींत केला, याचें वर्णन करून मी माझी जिव्हा विटाळीत नाहीं. मी एवढेंच सांगतों कीं प्रभावतीचा व त्याचा काहींदेखील संबंध नव्हता. तो नीच तिला तिच्या इच्छेविरुद्ध परोपरीच्या संकटात आणून नादीं लावू पाहत होता त्यातून मीं तिला बचावून माझ्या पदरीं आश्रय दिला, आणि माझ्या धर्मपत्नीच्या इतमामानें तिला वागविलें, तिला मी आज दौलतीच्या लोभानें त्या कवडी किंमतीच्या शिपुर्ड्याच्या स्वाधीन करू काय?"

"हें मला काय विचारता? माझा त्याच्याशीं काय संबंध? श्रीमंत पेशव्याचा खलिता आला तो मीं आपल्याकडे रवाना केला. त्याला हेंच उत्तर असेल, तर तसें माघारें त्याना कळवीन आणि त्याचें उत्तर आल्यावर मग तडजोडीची वाटाघाट आपण करू." असें म्हणून,

तडजोडींत बखेडा उत्पन्न करण्याचा आपला इष्ट हेतु साध्य झाल्या-च्या आसुरी आनदानें उत्तेजित होऊन रामाजीपत तुळाजीकडे किंचित् पाठ करून बसला

"असे भ्याडासारखे पेशव्याच्या नावामागें का दडता? स्पष्टपणें कां नाहीं म्हणत कीं आपणाला शक्य तितका सरखेलाचा पाणउतारा करावयाचा आहे असें? नामुष्कीच्या प्रश्नाला काय उत्तर माझ्याकडून मिळेल याची तुम्हाला कल्पना नाहीं काय?"

रामाजीपत, गवळी व माणकर याच्याकडे तोंड फिरवून म्हणाला, "सरखेल इतके बाक्याचे, साक्षात् परमेश्वरासमोर देखील शीर न नमविणारे, इभ्रतीपायीं स्वतःचें स्थल क्षणमात्र न सोडणारे! तेच दातीं तृण धरून शरण येणाऱ्या शार्दूलाप्रमाणें विजयदुर्ग सोडून एथवर आले! हें यापूर्वी कोणाला तरी सभवनीय वाटलें असतें का?"

"सुभेदार! त्याबद्दल सरखेलाना डिवचण्यात अर्थ काय? हा सरखेलांचा कमीपणा नसून भलेपणा आहे. आपणा सर्वांच्या विनतीला मान देऊनच त्यानीं इतकें सलोख्याचें धोरण पत्करलें आहे" गवळी रामाजीपताच्या उद्गाराबद्दल नापसती दर्शविण्यासाठीं म्हणाला.

लगेच माणकर उद्गारला, "मराठी साम्राज्याच्या आबादानीची आणि कोंकणपट्टींतील बेबनाव मिटण्याची काळजी व कळकळ जितकी ससखेलाना, तितकीच आपणा सर्वांनाही आहे. हिणवणुकीची भाषा बोलावयाचीच झाली, तर सरखेलाच्या बाजूनें असें म्हणता येणार नाहीं का, कीं पेशवे व सुभेदार घाबरले व नाक मुठींत घेऊन यशवत-गडावर सरखेलाशीं वाटाघाटी करण्यासाठीं आले?"

"तें एक राहो." रामाजीपत बाजू आपल्या अगार्शी येते असें दिसताच पगडी फिरविण्यात चागलाच तरबेज होता तो या वेळीं प्रसगावधान राखून तुळाजीचा मर्मभेद करण्याच्या खुमखुमीनें म्हणाला, "सरखेल वजारतमाब मानाजीरावाना हाडवैऱ्यापेक्षाही हाडवैरी मानणारे. पण त्याच्यासमोर देखील सरखेलानीं मान नमविली."

तुळाजी एकदम उसळून म्हणाला, "वैऱ्यासमोर मान नमविण्या-

पेक्षां पाठच्या बधूशीं नमतेपणानें वागणें कितीतरी पटीनें समजसपणाचें व सन्मानाचें आहे"

"हें आपणाला आज कळलें! पण मागें सिद्दीच्या सरदारानें वजारतमाबावर हल्ला केला व वजारतमाबानीं हतधैर्य होऊन आपली मदत मागितली, तेव्हा काहीं हा विचार आपणाला सुचला नाहीं व रुचला नाहीं. तेव्हा वजारतमाबाना पाठीशीं घालून त्याना धीर दिला ह्या बिवलकरानें! आणि आज त्याच बिवलकराचें स्तोम कमी करण्यासाठीं तुम्ही आग्रे बधु एक होता काय? सरखेल! आपलीं हीं चोरटीं कृष्णकारस्थानें माझ्या नजरेला आलीं नाहींत अथवा येणार नाहींत अशी जर तुमची समजूत असेल, तर ती साफ चुकीची आहे. वर वर दाखवायाला नरमाईची भाषा, आणि अतरगात इतके काळेकुट्ट विचार!" रामाजीपत गवळी व माणकर याच्याकडे वळून पुढें म्हणाला, "इतके डावपेंच खेळणाऱ्या सरखेलांशीं तुम्ही सामील होऊन तडजोडीचा खेळखडोबा माडला आहे, त्या अर्थी तुमचा तरी भरवसा आम्हीं कसा धरावयाचा? तुम्ही म्हणाल, यांत खेळखडोबा कसला!"

"अलबत् म्हणू." गवळी म्हणाला.

"तें मी तुम्हाला लौकरच थोडा शांतपणा मिळाल्यावर समजावून सागणार आहें. त्यानतरदेखील जर तुमचा सरखेलांवर आजच्या परिस्थितींत विश्वास बसला तर मग तुमचा पुढचा मार्ग तुम्हांला मोकळा आहे. तूर्त श्रीमत पेशव्याच्या आज्ञेचा पाईक या नात्यानें सरखेलाना माझें असें निक्षून सांगणें आहे कीं, पेशव्यांच्या खलित्याला स्पष्ट होकारार्थी उत्तर मिळून त्या होकाराची अमलबजावणी होईपावेतों तडजोडीची भाषा पुढें चालविणें आम्हाला सर्वतोपरी अशक्य आहे."

"मीं आतां सागितलें तेंच पुन्हा सांगतों. प्रभावतीला दूर लोटून देण्याला मी प्राण गेला तरीदेखील तयार होणार नाही. त्यासाठीं मला माझ्या दौलतीवर व प्राणावरदेखील तुळशीपत्र ठेवावें लागलें तरी

बेहेत्तर!" तुळाजी कर्दनकाळासारखा संतापानें लाल होऊन उत्तरला.

"हा हट्टीपणा आवरता घेण्याची आम्ही आपणाला पुन्हा एकवार संधी देतों." असें म्हणून गवळी व माणकर यांच्यासह रामाजीपंत विचारविनिमय करण्यासाठीं तेथून आपल्या निवासस्थानीं निघून गेला.

तुळाजीनें एथवरच्या संभाषणावरून निश्चित कल्पना केली कीं तडजोड अशक्य आहे रामाजीपंत तेथें आलेला पाहताच तुळाजीनें हेरलें होतें कीं हा सर्व वाटाघाटींवरून बोळा फिरवणार तसेंच झालें. यात तुळाजीला आश्चर्य वाटलें तें हें कीं मानाजीकडची इतकी बित्त बातमी रामाजीपंताला कशी कळली? त्याला संशय आला, रामाजी पंत मानाजीला फितवून बिथरविणार तर नाहीं ना?"

अशा प्रकारच्या भिन्न भिन्न चिंता ज्या एका चिंतेत एकवटलेल्या होत्या, ती चिंता म्हणजे, जर रामाजीपंताच्या आगलावेपणानें तहाची वाटाघाट फिसफटली, तर पुढें काय? —त्या चिंतेने तुळाजी इतका भांबावून गेला कीं, त्या संकटातून पार पडावयाचें तर मरणाखेरीज दुसरा अब्रूदारपणाचा मार्ग आपणाला उरलेला त्याला दिसेना. तेव्हा त्याला पूर्वदिवशी पहाटेला विजयदुर्गावर महिरतीची भेट होण्यापूर्वीची दारुण मनस्थिति आठवली त्या आठवणीसरसें त्यानें खिडकींतून बाहेर आकाशाकडे पाहिलें. तों आकाश पूर्ण अभ्राच्छादित होतें

"हीं काळींकुट्ट अभ्रें दूर होणार तरी कधी?" असें सभोंवारच्या परिस्थितीला अनुसरून तुळाजी आपल्याशी उद्गारतो, तोंच एकजण चोरट्या पावलांनीं त्या महालात घुसला. पहिल्या प्रथम त्या माणसाला तुळाजीनें ओळखलें नाहीं, व दचकून एकदम प्रश्न केला, "कोण आहे?"

"मी आहें कर्णाजी धुळप. सरकारांनीं भिण्याचें कारण नाहीं. मी सरकाराच्या चरणाचा सेवक आहें." तो मनुष्य उत्तरला. कर्नाळ्याच्या पाडावात जमीनदोस्त झालेला कर्णाजी धुळप—रुद्राजी धुळपाचा वडील भाऊ—गणूजी मान्याचा जावई वाचकांना आठवत असेलच.

"कोण, कर्णाजी?" तुळाजीनें आश्चर्यचकित होऊन मागें वळून पाहत विचारलें, "कर्णाजी! तू अद्यापि जिवत आहेस?"

"होय सरकार! मी जिवत आहें. माझ्या बायकापोराची व ससाराची कर्नाळ्यावरच्या प्रळयात बाताहात उडाली, पण मी मात्र केवळ आपल्या पायाची सेवा करण्यासाठीं जिवत आहें. इतके दिवस मी सिद्दीच्या जाचामुळें अज्ञातवास भोगीत होतों तेथून देवानें माझी सुटका केली सध्या मी सुभेदार बिवलकराचा हेर आहें आपली दिशाभूल करण्याच्या कामावर त्यानें माझी नेमणूक केली आहे. त्या सर्व गोष्टी शातपणें बोलण्याच्या आहेत देवानें पुढें मागें तितकी स्वस्थता दिल्यावर आपण बोलूं तूर्त सुभेदारानें माझी नेमणूक देवगडाकडील आपला व आपल्या मडळीचा भेद आणण्याच्या कामावर केली आहे आज रातोरात मी तिकडे जावयाला निघणार आहें. त्यापूर्वी आपणाला मला सुभेदाराच्या सध्याच्या राक्षसी कारस्थानाची ओळख करून द्यावयाची आहे सुभेदार, गवळी व माणकर तिकडे खलबत करण्यात गुतले आहेत, तोंवर आपणाला खासगी बोलण्याला थोडा अवकाश आहे आपण कृपा करून जरा बाजूला वर चला पाहू!"

तुळाजी जास्त वाटाघाट न करता मुकाट्यानें कर्णाजीमागोमाग बाजूला गेला.

× × ×

थोड्या वेळानें रामाजीपत, गवळी व माणकर याचे खलबत आटोपून त्यात ठरलेला निर्णय तुळाजीला निवेदन करण्यासाठीं रामजी-माघारा येत असल्याची चाहूल लागताच कर्णाजी परस्पर पलीकडच्या दरवाजानें बाहेर निघून गेला. तो जाताना देवगडाकडे तुळाजीच्या बाजूनें अनुसधान राखण्याचें, व प्रभावतीची काळजी घेण्याचें शपथेवर कबूल करून गेला खरा. पण जाताना अनेक भयकर दुःखद वार्तांचें विष तुळाजीच्या कानीं ओतून गेला.

## प्रकरण २० वें

# पतिव्रता

तिकडे यशवतगडावर मराठ्याच्या राजकारणातील अत्यत महत्वाचा प्रश्न चर्चिला जात असतांना विजयदुर्गात सरखेलाचे पाय मागें कसे ओढले जातील याविषयीं यज्ञेश्वरशास्त्री, आनदराव व सुजनसिंग याच्या वाटाघाटी चालल्या होत्या, तर खुद्द जिजाबाईच्या मनात थोड्याफार प्रमाणात प्रभावतीविषयीं सवतीमत्सराचें विष डाचत होतें. सुजनसिंग जिजाबाईचा भाऊ हा यज्ञेश्वरशास्त्र्याचा साथीदारच खरा, पण त्याला यज्ञेश्वरशास्त्र्याची मदत पाहिजे होती. ती विजयदुर्ग पाडाव झाल्यावर त्या मेलेल्या मढ्याच्या ताळूवरचें लोणी चाटून खाण्याची सधी आपणाला मिळावी म्हणून यज्ञेश्वरशास्त्र्यानें सुभेदाराची आगाऊ समति घेऊन सुजनसिंगाच्या तोंडाला मधाचें बोट असें लावलें होतें कीं विजयदुर्गावर पेशव्यांचा अमल जारी करण्याच्या कामीं तुमच्याकडून आमचा पाठपुरावा झाला, तर तो महाल तुमच्याकडे सुभेदार या नात्यानें भोगवट्याला ठेवतां येईल. त्यावरून सुजनसिंग हुरळून गेला होता. विजयदुर्गाच्या बाबतींत यज्ञेश्वरशास्त्र्याचा 'आन्तर कोऽपि हेतुः' अगदीं निराळा होता. तो इतर कोणालाच —खुद्द रामजीपतालाही माहीत नव्हता. तिकडे देवगडावर आणखी कांहीं स्वार्थसाधूची निराळीच धडपड चालली होती. पेशव्यांचा डाव ह्या भानगडींत पडण्याचा निराळा, तर इग्रजांचा निराळा.

त्यामुळेंच, यशवतगडावर तुळाजीबरोबर गवळी, माणकर व रामाजीपंत यांच्या वाटाघाटी चालल्या असतांना विजयदुर्गात त्या राजकारणांत निराळेंच विष भिनविलें जात होतें, व देवगडांत तर तसल्या विषारी वासनांच्या लोकांचा पुष्कळच बुजबुजाट झाला होता.

लक्ष्मीला हें काय माहीत! तें तिला त्या रात्रौ माहीत झालें. त्या एकंदर भानगडीचा अर्थ चटकन् तिनें ध्यानीं घेतला तो इतकाच कीं, तुळाजीसभोंवार हितकर्त्यांची जी इतकी गर्दी जमली आहे, ती गिधाडांची गर्दी आहे. पण त्या गिधाडांच्या अधाशीपणांत आंग्र्यांच्या दौलतीचा तर सत्यनाश होणारच, तुळाजीवर संकटपरंपरा कोसळणार, प्रभावतीचीही त्यात वाताहात उडणार! आणि जिजाबाई?–बिचारी जिजाबाई! तिला एवढें कळत नव्हतें, कीं सबंध अरण्याला वणवा लागल्यावर त्या अरण्यातील एखादेंच रोप कसें टिकून राहणार व पोसणार.?

इतकें जरी होतें, तरी लक्ष्मीनें उमेद सोडली नव्हती. परंतु देवगड येथें जाऊन पोहोंचतांच मात्र तिची ती उमेद कायम टिकूं शकली नाहीं. तेथें जाऊन तिनें पहिल्याप्रथम प्रभावतीची चौकशी वरवरच केली. तेव्हां प्रभावति परस्पर कुणकेश्वर एथें आपल्या आराध्यदैवता-पाशीं गेल्याचें तिला कळलें. तेथून ती परस्पर कुणकेश्वरीच जावयाची. पण तेथून तिचा पाय एकदम निघाला नाहीं. याचें कारण तिला रंगोबा साटम तेथें अचानक किल्ल्याच्या बाहेरच भेटला.

बऱ्याच दिवसानीं व इतक्या लांबीच्या पल्ल्यावर एकट्यानें वणवण करीत असता रंगोबासारखा शेजारी म्हातारा भेटल्यावर सकृद्दर्शनीं लक्ष्मीला बराच धीर आला. ठाणें सोडल्यापासून मनमोकळेपणानें कोणाच जिव्हाळ्याच्या माणसाला भेटावयाला अथवा त्याच्याशीं चार शब्द बोलावयाला तिला सवड मिळाली नव्हती, ती आज मिळाली. तथापि तो तिचा आनंद फार वेळ टिकू शकला नाहीं. अगदीं प्रथमच तिनें रंगोबाला आपुलकीनें हांक मारली, त्या पहिल्याच क्षणाला त्याची चर्या गोरी मोरी झालेली पाहूनच तिच्या मनांत शंका उत्पन्न झाली.

रंगोबानें इतर कोणत्याही प्रकारची विचारपूस करण्याचें बाजूलाच राहिलें; पहिल्याच सपाट्याला त्यानें प्रश्न केला, "लक्ष्मी! तू इकडे कुठें?"

लक्ष्मीला रगोबाच्या वृत्तीत अलीकडे आपल्या मुलाला वैभव शाली करण्याच्या निमित्तानें बदल झालेला काय माहीत! तिला वाटलें, तो सहज देवगडीं महिपतीकडे थारेपालटासाठीं आला असेल. महिपतिदेखील आग्र्याचा एक एकनिष्ठ सेवक आहे, एवढेंच तिला माहीत होतें. तिला आपलें मनोगत रगोबापासून लपवून ठेवण्याचें काहींच कारण पडलें नाहीं. ठाण्याला घडलेल्या व ऐथून निघाल्या पासूनच्या हकिकती रघुवीराच्या भेटीचा व त्या अनर्थाची बाब तेवढी वगळून तिनें त्याला निवेदन केल्या गणोजी मान्याचा खून, व तो श्रीपति माणकराच्या हातून झालेला ऐकून रगोबाला अत्यत सताप आला, व विषादही वाटला. त्यानें श्रीपतीच्या नावाचा इतक्या अव हेलनापूर्वक उल्लेख केला की, लक्ष्मीला समाधान वाटलें. तिनें तेंही बोलून दाखविलें, "त्या चाडाळाला त्याच्या पापाचें प्रायश्चित मिळण्याचा योग आता जवळच आला आहे. त्याला अजून इथें आणण्यात आलें नाहीं का?"

"नाहीं. इथें आणण्यात येणार आहे त्याला?"

"होय."

"का? विजयदुर्गात त्याचें सरण पेटवण्यापुरती जागा नाहीं?"

"नाही. माझ्या हातून मरण यायचें आहे त्याला बरें पण तुझी सूनबाई तरी इथें आहे ना? कीं तीदेखील महिपतीबरोबर कुणकेश्वरीं गेली आहे?"

"नाहीं. ती नाहीं गेलेली. ती इथेंच आहे. तिचे वडील कुशाबा आले आहेत आज तिला भेटायला. पण काय ग, सरखेलाना ती बातमी तू कळवलीस?"

"नाहीं. अरे बघ, मी चुकल्यें. तो सुभेदाराचा एक खलिता श्रीपतीमार्फत मुबईकर इग्रजाकडे रवाना व्हायचा होता ना, तो मधल्या-मध्यें एका माणसाच्या हातीं लागला.—" एवढें बोलून लक्ष्मी थबकली. धनार्जीनें तिच्यावर अत्याचार करण्याचा केलेला निंद्य प्रयत्न, व रघुवीर बागव्याकडून त्याचा झालेला खून वगैरे घटना तिच्या अत

श्वक्षूसमोर त्याच क्षणीं उभ्या राहिल्या. तेव्हाच रघुवीराच्या गोड आठवणीनें वसतकाळातील प्रभातसमयींच्या शीतल वायुलहरींप्रमाणें सुखसवेदनाच्या लहरीही तिच्या अतरगात उमटू लागल्या. तिला पहिल्या क्षणीं वाटलें कीं रघुवीर कोठें भेटला का, अथवा तो माहीत आहे का, वगैरे माहिती रगोबाला विचारावी पण पुन्हा दुसऱ्याच क्षणाला तिला भय वाटलें, नकोच तें न जाणो! सुभेदाराच्या प्रिय सेवकाची हत्या करणारा रघुवीरच होय, हें रगोबाला कळल्यास त्या मुळें रघुवीराच्या प्राणावर बेतण्याचाच सभव जास्त!

लक्ष्मी आपण जणू त्या गावचीच नव्हे असें भासविण्यासाठीं म्हणाली, "कोणीं तो लखोटा माझ्याकडे आणून दिला हें काहीं मला माहीत नाहीं. पण तो लखोटा मी घेऊन विजयदुर्गाला आल्यें तेव्हा माझ्याकडून तो तेथल्या यज्ञेश्वरशास्त्री वगैरे मडळींनें पुढें पोंचवण्यासाठीं घेतला आहे बाकी माझा मात्र तेथली एकदर परिस्थिति पाहून असा तर्क धावतो की ती मडळी काहीं सरखेल मानतात तितकी त्याच्या विश्वासाला पात्र नाहींत."

"विश्वासाला पात्र नाहींत म्हणजे?"

"ते सारे सुभेदाराचे फितूर असावे असें मला वाटतें."

त्याच क्षणी रगोबाची चर्या पालटली. तो जरी पूर्णांशानें नाहीं तरी बहुतांशानें त्याच मडळीच्या वर्गातील होता. त्यानें त्या विषया वर जास्त काहीं न बोलता तेथून पाय काढला, तो थेट कुणकेश्वरचा मार्ग पत्करला. प्रथम त्याच्या मनातून जावयाचें होतें विजयदुर्गाकडे एथील हालचालींची बातमी यज्ञेश्वरशास्त्री वगैरे मडळीला देण्यासाठीं. पण आता त्याला प्रथम कुणकेश्वरीं जाऊन आपल्या मुलाला व इतर मडळीला ह्या नव्या हालचालींची माहिती देणें अवश्य वाटलें. तो लक्ष्मीचा निरोप घेऊन तेथून निघाला.

लक्ष्मीला कुशाबा तेथें आपल्या लेंकीला भेटण्यासाठीं आल्याचें रगोबाकडून नुकतेंच कळलें होतें. कुशाबाची तिला जरी प्रत्यक्ष माहिती फारशी नव्हती, तरी तो तुळाजीचा एकनिष्ठ सेवक आहे एवढें

माहीत होतें. त्याचा आपणाला कांहीं उपयोग करून घेतां आला तर घ्यावा या हेतूनें ती तिकडे निघाली. शिवाय कुशाबाची लेक–रंगोबाची सून अर्थात् महिपतीची पत्नी सत्यभामा तिच्या थोडीफार परिचयाची होती. तिचा आश्रय यावेळी आपणाला बराच निवाऱ्याचा म्हणून उपयोगी पडेल, अशीही लक्ष्मीची अपेक्षा होती.

परतु लक्ष्मी करावयाला गेली एक, व तिला तेथें ऐकावयाला मिळालें भलतेंच तिला आत जाताना कोणीं अडथळा केला नाहीं. वाड्याच्या दरवाजापाशीं जाताच मात्र एका कुळंबिणीनें तिला हटकलें. पण 'मला सत्यभामेला भेटायचें आहे' असा किल्लेदाराच्या पत्नीचा एकेरी नावानें आपुलकीनें उल्लेख तिनें केलेला ऐकताच त्या कुळंबिणीला वाटलें कीं ही किल्लेदारीणबाईची कोणीतरी मैत्रीण असावी. म्हणून तिनें तिला विरोध केला नाही. उलट तिला किल्लेदारीणबाईच्या बैठकीच्या जागेपावेतों नेऊन सोडलें

लक्ष्मी तेथें जाऊन पोहोंचते न पोहोंचते, तोंच आंतून तिला कोणीतरी जोराजोरानें बोलत असल्याचें ऐकू येऊ लागलें. तें चोरून ऐकण्यासाठीं म्हणून नव्हे, तर भीतीमुळें आत जाण्याचें धैर्य तिला होईना म्हणून लक्ष्मी चपापल्यासारखी बाहेरच उभी राहिली.

"नाही नाहीं. माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे. त्यानें कांहीं जरी सागितलें तरी मला तें खरें वाटणार नाहीं पूर्वींदेखील मला त्याच्या वर्तनाविषयीं शका होतीच. म्हणूनच तर इतके दिवस मी माझा जावई जिवत असूनही मेल्यात जमा धरीत होतों.—"

"नका! असले अभद्र शद्ब बोल बोलू नका बाबा!"

"ज्या चांडाळाला स्वतःच्या धर्मपत्नीची इतकी कवडी किंमत वाटते, सोन्यासारखी ही घरातली हसी सोडून जो त्या दीड दमडीच्या कुळंबिणीवर–त्या डोमकावळीवर भाळतो–त्याची काय किंमत! त्या पोरटीला–तारेला तरी ऊरफाटें काळीज आहे का? माझ्या मुलीच्या ससाराची वाताहात करण्याला पुढें सरसावताना मी तिच्या सवतीवर सूड घ्यावयाला जिवत आहें हें तिला कळलें नाहीं काय?"

"त्या बिचारीला कां शिव्या देता बाबा! मीं जें ऐकल्यें, त्यावरून मला तरी यात तिची काहींच चूक आहेशी वाटत नाहीं. ती त्याच्या मोहजालात सापडली, यात खरें पाहिलें तर तिच्याच जिवाची कुतरओढ झाली आहे."

"तें काहींच मी कबूल करणार नाही. पण ती एक बाब सोडून दिली तरी क्षुल्लक दौलतीच्या लोभानें प्रत्यक्ष धन्याशीं बेइमानी? ज्याचें अन्न खावयाचें, त्याच्या घरचे वासे असे मोजावयाचे काय? धन्याच्या विरुद्ध तशी फितुरी, आणि धाकट्या बाईसाहेबाविरुद्ध——"

"तो अपराध त्याचा नाहीं, तो सुभानरावाचा अपराध. सुभानराव हें सुभेदार बिवलकराच्या वशिल्याचें तट्टू पडलें. त्यानें प्रभावतीबाईसाहेबाना युक्तीनें विजयदुर्गातून बाहेर काढण्याचा हुकमतीवजा आग्रह केल्यावर तिथें त्याचा काय इलाज?"

"पण सरखेलाच्या गडावर व त्याच्या गडकऱ्यावर अशी हुकमत गाजविणारा हा सुभानजी तरी कोण? आणि तो हुकमत गाजवावयाला आला तरी ह्या नर्दीबैलानें ती का म्हणून आपल्यावर गाजवून घ्यावी?"

"पित्राज्ञेपुढें त्याचा नाइलाज झाला."

"त्याच पुत्राचा तो पिता व त्याच पित्याचा तो पुत्र. मी म्हणत होतों कीं वृक्षाची नुसती पिकलेली फांदीच तोडावी लागणार, पण आता वाटतें कीं वृक्षदेखील तोडला पाहिजे."

"म्हणजे?—बाबा! तुमचा विचार तरी काय आहे?"

"खबरदार! इथें प्रश्न माझ्या एका पोरीच्या आयुष्याचा नाहीं, तर लाखाच्या पोरींच्याच्या भवितव्याचा प्रश्न आते. धन्याशीं फितुरी? आणि तो थेरडाही या फितुरींत सामील? असल्या स्वामिद्रोहाच्या पातकाबद्दल त्या हरामखोराना देहान्त प्रायश्चितच मिळालें पाहिजे."

"पण बाबा! तुम्ही त्याना शासन करणार, म्हणजे तुमच्या एकुलत्या एका मुलीला विधवा करणार असेंच नाहीं का?"

"विधवा करणार!—हो! विधवा करणार मी माझ्या मुलीला.

पण ती जर माझी खरी मुलगी—माझ्या रक्तामांसापासून निर्माण झालेली माझी औरस मुलगी असेल, आपल्या आईच्या पातिव्रत्या विषयीं तिला जर जरादेखील शंका नसेल, तर ती असल्या मळमळीत सौभाग्यापेक्षा झळझळीत वैधव्य सहस्र पटींनीं थोर मानील पोरी! नाहीं तरी तू असें पाहा, स्वकर्तव्यापासून च्युत झालेला तुझा नवरा मेल्यातच जमा नाहीं काय? असल्या नादान नवऱ्याच्या नावानें कुंकू लावण्याची तुलादेखील लाज वाटली पाहिजे."

"असली अडवणुकीची व आणाशपथाची भाषा बोलून माझ्या मनाला डागण्या का बरें देता बाबा! त्यापेक्षा असें का नाही करीत? पोटच्या पोरीच्या सौभाग्यावर पाणी सोडण्याइतकें—आपल्या हातानें तिच्या कपाळाचें कुंकू पुसण्याइतके धैर्य जर तुमच्या अंगी आहे, तर त्यापेक्षा कमी धैर्याची एक गोष्ट करून तुम्ही हा प्रश्न कायमचा निकालात का काढीत नाहीं?"

"काय करू म्हणतेस मी?"

"पोटची मुलगी विधवा होऊन सतत डोळ्यासमोर उभी असलेली तुम्हाला आवडेल का? त्यापेक्षा तिला अहेवपणींच परलोकीं पाठवून निष्काळजी का नाहीं होत तुम्ही? सासऱ्याला जावयाची काळजी पोटच्या पोरीसाठींच असते ना? तुमची काळजी अशानें अनायासें दूर होणार नाहीं का?—असे गोरीमोरी चर्या करून माझ्या कडे नका पाहू मी हा त्रागा करत्यें आहें असें तुम्ही मुळीच समजू नका."

"माझ्या गळ्याशपथ तू त्रागा करीत नाहींस?"

"तुमच्या गळ्याशपथ मी त्रागा करीत नाहीं बरें, सौभाग्यासाठीं बोलायचें तर मी तरी कपाळावरच्या एवढ्याशा लाल टिकलीसाठीं धन्याचें, धनिणीचें रक्त, आणि मायभूमीचें स्वातंत्र्य या सगळ्याचा बळी कसा बरें मागू?"

"पोरी! तुझें मन मी ओळखतों तुझ्यासारख्या मुलीचा पिता म्हणवून घेण्यात मलाही मोठा अभिमान वाटतो. महिपतीसारख्या

स्वामिद्रोही समाजकंटकाला शासन करताना मी अप्रत्यक्षपणें माझ्या हातानें माझ्या पोटच्या पोरीचा बळी घेत आहें, याचीही मला जाणीव आहे पण अपत्यसुखापेक्षा कर्तव्यसुख श्रेष्ठ होय मी असेंच म्हणतों कीं मी माझ्या कर्तव्यासाठीं त्रिभुवनातील माझ्या अत्यंत आवडत्या–प्राणापेक्षाही आवडत्या वस्तूचा त्याग का करू नये?"

"अवश्य करावा. म्हणजे मी तुमच्या पुण्यात अंशभागी तरी होईन. त्या त्यागाला खरें महत्त्व प्राप्त व्हावें व तो खरा प्रभावी व्हावा, म्हणून–मी तुम्हाला सांगितलेंच पाहिजे का बाबा? तुमच्या सारख्या धैर्यशाली वीरानें आपल्या हातानें आपल्या कन्येला मोक्षाला पाठवून स्वार्थत्यागाची सीमा करायला कचरावें का?"

लक्ष्मी बाहेर अगदीं चोरट्या अंगानें उभी राहून आतील त्या पितापुत्रींचें संभाषण लक्ष्यपूर्वक ऐकत होती आतील त्या दोन व्यक्ति जरी तिला बाहेरून दिसत नव्हत्या, तरी त्यांच्या उद्गारात त्यांचें त्या वेळचें मूर्तिमंत प्रतिबिम्ब उमटलेलें तिला दिसत होतें. सत्यभामेचे शेवटचे उद्गार ऐकून कुशाबा काहीं क्षण अगदीं स्तब्ध राहिला, व सत्यभामाही काहीं बोलली नाही. त्या दोघांच्याही आयुष्यांतील तो प्रसंग शब्दसृष्टींत न सामावणारा व कर्तव्यपालनानेंच साजरा होणारा असा उगवला होता लक्ष्मीलाही त्याची कल्पना होती. पण कल्पनेचें क्षेत्र प्रत्यक्षतेपेक्षा विस्तृत असूनही कल्पनेंत न सामावणारी घटना तेथें आत तेव्हा घडून आली.

लक्ष्मीनें कुशाबाचे शब्द आत निघालेले बाहेरून ऐकले, "बाळे! तू माझ्या कर्तव्यात कोणत्याही प्रकारचा खो घालशील म्हणून नव्हे, तर अपत्यवत्सलतेच्या भरात माझ्या हातून कर्तव्यपालनांत कसूर होण्याचा बराच संभव आहे म्हणून माझ्या जिव्हाळ्याचा व वंशाचा हा एकुलता एक धागा मला अगोदर तोडून टाकणें प्राप्त आहे."

त्यानंतर "जय भगवान!" एवढा एकच शब्द कुशाबाच्या तोंडून निघालेला लक्ष्मीनें ऐकला, व असिप्रहाराचा लहानसा आवाज तिला त्या शब्दामागोमाग ऐकू आला.

लक्ष्मीचें काळीज भीतीनें धडधड उडूं लागलें. तिला आंतही जाण्याचा धीर होईना, व बाहेरही जाण्याचा धीर होईना. पण यापुढें तेथें थाबून आपला पल्ला येणार नाहीं, त्या प्रळयांत आपल्या जिवावरदेखील सकट येण्याचा सभव आहे, असेंही भय तिला तेव्हा वाटलें. कुशाबाला भेटण्याचें धैर्य या वेळीं तिला होणें शक्यच नव्हतें. पण बाहेर पडावयाचें तरी कसें? कोणाला सशय आला तर!— असा विचार तिच्या मनात तेव्हाच आला एखाद्याला दश करून चपळ-तेनें पण फुत्कार न करता चोरट्या वृत्तीनें निघून जाणाऱ्या सर्पाप्रमाणें कुशाबा बाहेर पडला व आजूबाजूला न पाहता सरळ निघून गेला. तें पाहून लक्ष्मीला नवें भय वाटू लागलें, आता जर कोणी नोकर चाकर आंत आले, आणि किल्लेदारीणबाईची हत्या झाल्याचें त्यांना दिसून आलें, तर ते आपणावर आळ घेतील कीं काय!

लक्ष्मीच्या मनात जी शका आली, ती त्याच क्षणीं अगदीं अक्षरशः खरी झाली. कोणत्या मार्गानें दासी आत गेली नकळे, ती आतील अनर्थ पाहून एकदम ओरडत बाहेर आली हा हा म्हणता नोकर चाकर वगैरे चोहों बाजूनीं धावून येऊ लागले. त्याच्यापासून आपला बचाव करण्यासाठीं लक्ष्मी वाट सापडेल त्या वाटेनें जीव मुठींत घेऊन पळून गेली. तरीदेखील तिला तेथून सुखरूपपणें बचावून जाणें अशक्य होतें. एरव्हींच्या वेळची गोष्ट निराळी. ती जी आत येऊ शकली, ती किल्लेदारीणबाईची मैत्रीण म्हणून. एरव्हीं किल्ल्यातून आत अथवा बाहेर परक्या अशा मुगीलाही रीघ मिळणें अशक्य होतें.

पण प्रसग पडला कीं उपाय सुचतो म्हणतात. प्रसगावधान ही नैसर्गिक देणगी लक्ष्मीला मिळालेली होती चटकन् तिच्या डोक्यांत एक युक्ति सुचली, व त्याच क्षणीं तिनें त्या युक्तीची अमलबजावणीही केली. "बाईसाहेबाचा खून झाला! धावा हो धावा!" अशा आरोळया ठोकीत ती बाहेर धावत जाऊ लागल्यावर तिला कोण प्रति-बध करणार?

तशा आरोळया ठोकीत खुनी माणसाचा आवेशपूर्वक पाठलाग

करण्याच्या मिषानें ती किल्ल्याबाहेर आली खरी, व जणू काय त्याच हेतूनें खाडीच्या किनाऱ्यानें जाऊ लागली. अमळ दूर गेल्यावर आता कोणाची नजर नाहीं अशी खात्री करून घेऊन नतर ती कुणकेश्वरचा रस्ता विचारीत निघाली. देवगडच्या खाडीचें एक कुसू गावात शिरून जेथें सपतें व जेथें लहानमोठ्या नावाचें बदर आज दिसतें तेथें तसें पूर्वीही होतें. त्या बदरावर एका वडाच्या झाडाखालीं ती जाऊन पोहोंचली, तेव्हा एक नाव नुक्तीच येऊन किनाऱ्याला लागली होती. त्या नावेंतील नावाड्याना अनुलक्षून तिनें हाक मारून विचारलें, "कुणकेश्वरला जाण्याचा रस्ता हाच ना?"

"आ?" नावेंतील एका नावाड्यानें वर पाहत प्रश्न केला.

त्या नावाड्याची व लक्ष्मीची नजरभेट झाली मात्र, आणि दोघें एकमेकाकडे पाहून स्तभित झालीं.

"कोण तू? लक्ष्मी ना?–गणोजी मान्याची बहीण? एका नांवाड्यानें विचारलें.

"होय–य–!" लक्ष्मी चांचपटत उत्तरली. तिनें तात्काळ ओळखलें कीं आपणासमोर बोलत उभा असलेला नावाडी हा दुसरातिसरा कोणी नसून ठाण्यांत आपणावरील सकट निवारण करणारा रघुवीर बागवाच होता.

आणि रघुवीरानें-अर्थात् वाचकाना, किंबहुना एकट्या लक्ष्मीखेरीज सर्वांना माहीत असलेल्या श्रीपति गवळ्यानेंही लक्ष्मीला ओळखलें. जितका लक्ष्मीला रघुवीराचा–तो आपला उपकारकर्ता म्हणून–ध्यास लागला होता, तितकाच त्याला ती आपली आवडती व वाग्दत्त प्रियतमा म्हणून ध्यास लागला होता. किंबहुना लक्ष्मीवर उपकार करण्याची व तिचे प्राण वांचविण्याची सधी अचानक त्याला मिळाल्यामुळें तर तो स्वतःच्या श्रमांनीं स्वतःला होणारा पत्नीलाभ होय, या नात्यानें त्याला त्याची अधिक किंमत वाटत होती. प्रश्न फक्त गणूजीच्या हत्येविषयींचा होता. पण आता त्याची भगवानाला–अर्थात् श्रीपतीला तितकीशी पर्वा वाटत नव्हती. त्याला माहीत होतें

कीं सत्य आपल्या बाजूला आहे. आपणाप्रमाणेंच आपली भावी पत्नीही खरी स्वामिभक्त व स्वदेशभक्त आहे असें कळल्यावर तिच्या अप्रसन्नतेची भीति बाळगण्याचे काय कारण? शिवाय दुल्लभजी माने व रुद्राजी धुळप यांची अचानक गांठ पडल्यावर त्यांना जेव्हा त्यानें आपल्या हातून घडलेला प्रमाद सांगितला, तेव्हा त्यांनीही त्याला गणोजीच्या हत्येबद्दल दोषी न ठरविता त्याच्या वतीनें लक्ष्मीचा गैर-समज दूर करण्याचेंही कबूल केलें होतें ते तिघे तेथून जे निघाले, ते प्रथम लक्ष्मीचा मार्ग काढीत बेलापूरच्या बंदरापावेतो गेले तेथें चौकशी करतां लक्ष्मी सुखरूपपणें एका तारवांतून विजयदुर्गाकडे गेल्याचें त्यांना कळलें. तेव्हांच तिचा पाठपुरावा करण्यासाठीं तेही निघावयाचे पण इतक्या उघडपणें त्यांना बेलापुरापासून विजयदुर्गा-पावेतोंचा पल्ला गांठतां येणें शक्य दिसेना त्यांना आतां दुहेरी शत्रूला तोंड द्यावयाचें होतें तुळाजीच्या लोकांचा रुद्राजी व दुल्लभजी यांच्यावर असा आरोप होता कीं ते दोघेही फितूर झाले आणि सुभे-दाराकडे तर त्यांचें नांव अगोदरपासूनच शत्रुपक्षांत नोंदलें गेलें होतें. श्रीपतीनेंही आपली अशीच अवस्था करून घेतली होती. म्हणून ते मुद्दाम आडवळणानें वेषांतर करून विजयदुर्गाकडे चालले होते असें असताही ज्या दिवशीं लक्ष्मी विजयदुर्गाला पोहोंचली त्याच दिवशीं ती मंडळी-ही पोंचण्याचे कारण, लक्ष्मी आपलें खरें स्वरूप लपवून पुरुषी वेषानें प्रवास करीत असल्यानें व ज्या नावेंतून ती विजयदुर्गाकडे यावयाला निघाली होती ती नाव नावाड्याच्या पूर्वयोजनेमुसार मध्ये कोठें कोठें थांबत विजयदुर्गाला जाणारी असल्यानें लक्ष्मीला आपल्या मुक्कामा-वर जाऊन पोहोंचावयाला तितका कालावधि लागणें अपरिहार्य होतें.

तरी पण कालावधीनें का होईना, लक्ष्मी सुखरूपपणें विजयदुर्ग गांठू शकली तें दुल्लभजी, रुद्राजी व श्रीपति यांना मात्र शक्य झालें नाहीं. ते जातां जातां मार्गांत मरखलाचा पक्ष बलवान करण्याची खटपट करीत असतांना धोंडजी शिंद्यानें त्यांना गांठून पकडून विजय-दुर्गाला आणल्यावर त्यांपैकीं दोघांची काय दशा झाली हें वाचकांना

मागें माहीत झालेंच आहे. राहता राहिला एकटा श्रीपति, त्याचा तरी तो पुनर्जन्मच झाला होता. श्रीपतीनें जर प्राणावरचा प्रसग ओळखून अस्सल मराठ्याचा गनिमी कावा उपयोगात आणला नसता, तर जी गत रुद्राजी व दुल्लभजी याची, तीच किंवा त्याहूनही भयकर गत त्याची झाली असती त्याला वास्तविक बदिवान स्थितींतच देवगडीं प ठविण्यात यावयाचें इतकेंच काय पण जाता जाता मार्गात समुद्रातच त्याला नेणारें जहाज बुडवून त्याला परस्पर जलसमाधि देता येईल कीं नाहीं, हा विचारही आनदराव व यज्ञेश्वरशास्त्री याच्या डोक्यात त्या रात्रौ घोळत होता पण पुन्हा त्याची भेट झाली, तोंवर श्रीपतीनें गनिमी काव्याच्या धोरणानें आपली बाजू चागलीच रगवून ठेवली होती सुभेदार बिवलकराच्या बाजूनें सरखेलाशीं लढणाऱ्या जावजी गवळ्याचा श्रीपति हा पुत्र होता, ही एक बाब तर त्याच्या फायद्याची मूळ ासूनच होती. त्या तुटपुंज्या भाडवलावरच श्रीपतीला स्वतःच्या बचावाचा व्यापार करता आला. "आपण मूळपासून आपल्या पित्याप्रमाणेंच पेशव्याच्या अर्थात् सुभेदाराच्याच बाजूचे आहों, सुभेदाराशीं आपलें बोलणें होऊन त्याच्या समतीनेंच आपण सरखेलांच्या गोटात शिरून तेथील तळठाव घेण्याचें ठरविलें होतें, तुम्ही—यज्ञेश्वर शास्त्री, आनदराव वगैरे मडळी योग्य प्रकारें वागत आहा, कीं सरखेलाना फितूर झाला आहा, याचा अचूक अदाज पहाण्यासाठीं आपण मुद्दामच धोंडजी शिंद्याच्या हातीं कैद झालों" वगैरे तोंडदेखल्या शब्दाची साखरपेर करून श्रीपतीनें विजयदुर्गातून आपली सुटका करून घेतली, आणि "असाच देवगडावरील बदोबस्त करण्यासाठीं आपण आता देवगडाला जाणार आहों" असें आणखी वर सागून त्या मडळीची साकसुरत मान्यताही मिळविली. तेव्हा त्याला लक्ष्मीचा वृत्तान्तही कळला होता. एरव्हीं तो देवगडावर आला असता कीं नाही याची वानवाच तुळाजी सरखेल यशवतगडावर राजकीय वाटाघाटींत गुतून पडल्याचें त्याला विजयदुर्गावरच कळलें होतें. पण प्रभावतीला देवगडावर पाठविण्यात आलें आहे हें त्याला कळलें,

तिच्या जीविताला अथवा निदान इभ्रतीला तरी कांहीं तरी धोका आहे असें त्याला वाटलें, व शिवाय त्याची लक्ष्मी—होय, त्याची लक्ष्मी तिकडे गेल्याचें त्याच्या कानीं आले. म्हणून तो देवगडीं गेला.

पण लक्ष्मीला ह्या घटनाशीं काहींच कर्तव्य नव्हतें तिचा श्रीपति गवळी बंदिवान स्थितींत देवगडावर यावयाचा होता, त्याच्यावर तिला सूड घ्यावयाचा होता, व तिनें सूड घेतला नसता तरी त्याची आता सरखेलाच्या बंदिवासातून सुटका होणें तिच्या दृष्टीनें अशक्य होतें. शिवाय तिचा आवडता रघुवीर बागवा—तिचा रक्षणकर्ता व जगात तिला आता ज्याच्याविषयीं स्वतःच्या स्त्रीजन्माला अनुसरून प्रेम—आपुलकी जिव्हाळा वाटत होता, तो तिचा देवानें दिलेला सांगाती तिला अचानक भेटला होता त्या आनंदाच्या भरांत ती श्रीपतीवर सूड घेण्याचें त्या वेळेपुरतें तरी विसरून गेली.

"तू कुठें चालली आहेस?" रघुवीरानें (श्रीपतीनें) विचारलें.

"मी कुणकेश्वरीं चालल्यें आहें प्रभावतीबाईसाहबाकडे." लक्ष्मी उत्तरली.

"मलाही तिकडेच जावयाचें आहे. तू भेटलीस, त्यानें माझें अर्धें काम झालें, आता अवांतर गोष्टी आपण तिकडे जाता जाता बोलू" असें म्हणून रघुवीर वर रस्त्यावर आला, व दोघेंही बोलत बोलत कुणकेश्वरच्या वाटेला लागलीं.



लक्ष्मीनें नावेंतील नावाड्याना हाक मारून विचारलें, "कुणकेश्वराला जाण्याचा रस्ता हाच ना?" (पृ २२१).

## प्रकरण २१ वें

# सुभेदाराचे नवे डावपेंच

आणखी एक दिवसभर तडजोडीविषयीं भवति न भवति झाली. प्रभावतीला सुभानरावाच्या स्वाधीन करण्याच्या प्रश्नावर खुद्द जावजी गवळी, खड्डजी माणकर यांचा सुभेदाराशीं तीव्र मतभेद झाला, आता हे दोन्ही वीर आपला पक्ष सोडून उघड उघड तुळाजीचा पक्ष स्वीकारणार असा रंग दिसू लागल्यामुळें 'अशुभस्य कालहरणम्' या न्यायानें सुभेदारानें आपल्या दोघा साथीदाराचा कैवार घेतल्याचें मिष करून त्या वाटाघाटींचा निष्कर्ष जाहीर केला, "बरें आहे. मला देखील व्यक्तिशः हाच विचार पटतो. कोणाही समजस माणसाला असेंच वाटेल कीं श्रीमंत पेशव्यांनीं पुढें केलेली ही तहाची अट काहींतरीच आहे. तर मग इतका वेळ मीं त्या अटीचा जोरजोरानें पुरस्कार का केला असें आपण सर्वजण विचाराल–"

"नाहीं. सुभेदार! आम्ही काहींच म्हणत नाहीं. आम्ही इतकेंच म्हणतों कीं शेवट गोड तें सर्वच गोड. एवढें श्रेय आपण घ्यावें एवढीच तुम्हाला पुन्हा माझी विनंति आहे." तुळाजी म्हणाला.

"सरखेल! सलोख्याची आवश्यकता तुम्हाला आहे आणि आम्हाला नाही असा तुमचा समज आहे काय? झालें गेलें सर्व विसरून आपण पुढच्या उद्योगाला लागलें पाहिजे. मी आजच्या आज सांडणी स्वार श्रीमंताकडे रवाना करतों, व त्यांना सर्व खुलासा करून—"

रामाजीपंताला तोंडचें वाक्य पुरें करू न देता जावजी गवळी म्हणाला, "असला द्राविडी प्राणायाम इथें काय कामाचा? रोगी मेल्यावर वैद्याला बोलावून आणण्यांत काय फायदा? समजा, आपल्या खलित्याचें उत्तर पेशव्यांकडून येण्यापूर्वीच इंग्रज विजयदुर्गावर चालून

आला तर ? मग आम्हीं कसें करावयाचें ? आम्हीं पाठपुरावा इंग्रजाचा करावयाचा कीं सरखेलाचा ? ”

खड्डूजी माणकरही रागारागानें म्हणाला, “आम्ही स्पष्टच सांगून ठेवतों सुभेदार ! श्रीमंत पेशव्याच्या उत्तरावर आपण विसंबून बसणार असाल, तर दरम्यान् इंग्रजांनीं चाल केल्यास आम्ही आपला पाठपुरावा मुळीच करणार नाहीं. त्र्यंबकस्थासारखे हात जोडून स्वस्थ बसू.”

एवढें त्या मंडळीचें संभाषण होतें आहे, तोंच पेशव्याचा जासूद रायबा तिथें दत्त म्हणून हजर ! रायबाला पाहून रामाजीपंताला मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. त्याला ठाण्यात असतानाच विजयदुर्गावर इंग्रज लौकर चढाई करणार हें माहीत होतें. माहीत नसावयाला काय झालें ! त्यानेंच, श्रीपतीनें त्याची कौपिनेश्वराच्या देवालयांत शोभा केली त्याच दिवशीं संध्याकाळीं दुसरा एक दूत इंग्रजाकडे रवाना करून तांबडतोब विजयदुर्गावर स्वारी करण्याची चिथावणी दिली होती; व इंग्रज अक्षरशः आपल्या सल्ल्याबरहुकूम वागतील अशी त्याची पूर्ण खात्रीही होती. पेशव्याचा सारा भरवसा ज्याच्यावर तो गड्डाच फितूर होऊन हातीं सांपडल्यावर इंग्रज तरी त्याचा शक्यतितका उपयोग करून घ्यावयाला कसे चुकतील ? त्यानंतर पुन्हा, आपल्याच लोकांच्या सहानुभूतीचा ओघ झपाट्यानें सरखेलांकडे वळत आहे असें पाहून, पेशवे व सरखेल यांचा समेट होण्याच्यापूर्वीं विजयदुर्ग घशात टाका असेंही रामाजीपंतानेंच तातडीनें इंग्रजाना कळविलें होतें, व तोंवर आंग्र्याना समेटाच्या नादावर झुलवीत ठेवून बेसावध राखण्याचेंही अभिवचन दिलें होतें.—दिलें होतें नव्हे, भरपूर मोलाला विकलें होतें. हा लाभ पचनीं पडावयाला, व विजयदुर्ग इंग्रजाच्या घशांत पडल्यावर आणखी लाभ व्हावयाला आडकाठी जाणवण्यासारखी अशी पेशव्यांचीच होणार, हें तो जाणून होता. म्हणूनच पेशव्यांनीं आंग्र्याशीं तह करण्याच्या भानगडींत घाईनें पडू नये असें धोरण जें त्यानें मूळपासून आंखलें होतें, त्याच धोरणाला त्यानें यशवंतगडावर येण्यासाठीं निघण्यापूर्वीच नवी पुस्ती जोडली

होती, 'इग्रजाना आपण स्वतत्रपणें आग्न्याशीं तह करणार असा सशय आला आहे, त्यामुळें ते तांतडीनें विजयदुर्गावर हल्ला करण्याच्या विचारात आहेत. आपण इग्रजाना नकळत सरखेलाशीं तहाचें बोलणें सुरू केलें ही आपलीच चूक झाली. आता इग्रज विजयदुर्गावर चालून आल्यास त्याना आपण काहीं थोपवू शकणार नाही. त्याचा आपणावर विश्वास बसणार नाहीं, व पूर्वींचे आपसातील करारमदार पेशव्याच्या चुकीमुळें रद्द झाले असें समजून इग्रज विजयदुर्ग एकट्याच्या घशात टाकण्याचा प्रयत्न करतील. बरें, आपणाला इंग्रजांशी दावेदारी माडता यावयाची नाहीं अर्थात् आता ह्या अडचणींतून बाहेर पडण्याला मार्ग एकच.–इग्रज विजयदुर्गावर चालून येतील तेव्हा पूर्ववत् त्याच्याशीं संगनमत करून विजयदुर्ग जिंकणें, सरखेलाच्या दौलतीच्या कलेवरातील अखेरची धुगधुगी हरण करून निःशत्रु होणें, व इग्रजाशीं गोडीगुलाबीनें वागून विजयदुर्ग आपणासाठीं राखून ठेवणें, हीच ती पुस्ती होय."

ह्या पुस्तीच्या आधारें रामाजीपतानें इकडील परिस्थितीवर प्रकाश पाडणारें, अर्थात् खऱ्या परिस्थितीचा विपर्यास करून श्रीमत पेशव्याना आधारात चाचपटत ठेवणारें आणखी बरेंच महत्त्वाचें भाष्य केलें होतें. विजयदुर्ग म्हणजे साऱ्या कोंकणपट्टीचें नाक. बरें, एकटे पेशवे आपण आग्ऱ्याशीं झगडून विजयदुर्ग जिंकू असें म्हणतील तर तें शक्य नव्हतें. कारण पेशव्याप्रमाणेंच इंग्रजाचाही साऱ्या कोंकणपट्टी-वर–विशेषतः आरमारी सामर्थ्यानें व कौशल्यानें सज्ज अशा आग्ऱ्यावर डोळा होता. पण इतके दिवस त्यांनीं एकट्यानें आंग्ऱ्यांवर उघड उघड चढाई करण्याचें धाडस केलें नाहीं, याचें कारण आग्ऱ्यांच्या वतीनें पेशवे आपणावर चालून आल्यास आपला निभाव कितपत लागेल याची इग्रजांना शंका होती. परतु दोघांचें सगनमत होऊन पहिली टोळधाड सुवर्णदुर्गावर पडली, तेव्हां पेशव्यांच्या म्हणजे मराठ्याच्या सैन्यानें अथवा आरमारानें विशेष हातपाय न हालवितांही इग्रजांना एकट्याच्या बळावर सुवर्णदुर्ग काबीज करतां आला. त्या-

वरून इंग्रजानीं कोंकणपट्टींतील भानगडींपुरतें तरी मराठ्याचें बलाबल ओळखलें होतें. आता, पेशवे व आंग्रे याचा जर समेट झाला असता,—पण पेशव्याना जिथें आंग्रे कोंकणपट्टींत अरेरावी गाजविण्याला जिवत ठेवावयाचेच नव्हते, तिथें समेटाच्या भाषेची काय किंमत?

अशा प्रकारची भूमिका आधींच तयार झालेली होती. तेवढ्यात मुंबईकर इंग्रज तातडीनें विजयदुर्गावर चढाई करणार अशी रामाजी पताची खात्री झाली. त्या पेटत्या होळीवर स्वतःच्या लाभाची पोळी भाजून घेण्याचें त्याचें अगोदरपासून ठरलेलें धोरण अमलात आणण्याचें त्यानें ठरविलें होतें.

त्यामुळेंच पेशव्याकडील जासूद आलेला पाहून रामाजीपताच्या अतःकरणात लवमात्र चलविचल झाली नाहीं. तथापि आपण अगदीं नामानिराळे आहों असें भासविण्यासाठीं त्यानें मानभावीपणानें चर्या गभीर करून रायबाच्या हातचा मोहोरबंद खलिता घेऊन उघडता उघडता, 'आणखी काय नवीन कोलदांडा श्रीमतानीं आमच्या तहाच्या योजनेंत घातला आहे? कोणीतरी विघ्नसतोषी लोक काहींतरी लावालावी करून श्रीमताचे कान भरतात, आणि तें निस्तरता निस्तरता आम्हाला पुरेवाट होते.' असें पुटपुटत खलिता उघडून वाचला.

"पाहा! माझ्या मनात शका आली तीच खरी झाली!" यज्ञेश्वरशास्त्री तो खलिता वाचून होतांच त्याची घडी करून आपल्या अगरख्याच्या खिशात ठेवीत म्हणाला.

"काय झालें?" तुळाजीनें प्रश्न केला.

"आम्हीं एखादी नामी योजना जुळवून आणावी, आणि तिच्यावर यानीं लेखणीच्या फटकाऱ्यासरसें पाणी ओतावें!" यज्ञेश्वरशास्त्री पूर्ववत् चिंताक्रांत वृत्तीचा देखावा करून म्हणाला.

"काय असें आहे तरी काय त्या खलित्यांत?" खडूजी माणकर व जावजी गवळी यांनीं विचारलें.

"तुम्हा दोघाशीं मला काहीं खासगी बोलावयाचें आहे." असें म्हणून यज्ञेश्वरशास्त्री त्या दोघांना घेऊन बाहेर निघून गेला.

मागें तुळाजी एकटाच बुचकळ्यांत पडला, हा प्रकार आहे तरी काय? तशात यज्ञेश्वरशास्त्री माणकर व गवळी याना घेऊन गेला, तो बराच वेळ झाला तरी माघारा फिरेना. तेव्हा तर तुळाजीची शका अधिकच वाढू लागली. त्या मडळीचा बेत त्याला कळेना.

× × ×

दुसऱ्या दिवशीं सकाळीं देखील यज्ञेश्वरशास्त्री, माणकर अथवा गवळी यापैकीं कोणी त्याना भेटावयाला आलें नाहीं. एका कारकुना हातीं त्या तिघाच्या वतीनें यज्ञेश्वरशास्त्र्यानें पाठविलेला निरोप मात्र त्याला मिळाला.

" श्रीमत पेशवेसरकारानीं सरखेलाशीं तूर्त कोणत्याच प्रकारचा तह मुबईकर इग्रजाच्या समतीखेरीज करू नये असें कळविल्यामुळें सुभेदार वगैरे त्रिवर्गाचें असें सागणें आपणाला आहे कीं तूर्त तहाच्या वाटाघाटी फिसकटल्या असें समजावें."

आकाशातून मस्तकावर वीज कडाडली असती तरी तरीदेखील जितका खेद तुळाजीला झाला नसता व हळहळ वाटली नसती, तितकी त्याला तो निरोप ऐकून वाटली. पेशव्यांच्या खलित्याचें त्याला तितकेंसे नवल वाटलें नाहीं. पेशवे बोलणार म्हणजे सुभेदार बोलणार हें त्याला माहीत होतें. त्याला नवल वाटलें तें गवळी व माणकर स्वस्थ कसे बसले याचें. त्या त्रिवर्गाच्या खासगी बैठकींत काय झालें याचा जर तुळाजीला शोध करता आला असता, तर त्याला कळून आलें असतें कीं आपल्याकडून सरखेलाचा हा विश्वासघात होतो आहे असें पुन्हा पुन्हा यज्ञेश्वरशास्त्र्याला बजावून सागण्याला त्या दोघांनीं कमी केलें नाहीं. त्यांनीं यज्ञेश्वरशास्त्र्याला असेंही निक्षून सागितलें कीं सरखेलाच्या वतीनें आपण पेशव्यांपाशीं या अन्यायाची दाद लावून घेणार, आणि इतकेंही करून पेशवे वळले नाहींत, तर आपण त्यांचे कोणी नव्हे व ते आपले कोणी नव्हे; मग आपण उघडपणें सरखेलाच्या निशाणाखालीं उभे राहून आग्र्याच्या दौलतीची इभ्रत राखण्यासाठीं पेशव्याविरुद्ध लढण्यालाही कमी करणार नाहीं.

परतु यज्ञेश्वरशास्त्री त्या दोघांचा विरोध ऐकून मनांत नुसता हसला ! त्याला माहीत होतें कीं हे सरखेलाचे कैवारी पेशव्याच्या दरबारीं जावयाला निघण्यापूर्वीच मुबईकर इग्रज विजयदुर्गावर हल्ला करणार ! तो हल्ला सूर्यास्ताच्यापूर्वी होईल, इतकी बित्तबातमीही त्याला त्याच्या बातमीदारांकडून कळली होती. म्हणूनच त्यानेंही वरकरणीं न्यायी-पणाचा आव आणून गवळी व माणकर याना त्या राजकारणात गुंतवून टाकलें, व तोंवर इग्रजांचा हल्ला थोपविता आला तर पाहतों या मिषानें तो स्वत: तावडतोब जहाजातून निघून गेला. तो कोठें निघून गेला, याचा मात्र कोणालाही पत्ता नव्हता.

आता पुढें काय हा प्रश्न अर्थातच तुळाजीसमोर येऊन उभा राहिला. तो ईर्षेला पडून मारीन किंवा मरेन पण शत्रूसमोर मान नमविणार नाहीं ह्या निर्धारानें विजयदुर्गावर जाण्याची तयारी करतो आहे, तोंवर ती रात्र उजाडली. इतका वेळ तरी तो त्या यशवत गडावर थाबला याचें कारण यापुढें विजयदुर्गाचें रक्षण करावयाचें तें कसें करावयाचें या विषयीं त्याला आपल्या सहकाऱ्याच्या संमतानें पुढील योजना ठरवावयाची होती. शिवाय मानाजी आग्र्याला भेटून त्याचेंही साह्य झालें तर घ्यावयाचें होतें.

परतु तसे कोणीच सहकारी तुळाजीला तेथें गडावर भेटले नाहींत. गवळी व माणकर यानीं तर त्याची भेट देखील घेण्याचें टाळलें. ते त्याची भेट कोणत्या तोंडानें घेतील? पेशव्याचा पक्ष त्याना कितीही अन्यायाचा वाटला, तरी त्यानादेखील 'बळी तो कान पिळी' या नात्याची पेशव्याची दशहत होतीच. समजा, आपण पेशव्याना उघड उघड विरोध केला, आणि उद्या त्याचाच जय झाला, तर आपल्या दौलतीवरून व घरादारावरून पेशवे गाढवाचा नागर फिरविण्याला कमी करणार नाहींत, हें ते दोघेही ओळखून होते.

गवळी व माणकर यांच्याकडून उपराळा होण्याच्या बाबतींत पूर्ण निराशा पदरीं पडल्यावर तुळाजीनें मानाजीकडे जाण्याची तयारी केली, तोंच त्याला त्याच्या बातमीदाराकडून निश्चितपणें कळून आलें

कीं, मानाजी आंग्रे, यज्ञेश्वरशास्त्र्यानें त्याच्याशीं कांहीं खलबत केल्या-मुळें माघारा कुलाब्यावर निघून गेला, व त्याची नूर्त ह्या पेटत्या खाईत उडी घेण्याची इच्छा नाहीं बरोबरच आहे! जी स्थिति गवळी व माणकर याची, तीच मानाजीची! प्रथम स्वार्थ आणि मग परमार्थ!

तशांत आणखी अमळशानें जेव्हां इंग्रजांनीं विजयदुर्ग घेरल्याचें त्याला कळलें, तेव्हां तर त्या मानधन पुरुषाला काय वाटलें असेल याची कल्पनाच करणें बरें! चोहों बाजूंनीं आकाश फाटलेलें पाहून 'आपल्या सर्वस्वाचें हसें झालें' अशा भावनेनें विषादपूर्वक स्वतःशीं तो जो यशवंतगड सोडून एकटाच निघून गेला, त्याचा कोणाला पत्ता नव्हता!

## प्रकरण २२ वें

# तीं दोन शिरकमलें

आता लक्ष्मीला फार वेळ बुचकळयात ठेवणे इष्ट नाहीं असें पाहून श्रीपतीनें तीं दोघें मीठमुंबरी येथील रस्त्यावरच्या देवालयात विश्राती ला बसल्यावेळीं लक्ष्मीला एकवार खरा प्रकार सागण्याचा प्रयत्न केला. पण तें देखील त्यानें स्पष्टपणें सागितले नाहीं, तिच्याशीं लग्न करण्याची इच्छा दर्शवून अप्रत्यक्षपणें तिचें मन अजमावून पाहिलें. तेव्हां लक्ष्मीनें श्रीपतीला—तिच्या रघुवीराला—निक्षून सागितलें कीं श्रीपतीला देवगडावर देहान्त शासन मिळेपावेतों आपणाला लग्न नको, ससार नको, सौख्य नको, काहीं नको.

तेव्हा एकदा श्रीपतीच्या मनात आलें कीं आपली ओळख द्यावी पण लक्ष्मीचा गैरसमज दूर होण्याची वेळ अजून आली नाहीं, आग विझली नाहीं तोंच राख भरून टाकण्याचा प्रयत्न केल्यास हात मात्र भाजावयाचा—लक्ष्मी आवेशाच्या भरात बिथरून त्याच क्षणीं आपणा वर उलटावयाची, असा रग पाहून त्यानें पुन्हा मन आवरलें. तेव्हाच त्यानें मनात ठरविलें कीं, आपण कुणकेश्वरीं गेल्यावर महिपतीच्या व सुभानरावाच्या राक्षसी जबड्यातून प्रभावतीचें रक्षण आपण करू शकलों व सरखेलाच्या ठायींची स्वामिनिष्ठा तिच्या प्रत्ययाला आणून दिली, कीं तिचें मन प्रसन्न होईल.

बोलत बोलत तीं दोघें कुणकेश्वरीं जाऊन पोहोंचलीं. तेव्हा दोघानीं एक विचारानें ठरविलें कीं इतक्या उघड्या वेपानें व उघड उघड सरखेलाचा तपास केल्यानें आपणाविषयीं लोकाना सशय येईल व त्यामुळें उगीच कांट्याचा नायटा होण्याचा सभव,

म्हणून लक्ष्मी श्रीपतीला म्हणाली, "रघुवीर! तुम्ही इथेंच देवळांत थोडा वेळ थांबा. मी गावात हिंडून एकदर तपास करून येत्यें. मी एकटीच गेल्यें म्हणजे मला कोणी ओळखणार नाहीं"

लक्ष्मीचा तो युक्तिवाद श्रीपतीलाही पटला. लक्ष्मीला तपास करून यावयाला सागून तो देवालयाच्या पायऱ्या चढून वर जाऊं लागला. तों देवालयाच्या तटाच्या मोठ्या दरवाजापाशी जातांच त्याला कोणी तरी मोठ्यानें किंचाळल्याचें ऐकू आलें. त्यासरसा क्षणभर तो जागच्या-जागी थबकला. विस्मयाची पहिली लाट अमळ ओसरल्यावर तो जिकडून किंचाळी ऐकू आली होती त्या दिशेनें हलके हलके पावलें टाकीत पण चौफेर दृष्टि सभोंवार फेकीत सावधपणानें जाऊं लागला.

महाद्वारातून आत जाताच श्रीपतीला मुख्य देवालयातून कोणी-तरी बोलत असल्याचा स्पष्ट भास झाला. तो सभामडपाच्या एकेका खांबामागून लपत लपत सभामडपाच्या पायऱ्या चढून वर गेला, व डाव्या बाजूच्या ओट्यावर भिंतीआड लपून उभा राहून आंतील सभाषण ऐकू लागला.

"बोल. माझ्या सागण्याप्रमाणें तूं वागणार कीं नाहीं?"

"तुम्ही जर प्रभावतीबाईसाहेबाशीं विश्वासघात करायला सांगाल, तर मी त्याला कधींच तयार होणार नाहीं."

"तुझ्या बाईसाहेब गेल्या खड्ड्यात. तुझें माझ्यावर प्रेम आहे ना? माझ्याशीं तुला लग्न करावयाचें आहे ना? कीं बाईसाहेबाना माळ घालावयाची आहे?"

"एवढेंच ना? पण मी म्हणत्यें, या संकटाची प्रभावतीबाई-साहेबाना आपण जाणीव दिली तर कुठें बिघडलें? आपणाला भले-पणा मिळेल व त्याचेंही रक्षण होईल."

"नाहीं. इतका हा प्रश्न सोपा नाहीं. आम्हांला प्रभावतीशीं कांहीं कर्तव्य नाहीं, जें काय कर्तव्य आहे तें सरखेलांशीं. आमचा असा तर्क आहे कीं सरखेल यशवतगडावरच्या सर्व वाटाघाटी फिसकटल्या-वर निवाऱ्याची सुरक्षित जागा म्हणून व विसाव्याचें ठिकाण म्हणून

ह्या दोन तीन दिवसांत इथें येतील. त्याना मी पकडून सुभेदाराच्या हवालीं करूं शकलों—"

"हरामखोर! खाल्ल्या घराचे वासे मोजणारा! असल्या बहुतेक नालायकांची भुतावळ सरखेलानीं भोळ्या भावानें आपणासभोंवार जमा केली, म्हणूनच आज त्यांच्यावर असा दारुण प्रसंग ओढवला आहे!" श्रीपति आपल्याशीं म्हणाला.

तोंच त्याला आतून स्त्रीचा आवाज ऐकू आला, "खबरदार! असलें एक अवाक्षरदेखील माझ्याशीं बोलू नका. ह्या तारेला तुम्ही काय समजलां? स्वामिद्रोहाचें पाप जोडण्याइतकी ती हलक्या जात कुळीची नाहीं."

"काय, तू माझ्या जातकुळीला नांवें ठेवतेस? हरामखोर!—"

आणि या शद्बामागोमाग लगेच तारेची किंचाळी बाहेर श्रीपतीला ऐकू आली. त्यासरसा तो आत गेला. तारेचें नशीब शिकंदर, म्हणूनच श्रीपतीला तेव्हां आत जाण्याची बुद्धि झाली. आणखी काहीं क्षण जर त्याला तेथें प्रवेश करण्याला उशीर झाला असता, तर महिपतीनें खास तिचा गळा दाबून प्राण घेतला असता.

श्रीपतीनें आंत एकदम उडी घातलेली पाहून महिपति दचकून मागें वळून पाहतो तों तो श्रीपति! त्याला पाहताच महिपतीच्या अंगांतील बहुतेक धैर्य ओसरलें. श्रीपतीची परंपरा मोठी होती, व महिपति आजकाल सुभेदाराला फितूर झाला असून त्या दृष्टीनें जावजी गवळी व म्हणूनच जावजीचा मुलगा श्रीपति याच्याशीं त्याचा निराळा आपुलकीचा संबंध होता. म्हणून, नाहींपेक्षां त्यानें श्रीपतीवर घाव घालावयाला कमी केलें नसतें.

परंतु महिपतीनें भिऊन श्रीपतीची गय केली तरी श्रीपतीला मात्र त्याची गय करावीशी वाटली नाहीं. लक्ष्मीच्या तोंडून देवगडावर-च्या कारस्थानांची बातमी त्याला देवगडाहून कुणकेश्वरीं येतां येतां मिळाली होती. तेव्हांच त्यानें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें होतें कीं कुणकेश्वरीं गेल्यावर प्रथम जर काहीं करावयाचें, तर तो महिपति,

रगोबा व त्याचे आणखी कोणी साथीदार मिळतील त्यांचा संहार! त्यानें डोळयाचें पातें लवतें न लवतें एवढ्यांत आपल्या कमरपट्टया-तील जबिया खसूकन बाहेर काढून महिपतीच्या छातींत खुपसला.

महिपतिही अगदीं बेसावध होता असें नाहीं. त्यानेंही श्रीपतीवर प्रति वार करण्याला कमी केलें नाहीं. तो वार श्रीपतीला जरी ओझरता चाटून गेला, तरी त्यामुळें त्याला मोठीशी इजा झाली नाहीं. कदाचित् महिपतीनें आणखीही काहीं धडपड करून श्रीपतीला जखमी करण्याचा प्रयत्न केला असता. परतु तेवढ्यात तारेनें त्याचा उजवा हात घट्ट धरला. त्यामुळें त्याचा नाइलाज झाला. श्रीपतीनें तो खालीं पडल्यावर आणखी एक जबियाचा वार त्याच्या छातींत मारून त्याला पूर्ण ठार केलें, व त्याचें प्रेत तगडीला धरून देवालयाच्या दक्षिणे-कडील दरवाजातून बाहेर फरसबदीवर फेंकून दिलें.

"तें प्रेत उचलून समुद्रात फेंकून द्या, नाहींपेक्षां तुमच्यावर भलताच प्रसग कोसळेल ह्या नीचाचा बाप व सासरा दोघेही इथें आसपास कुठें तरी असतील. ते सुभेदाराला फितूर असल्यानें ते तुमच्या जिवावर व तुमच्या रागानें प्रभावतीबाईसाहेबाच्या जिवावर-देखील अकस्मात् भलतेंच एखादें सकट आणायला कमी करणार नाहींत." तारा म्हणाली.

श्रीपतीलाही तें पटलें. पण तो महिपतीचें प्रेत उचलून देवालया-सभोंवारच्या तटावरून खालीं समुद्रात फेकणार, तोंच एका हातात एक रक्तबबाळ मुडकें व दुसऱ्या हातांत रक्तानें माखलेली तरवार अशा आवेशांत कुशाबा धावतच तिथें आला. त्यानें दुरूनच मेघगर्जने-प्रमाणें गर्जून विचारलें, "थाबा. हा अत्याचार कोणीं केला?"

"मी—मीं ह्या देशद्रोही चाडाळाला ठार मारलें." श्रीपति निर्भय वृत्तीनें छाती पुढें काढून कुशाबाच्या समोर येऊन म्हणाला, "कुशाबाबा! मी तुला ओळखतों. श्रीरामचद्राचा हनुमान अथवा श्रीकृष्णाचा उद्धव तसा तू सरखेलांचा कुशाबा आहेस. मी देखील सरखेलाचाच एक निष्ठावत सेवक आहें. मी जावजी गवळ्याचा

मुलगा म्हणून तूं मला ओळखूं नकोस. तुझ्या थोर नांवाला काळिमा आणण्यासारखें कृत्य ह्या तुझ्या मुलानें केलें, म्हणून मी त्याला देहान्त शासन दिलें. नाहींतरी तू आपल्या कालच्या प्रतिज्ञेनुसार हेंच करणार होतास!"

तू आज जगात मोठें सत्कृत्य केलेंस असेंच मी म्हणतों. सरखेलाच्या शत्रूला तुझा बाप सामील आहे, असल्या देशद्रोही बापापोटीं जन्म घेतल्याचें पाप तू अशतः तरी फेडलेंस असेंच मीं म्हणतों. आता एक मात्र ऐक. तू केलेल्या ह्या शिकारीचें शीर तेवढें मीं घेतलें आहे. देवगडातून बाहेर पडताना मीं ह्या दोन सैतानांचीं शिरें प्रभुचरणीं अर्पण करण्याची प्रतिज्ञा केली होती. तिच्या सफलतेचें अर्धे श्रेय--" कुशाबा आपल्या हातातील रगोबाचें मुडकें पुढें करीत म्हणाला, "हें पाहा मीं एकट्यानें मिळविलें आहे." तो पायरीवर निश्चेष्ट पडलेल्या महिपतीचें शीर कापून घेत म्हणाला, "सरखेलाचे दोन वैरी तर तडीला लागलेच. याचीं शिरें मी देवाला अर्पण करतों, आणि मग इतराचा समाचार."

यावर कोणी काहीं बोललें नाहीं. कुशाबानें उन्माद चढल्याप्रमाणें महिपतीचें शीर कापून घेतलें, व तीं दोन्हीं शिरें घेऊन तो थेट देवालयांत गेला. तारा हा अनर्थ प्रभावतीला कळविण्यासाठीं त्याच पावलीं देवालयापासून थोड्या अतरावर असलेल्या तिच्या वास्तव्यस्थानाकडे वळली. ती अगदीं भाबावल्यासारखी झाली होती.

आता तेथें लक्ष्मी व श्रीपति हीं दोघेंच उभीं होतीं. लक्ष्मीनें कुशाबाच्या तोंडून 'श्रीपति' अशी हांक आताच ऐकली होती. त्यावरून तिला सशय वाटू लागला होता, "हाच तो श्रीपति गवळी काय?"

"तुमचें नांव काय?" लक्ष्मीनें पुढें येऊन श्रीपतीला म्हटलें, "तुम्हीं खोटें नांव सागून मला फसवलें."

"लक्ष्मी! मीं तुला फसवलें नाहीं. पण माझें नांव श्रीपति गवळी हेंच आहे." एकदम लक्ष्मीची चर्या लाल लाल होऊ लागलेली

पाहून श्रीपति पुढे म्हणाला, "मींच चुकीनें तुझ्या पित्याचा वध केला आहे. त्या अपराधाबद्दल तू मला देहान्तशासन देणार असशील, तर तें घेण्याला माझी आनंदानें तयारी आहे. मी ती शिक्षा चुकविण्याचा मुळींच प्रयत्न करणार नाहीं. मात्र माझें तुला एवढेंच सागणें आहे कीं,—तुला माहीतच आहे कीं सरखेलाचा त्याप्रमाणेंच तुझ्या धाकट्या बाईसाहेबाचाही जीव धोक्यात आहे. त्याचें रक्षण करण्याच्या कामीं—निदान त्याच्या मार्गातील अडचणी शक्य तितक्या कमी करण्याच्या कामीं माझें तुला साह्य होऊ शकेल. तुला आजवर माझ्याकडून जें दुःख झालें, त्याची माझ्याकडून माझ्या मरणापूर्वी तू तेवढीदेखील भरपाई करून घेणार नाहींस काय?"

श्रीपति इतकें बोलला नसता, तरीदेखील लक्ष्मी थोडीच त्याच्यावर सूड घ्यावयाला उद्युक्त झाली असती! श्रीपतीनें त्या दिवशींदेखील तिच्या मनांतील बहुतेक सारा राग आडपडद्याच्या भाषेनें दूर केलाच होता. अर्थात् ती तरफदारी त्यानें स्वतः श्रीपति म्हणून न करता श्रीपति आपला मित्र या नात्यानें केली होती.

तोंच कुशाबा तीं दोन शिरकमलें देवाला अर्पण करून बाहेर आला, व श्रीपतीला म्हणाला, "श्रीपति! चल आतां. तुझ्यापाशीं माझें थोडें काम आहे. तुला माहीतच असेल, विजयदुर्गावर आज इंग्रजांनीं युद्धाची आग भडकवली असेल, अथवा इतक्यात भडकवितील. मला शत्रुपक्षाचीं हीं सारीं कृष्णकारस्थानें देवगडावर माझ्या मुलीकडून कळून आलीं. देवगड आतां अगदीं उघडा पडला आहे. शत्रूला तिथें घर करावयाला फावेल. जिकडे तिकडे फदफितुरी माजली असल्यानें सरखेलाची दौलत विजयदुर्गाच्या झटापटींतच आज उद्यां गतप्राण होणार अशीं लक्षणें स्पष्ट दिसत आहेत. आपण तरी फाटलेल्या आकाशाला ठिगळ कोठवर लावणार? आपणापाशीं ना पैका ना फौजफाटा. समेट होऊ नये या हेतूनेंच सुभेदारानें एक अत्यत नामुष्कीची अट घातली आहे. प्रभावतीबाईसाहेबाना—ते शब्ददेखील मला मुखावाटे उच्चारवत नाहींत रे! त्यांचें रक्षण व्हावें, त्यांच्या

केसालाही धक्का लागूं नये, यासाठीं आपण काय वाटेल तें झालें तरी देवगडावर शत्रूला थारा देता कामा नये."

"मी येतों. पण धाकट्या बाईसाहेब सध्या कुठें आहेत?" श्रीपतीनें विचारलें.

"त्या तूर्त तरी इथें सुरक्षित आहेत. पण सुभानराव सोडकराला ह्या जगातून नाहींसा केल्याखेरीज बाईसाहेबावरील संकट पूर्ण निवारण झालें असें म्हणता येणार नाहीं तो आपणाला बहुधा देवगडीं भेटेल. अवांतर गोष्टी आपण मग बोलू"

"तर मग तुम्ही जा. मी इथें प्रभावतीबाईसाहेबापाशी राहत्यें. नाहींतरी मला त्याची भेट घ्यायचीच आहे." लक्ष्मी म्हणाली.

"ही कोण?" कुशाबानें एकदम मागें वळून पाहत विचारलें.

"ही गणूजी मान्याची मुलगी लक्ष्मी." श्रीपति किंचित ओशाळून म्हणाला.

कुशाबाचें मन वास्तविक दुःखी होतें. आठ प्रहराच्या अवकाशात लेंकीपरी लेंक व जावयापरी जावयी या दोघानाही मुकलेल्या त्याच्या मनोव्यथेचें वर्णन काय करावें? पण तें काहींदेखील मनावर न घेता कुशाबानें श्रीपतीच्या मुखावाटे लक्ष्मीचें नाव ऐकताच स्मितहास्य केलें. त्याला त्या दोघाचा वाङ्निश्चय झाल्याचें माहीत होतें. तो विनोदी वृत्तीनें म्हणाला, "अस्सें!"

श्रीपतीनेंही तो विषय तेवढ्यातच आवरता घेतला, व लक्ष्मीला वाड्यात जावयाला सागून स्वतः कुशाबाच्या सूचनेप्रमाणें देवगडचा रस्ता सुधारला.

## प्रकरण २३ वे

# विजयदुर्गावर इंग्रजांची झडप

सुभेदार रामाजीपंत बिवलकरानें तहाच्या बोलण्याची बैठक फिसकटून टाकली, ती पुन्हा जोडण्यासाठी थोडीच? तुळाजीनेंही त्याउप्पर तशी आशा केली नव्हती. तो 'सत्तेपुढें शहाणपण कोणाचें चालत नाहीं' असें मनांत म्हणत अत्यंत जड अंतःकरणानें यशवंतगडावरून बाहेर पडला, तो बाहेर यशाच्या आशेनें मात्र मुळींच बाहेर पडला नाहीं. त्याच्या मनांत तेव्हां कोणते भयंकर व उद्वेगजनक विचार घोळत असतील, याचा काय नेम सांगावा? पण निराशेच्या परमावधींतही माणसाची आशेची धडपड सुरूच असते. तुळाजीला वाटत होतें, इतकें सर्व झालें तरी अजून श्रीमंत पेशवे सामोपचाराचें धोरण पत्करून आपणाला पदरांत घेतील.—पण पेशव्यांनीं तेव्हांच्या कोंकणपट्टींतील राजकारणापुरती आपली सदसद्विवेकबुद्धि सुभेदाराला विकली होती. ते कसचे तुळाजीच्या उपयोगी पडतात!

निदान गवळी—माणकर हे आपला कैवार घेऊन भांडतील असें तुळाजीला वाटत होतें. पण त्या दोघांचीही न्यायप्रियता प्रथम स्वार्थ साधून मग परमार्थ साधण्याच्या मासल्याची ठरली. मनाला पटलें म्हणून नाहीं, तर नाइलाज म्हणून पण अखेर त्या दोघांनीं नाहीं नाहीं म्हणतां त्या मोहिमेची—विजयदुर्गावर इंग्रजांनीं हल्ला केला त्या वेळची मांडवशोभा म्हणून का होईना, आपलें सैन्य आंग्र्याविरुद्ध इंग्रजांना साह्य करण्यासाठीं उभें केलेंच. त्यांना माहीत कीं आपण साह्य न केलें तरी इंग्रज किल्ला पाडाव करणारच. मग लुटींत तरी मराठ्यांना आपला हक्क कां सांगतां येऊं नये? त्यांना इंग्रजांशीं मथून आलेल्या सुभेदारानें आश्वासन दिलें कीं इंग्रजांकडून पेशव्यांशीं पूर्वी आंग्र्यां-

चा मोड करण्याबाबत झालेल्या कराराचें उल्लघन होणार नाहीं. आणि त्यावर ते खुळ्यासारखे विसबून बसले !

तेव्हां तुळाजी हा बुडत्या माणसानें काडीचा आधार शोधावा त्याप्रमाणें आजूबाजूच्या गडकोटात तरी आपणाला डोकें टेंकावयाला जागा मिळते का, कोणी ह्या आत्मयज्ञात उडी घालावयाला आपल्या बाजूनें तयार होतो का, हें पाहण्यासाठीं वणवण करू लागला. आपण अगदीच आशा सोडली असा विजयदुर्गावरील यज्ञेश्वरशास्त्री, आनद दराव व सुजनसिंग याचा गैरसमज होऊ नये यास्तव त्यानें एक जासूद पाठवून गडाचा बचाव व कुटुंबाचें सरक्षण करण्याचें कार्य सुजनसिंगादि मडळीवर सोंपविलें इतकेंच.

तोंच इग्रज एक दोन दिवसात विजयदुर्गावर येऊन भिडला देखील, असें कळून येताच—उघड्या डोळ्यानीं मरण येईना, म्हणून तुळाजीनें अखेर मराठ्याकडे धाव घेतली. त्याला काय माहीत कीं तेथें आपली अवस्था सापळ्यात आपल्या पायानीं जाऊन अडकून पडणाऱ्या सिंहासारखी व्हावयाची आहे म्हणून !

इंग्रज जे विजयदुर्गावर चालून आले, ते अगदीं गरुडभरारीनें व सर्व योजना पूर्वीच ठरवून चालून आले त्याच्या पोटातील डाव त्याना माहीत, व काहींसे सुभेदाराला माहीत. इग्रजाचा विजय दुर्गाला वेढा पडला व त्याच्या तोफाचा भडिमार गडावर सुरू झाला. इकडून बाहेरून इग्रजांचा जोर. मराठ्याची बाहेरील फौज सुभेदाराच्या अतस्थ फितुरीमुळें जवळ जवळ हात जोडून स्वस्थ बसली होती, व खुद्द सुभेदाराला नकळत परस्पर इग्रजाना फितूर झालेले यज्ञेश्वरशास्त्री वगैरे तुळाजीच्या विश्वासातील लोक जे गडावर होते, ते आंतून इग्रजांचा जय जेणेंकरून होईल अशाच विश्वासघातकी धोरणानें ढिलाईनें वागण्यासाठीं लांचेच्या मोबदल्यात विकले गेलेले ! त्यामुळें इग्रजांना तितके श्रम करावे लागलेच नाहींत. सुभेदारानें आंग्र्याच्या समूळ उच्छेदासाठीं सुवर्णदुर्गावरील लढ्याच्या वेळेपासून पिकविलेली फितुरी आतां चांगलीच पिकली होती. सुभेदारालाही

नकळत यज्ञेश्वरशास्त्र्यानें तें पीक आणखी जोमाला आणलें होतें. गवळी व माणकर हे लढावयाचे तर इंग्रजांशीं संगनमत करून! कारण पेशव्याचा अधिकार मान्य करून पेशवे व इंग्रज यांच्या मैत्रीच्या तहाची तात त्यांनीं आपल्या हातानें आपल्या मानेला लावून घेतलेली. पण त्यानाही समर गाडण्याची संधी आली नाही. त्याची फार इच्छा कीं गड आपण पाडाव करावा, गडात प्रवेश प्रथम आपला व्हावा, आपले मदतनीस म्हणून इंग्रजानीं लढावें, आणि मराठ्याचा भगवा झेंडा गडावर फडकविण्याचा मान आपणाला मिळावा. पण इंग्रज सेनापति मराठ्याना हात वर करण्याची देखील संधी देईनात!

आणि लढणार कोणाशीं? गडावरून प्रतिकार होईल तरच्या गोष्टी! यज्ञेश्वरशास्त्र्यासारखे वीर गडावर असताना काय बिशाद कीं गडावरील कोणी इंग्रजावर हल्ला करू म्हणेल!

तात्पर्य, इंग्रज जरी मोरे विजयदुर्ग जिंकण्याच्या ईर्षेनें आले, तरी त्यांच्या पोटातलें पाणीही हललें नाहीं. एखाद्या राजेरजवाड्याच्या घरच्या लग्नसमारंभाला पाहुणे यावे व त्याची बरदास्त यजमानाकडून राखली जावी, तशी सर्व व्यवस्था सुभेदाराच्या दक्षतेनें तेथें होती.

तथापि हे जे पाहुणे आले, त्यांना त्यांच्या म्होरक्यानें—प्रेसिडेंट बुर्शियरनें अगोदरच कानमंत्र देऊन ठेविला होता कीं "विजयदुर्ग तुम्ही ताब्यात घ्या. मराठ्यांना त्यात हात शिरकू देऊ नका. तुळाजी आंग्र्याला काय वाटेल तें करून पकडून आणा. तो जर मोकळा राहिला, तर पुन्हा प्रळय करील."

पण तुळाजी आता मराठ्याच्या आश्रयाला येऊन गोगलगाय बनून राहिलाच होता. प्रश्न फक्त मराठ्याना विजयापासून कसें दूर ठेवावयाचें हा होता. तो प्रश्न सोडविण्यासाठीं क्लाइव्हनें जमिनीवरून व वॉटसननें समुद्रांतून गडाला वेढा दिला. तेव्हा कुठें सुभेदार व गवळी—माणकर वगैरेंचे डोळे उघडले. पण करतात काय? फसले!

जसे गडाबाहेरचे फितूर फसले, तसेंच गडावरचेही फितूर फसले. सुजनसिंग वगैरेंची खात्री झाली कीं दौलत आपल्या हातची सर्वस्वी जाणार! 'ना मला ना तुला घाल कुत्र्याला' अशी अवस्था होणार! तेव्हा इंग्रजाचा वेढा उठण्यासाठीं आतून त्याच्यावर तोफाचा भडि सुरू झाला. त्याच्या भडिमाराला इंग्रजाचें सैन्य तितक्याच तत्परतेनें उत्तर देऊं लागलें. तरीदेखील इंग्रजाचा निभाव लागला नसता. विजयदुर्ग म्हणजे अभेद्यातला अभेद्य, व म्हणूनच अजिंक्यातला अजिंक्य!

पण फंदफितुरीला अभेद्य व अजिंक्य काय आहे? यज्ञेश्वरशास्त्री व आनंदराव ह्यांनीं अगोदरच गुप्तपणें इंग्रजापासून भरपूर लांच खावून त्याना सर्व मारगिरीच्या जागा दाखवून दिल्या होत्या. आंग्र्याचें दिग्विजयी आरमार जरी बाहेर समुद्रात होतें व त्याची इंग्रजाना दहशत वाटत होती, तरी त्याचा नायनाट करण्याच्या मारगिऱ्याही अगोदरच फितुराकडून इंग्रजाना माहीत झाल्या होत्या.

मग काय! धडाधड् इंग्रजी तोफाचे गोळे सुटूं लागले. त्यातला एक नेमका गडावरील दारूच्या कोठारावर पडून भडका उडाला. दुसरा एक गोळा नेमका आंग्र्याच्या आरमारातील मधल्याच एका जहाजावर पडून फुटला, व जहाज भडकलें. त्याबरोबर सभोंवारचीं जहाजें पेटूं लागलीं. हा हा म्हणता आंग्र्याचें सारें आरमार अर्ध्या घटकेंत त्या आगीच्या डोम्बात जळून खाक झालें

तरीही तुळाजी—बिचारा भोळा सांब अजून भ्रमातच होता कीं, जरी आपल्या लोकानीं आपल्याला दगा दिला असला, तरी आता त्याचे डोळे उघडले आहेत. यावेळीं आपण जर माघार घेतली, अपमान सहन करून तह करण्याची इच्छा दर्शविली, तर आपला कांहींतरी पत्ता येईल.

तेव्हा तुळाजी खंडूजी माणकराच्या आश्रयाला होता. माणकरही आतां इंग्रजाचा विश्वासघातकी चढेलपणा पाहून पुरतेपणीं पस्तावला होता. गवळ्याचीही तीच गत होती. आपला मुलगा श्रीपति तुळजी-

च्या बाजूला वळल्याची वार्ता नुक्तीच सुभेदाराकडून कळल्यामुळें त्याला थोडा विषाद वाटला होता. पण आता त्याला आपल्या चुकी-बद्दल विषाद वाटू लागला. परतु आता विषाद वाटून उपयोग काय? विजय तर आता दूरच राहिला, तुळाजीची बायको-मुलें गडावर होतीं, त्याचें तरी रक्षण कसें होईल ही काळजी सर्वांना होती. प्रभावतीला महिपतीनें जरी डावपेंचानीं विजयदुर्गातून काढून कुणकेश्वरीं नेलें असलें, तरी तो डावपेंच तुळाजीला काय माहीत? तो मनात समजत होता कीं महिपतीनें आपणाला अगदीं योग्य सल्ला दिला खरा. त्यामुळें त्या मायलेंकराचे तरी रक्षण झालें. शेवटीं खुद्द गवळी, माणकर व सुभेदार यानीं एक विचार करून तुळाजीला विनति केली, "सरखेल! आपण शरण गेल्याचें पाढरें निशाण दाखविल्याखेरीज आपली धडगत नाहीं." सुभेदार उद्गारला.

तुळाजी तें ऐकून हसला. शत्रूला शरण जाणें त्याला मरणापेक्षां ही दुःसह वाटत होतें तो विषादानें म्हणाला, "मरणाहून तापदायक अशी विटबना सोसून मग मीं मरण भोगावें अशी भगवताची इच्छा दिसते! जशी त्याची इच्छा! आज आग्ऱ्याची सारी दौलत व सारी इभ्रत लयाला गेली—ठार मेली. तिला आपणाला आतां स्मशानात पोचवायला हवेंच. अिंग्रज, सुभेदार, गवळी व माणकर हे चार खादेकरी, आणि सरखेल त्या तिरडीपुढें मडकें धरी!"

तुळाजीच्या उद्वेगाच्या कटु बोलाकडे मुद्दाम दुर्लक्ष्य करून सुभेदार म्हणाले, "आल्या प्रसगाला तोंड हें दिलेंच पाहिजे. असें केल्यानें निदान एवढें तरी होईल, आम्हां मराठ्याना आम्ही इग्रजांचे साथीदार म्हणून हक्कानें आत प्रवेश करता येईल. आणि इग्रजांकडून गडावर होणारा अनर्थ थांबविता येईल. मग आपण श्रीमत पेशव्यांच्या अनुमतीनें तह करू.

"तह मग सावकाश करूं मृत्युपत्रानें. तूर्त मी एवढेंच वाइटांतून चागलें मेतों,—आग्ऱ्याचें प्रेत फाडून खाण्याची सधी परक्या इग्रजाना मिळण्यापेक्षां घरच्या मराठ्यांना मिळालेली चांगली!"

तुळाजीनें पाहिलें, सती जावयाला निघाल्यावर अग भाजतें असें म्हणून मागें सरून कसें चालणार? तो शरण जावयाला कबूल झाला. मराठ्याचें सारें सैन्य आत घुसण्यासाठीं सज्ज झालें. आपलें आणि सरखेलाचें सगनमत नाहीं असें भासविण्यासाठीं, तोफेच्या तोंडीं बळी द्यावा त्याप्रमाणें थोडया लोकासह तुळाजीला दुसऱ्या बाजूनें शरण गेल्याचें पाढरें निशाण उभारण्यासाठीं पाठविण्यांत आलें.

आंग्र्याकडून पाढरें निशाण उभें झालें. सरखेल शत्रूला शरण गेले. लढाई थाबली. मराठ्याचें सैन्य 'हरहर महादेव!' अशी गर्जना करीत गडाच्या मुख्य दरवाजाच्या रोखानें धावू लागलें. सुभेदार त्या लढारू तुकडीचा म्होरक्या होता. गवळी–माणकर त्याच्या आगेंमागें होते.

पण इग्रज काहीं मेलेल्या मायेचें दूध प्यालेले नव्हते. आपण साधलेल्या शिकारीवर ताव मारण्याची सधी ते मराठ्याना का म्हणून देतील! मराठे मारे मनात माडे चुरीत होते कीं 'तुम्ही आम्ही एक, कठाळीला मेख' अशा डावपेंचानीं आपण इग्रजांच्या तोंडाला पानें पुसू.

पण—!

आता मराठे गडावर घुसणार, तोंच एक गोरा सेनासारग नागवी तरवार परजीत चवताळून धावत मराठ्याना आडवा गेला व सर्वांना दरडावून म्हणाला, "खबरदार! एक पाऊल तरी पुढें सरकाल तर ह्या तरवारीनें एकेकाचें मुडकें धडावेगळें करीन!"

## प्रकरण २४ वें

# कर्णाजी आला कोठून ?

एकीकडे धरणीकंप तर दुसरीकडे वडवानल! एकीकडे अवर्षण तर दुसरीकडे जगबुडी! असाच प्रकार देवगड–कुणकेश्वर व विजयदुर्ग येथें त्या दिवशीं चालला होता. ज्या दिवशीं विजयदुर्ग पाडाव झाला, त्याच दिवशीं श्रीपति व कुशाबा याचा देवगडावर सुभानराव सोडकराच्या हस्तें खून झाला, व सुभानराव फारा दिवसाचा आपल्या मनातील प्रभावतीविषयींचा अभिलाष पूर्ण करण्यासाठी कुणकेश्वराकडे निघून गेला. वास्तविक तो त्याचा डाव महिपतीच्या संगनमतानें पूर्वीच ठरला होता. सुभानराव काहींसा स्त्रैणतेमुळें व काहींसा आपली आवडती प्रियतमा तुळाजी आंग्र्याच्या आश्रयाला गेल्यामुळें इतका मनातून खवळला होता कीं, तिची प्राप्ति होण्यासाठीं तो काय पाहिजे तें मोल द्यावयाला तयार होता. सुभेदार रामाजीपंत बिवलकरानें त्याचा कैवार घेऊन सरखेलापासून बळजबरीनें त्याची प्रियतमा त्याला मिळवून देण्याचें कबूल केल्यामुळेंच तो त्याला वश झाला होता, व त्याच्या देखरेखीखालीं म्हणून सुभेदाराला साऱ्या कोंकणपट्टींत लाचलुचपतीच्या व धाकदपटशाच्या जोरावर फितुरीचें जाळें पसरणें शक्य झालें होतें. तुळाजी यशवंतगडावर गेला तेव्हा त्याच्या डोळ्यांत धूळ फेंकून प्रभावतीला विजयदुर्गावरून काढून कुणकेश्वरी नेण्याची युक्ति मूळ सुभानरावाची, तिची अमलबजावणी महिपतीच्या हातून झाली इतकेंच. महिपतीनें तरी असली नामुष्कीची गोष्ट सुभानरावासाठीं करण्याचें कारण सुभानरावाच्या वशिल्यानेंच त्याचा सुभेदाराकडे जम बसला होता. तिकडे विजयदुर्गावर इंग्रजाचा हल्ला झाला कीं इकडे सुभानरावानें प्रभावतीला—ती खुषीनें यावयाला तयार झाली तर खुषीनें अथवा बळजबरीनें साम-दाम-दंड

भेद यापैकीं जो उपाय त्या वेळीं योजणें उचित वाटेल तो योजून तेथून न्यावयाचें, आणि त्या कामीं त्याला महिपतीनें मनःपूर्वक मदत करावयाची, असें ठरलें होतें. महिपतीचा बराचसा भरवसा तारेवर होता. पण तो भरवसा फोल ठरला व त्या अघोर कारस्थानाबद्दल खुद्द महिपतीला देहान्त शासन भोगावें लागलें. हें सुभानरावाला तो कुणकेश्वरीं येईतों माहीत नव्हतें ती अधुक कल्पना त्याला देवगड मुक्कामीं कुशाबा व श्रीपति त्याला भेटले तेव्हा आली. मुद्दाम तेवढ्यासाठीं तर सुभानराव देवगडात दबा धरून बसला होता. पण तो त्या दिवशीं सायंकाळीं देवगडावर गेला तेव्हा पायथ्याशींच त्याला महिपतीच्या पत्नीचा तिच्या पित्याच्या हातून खून झाल्याचें कळलें, व महिपतीचाही खून कुणकेश्वरात झाल्याची वार्ता त्याच्या कानीं आली.

महिपतीचा खून झाला सुभानरावाचा हा जणू उजवा हातच कुशाबा व श्रीपति यानीं तोडला! तो अपमान व अत्याचार सुभानराव शातपणें थोडाच सहन करणार? तो जो देवगडीं गेला, तोच पाणी जाळीत! गडावर फितुरी पेरणारा तोच होता त्यामुळें, कुशाबा व श्रीपति यानीं दोन प्रहरीं तेथें आल्यापासून गडावर आपला वचक राखण्याचा कसून प्रयत्न चालविला असताही त्याचें कोणीं ऐकलें नाहीं. कोणी त्याना विरोधही केला नाहीं पण स्वतः सुभानराव तिथें येताच एका क्षणात सर्व पारडें फिरलें कुशाबा व श्रीपति आयतेच त्याच्या हातीं सांपडले, व त्यांना त्यानें त्याच क्षणीं ठार मारलें. अर्थात् आता प्रभावतीचें अपहरण करण्याला त्याला विरोध असा कोणाचाच उरला नाहीं. तो जो तेथून निघाला, तो थेट कुणकेश्वराकडे गेला.

अगदीं थोडक्यात चुकलें. कर्णाजी शिद्याचें जहाज बदरात शिरावयाला, व सुभानजी कुणकेश्वरच्या वाटेला लागावयाला एक गाठ पडली. बाकी, कर्णाजीची व त्याची देवगडावरच गाठ पडली असती, तरी दोघेही हातघाईवर आले असतेच असें नाहीं. कर्णाजीला तो एक सुभेदाराचा विश्वासू सेवक म्हणूनच सुभानराव ओळखीत होता, व कर्णाजी कर्नाळ्याच्या लढाईतच मेला अशी सुभानरावाची ठाम

समजूत असल्यानें त्यानें त्याला सहसा ओळखलेंही नसतें. बरें, कर्णा जीला आपला सरखेलाकडे असलेला ओढा लपवून प्रभावतीचें रक्षण करावयाचें असल्यानें त्यानें देवगडातच सुभानजीशीं भाडण उकरून काढलेंही नसतें कदाचित्.

कर्णाजी गडावर गेला व प्रभावतीचा शोध करू लागला, तों ती तिथें दिसली नाहींच, उलट महिपति ठार, सत्यभामा ठार, कुशाबा ठार, श्रीपति ठार, असल्या रक्तपाताच्या भयकर वार्ता त्याला ऐका-वयाला मिळाल्या, आणि सुभानरावाचें नावही तिथें त्याला प्रथमच ऐकू आलें सुभानराव जरी कर्नाळ्यावर कर्णाजीच्या सर्वस्वी नाशा ला कारण झाला असला, तरी कर्णाजी मात्र त्याला अजून आपला मित्रच मानीत होता. परतु तो मित्र प्रभावतीच्या जिवावर उठला आहे व त्यासाठी तो काय पाहिजे ते अमानुष अत्याचार करीत आहे असें दिसताच कर्णाजीच्याही मनानें घेतलें की ह्या सैताना-वर सूड हा घेतलाच पाहिजे.

पण कर्णाजी कुणकेश्वरीं प्रभावतीचें—आपल्या धन्याच्या प्रियतमेचें रक्षण करण्यासाठीं म्हणून गेला, तिथें त्याला काय दिसून आलें? आणि लक्ष्मी तरी जी कुणकेश्वराच्या देवालयातून प्रभावतीच्या वाड्यात गेली, तिनें तरी तिथें काय पाहिलें?

× × ×

तरीही त्या हाःहाःकाराला न जुमानता सुभानराव रातोरात प्रभा वतीला मेण्यांतून दडवून देवगडीं नेण्याची पूर्वतयारी करण्यासाठीं देवालयासमोर भोई ठरवीत उभा होता त्याच्याबरोबर आणखी चार पाच हत्यारबद शिपायीही होते तो ठराव चालला असता एका बाजूनें कर्णाजी तिथें जाऊन पोहोंचला तो आपल्या आगमनाची खबर सुभानरावाला लागू नये व त्याचे सर्व बेत कळावे यास्तव लोका-च्या गर्दीच्यामागें लपल्यासारखा उभा राहिला. पण सुभानरावाच्या काकदृष्टींतून तो बचावू शकला नाहीं. त्यानें नेमकें त्याला पाहिलें, व विचारलें, "कोण आहे?"

"मी आहें कर्णाजी." कर्णाजी पुढें होऊन उत्तरला.

"कर्णाजी!" सुभानराव एकदम चमकून म्हणाला, "कर्णाजी! तू अद्यापि जिवत आहेस?"

"पाहा तूच पाहा!" कर्णाजी उत्तरला.

"जगात दुसरीकडे कुठें मरायला जागा नाहीं म्हणून इथें आलास काय? तू बऱ्या बोलानें इथून अगोदर निघून जा कसा! माझें ऐक."

"मी ज्या महत्त्वाच्या कार्यासाठीं इथें आलों आहें, तें कार्य सफल होण्याला तू मला साह्य करशील तर तुझे माझ्यावर मोठे उपकार होतील. माझ्यावर फक्त प्रभावतीबाईसाहेबांच्या रक्षणाची जबाबदारी आहे."

"तिच्या रक्षणासाठींच माझी सारी धडपड चालली आहे."

तेवढ्यात एक मनुष्य—तो प्रभावतीच्या एकनिष्ठ सेवकांपैकीं एक होता.—तो हळूच कर्णाजीपाशीं जाऊन त्याच्या कानाशीं लागून उद्गारला, "ह्या सैतानाची प्रभावतीबाईसाहेबांवर पापी दृष्टि आहे. त्यानें आज दोन प्रहरीं इथें आल्यापासून वाड्यात काय काय अनर्थ माडला आहे, तें मला शद्वांनीं वर्णन करता येत नाहीं. गुलामानें वाड्याचा नुसता खाटिकखाना बनविला आहे. याच्यावर विश्वास ठेवू नका.—"

पुढें त्या मनुष्याला बोलावयाला अवसरच मिळाला नाहीं. सुभानरावाच्या हस्तकानीं धन्याचा नेत्रसंकेत पाहताच एकदम त्याच्यावर झडप घातली, व त्याला पकडलें. लगेच सुभानरावानें पुढें येऊन त्याच्या मानेवर तरवारीचा वार केला. मोलमजुरीच्या आशेनें तिथें जे गावकरी गोळा झाले होते, ते तो भयंकर प्रकार पाहून कुठचें काय आणि कुठचें काय भीतीनें गर्भगळित होऊन दूर पळून गेले.

कर्णाजीला त्या प्रकाराचा कांहींच उमज पडेना. पण त्याला सुभानरावाचा मनस्वी राग मात्र आला. त्यानें आपल्या कमरपट्ट्यातील तरवारीला हात घालून सुभानरावाला विचारलें, "याचा अर्थ काय?"

"प्रभावति हा माझा बळी आहे. तिला मी नेणार. जे जे कोणी मला या कामीं अडथळा करतील, त्याना त्याना मरणाचा मार्ग पत्करावा लागेल. हाच याचा अर्थ."

"मरण मी एकदा सोडून सातदा पत्करीन. मरणाची मला पर्वा नाहीं. पण ह्या जिवात जीव असेतों मी माझ्या मालकिणीवर तुझ्या-सारख्या पाप्याची सावलीदेखील पडू देणार नाहीं. त्याना असहाय स्थितींत पाहून तू त्याचा असा घात करू पाहतोस? हरामखोर!"

"मोठा आला मालकिणीचा कैवारी! ज्याला आपली स्वतःची बायकोही राखता आली नाहीं, तो म्हणे मालकिणीचें रक्षण करणार!"

"नीच! हरामखोर! पाजी!" असे कडकड दात ओंठ चावीत सिंहानें हत्तीच्या गडस्थळावर उडी घालावी तशी कर्णाजीनें सुभान-रावावर उडी घातली तो एकटा व सुभानरावाच्या बाजूला आणखी चार हस्तक. त्यामुळें तो तटा चागलाच रगला. तरीही एकट्या कर्णाजीनें लढण्याची पराकाष्ठा केली. त्यानें सुभानरावाचा तर प्रथम बळी घेतलाच. पण त्याखेरीज त्याच्या आणखी दोघा साथीदाराना-ही निजविले बाकीचे दोन जखमी स्थितीत तेथून जीव घेऊन पळाले.।

त्या झटापटींत कर्णाजीच्या सर्वांगावर जरी बऱ्याच जखमा झाल्य होत्या व अगावरचे सर्व कपडे रक्तानें भिजले होते, तरी त्यानें ध्यानीं मनीं देखील न आणता तशाच स्थितींत प्रथम प्रभावतीच्या निवासस्थानाचा मार्ग काढीत तिकडे प्रयाण केलें. त्याच्या दृष्टीसमोर तेव्हा एकच ध्येय होतें —प्रभावतीचें–आपल्या धनिणीचें रक्षण करून तिला सुरक्षितपणें सरखेलापाशी पावती करण्याचें.

परतु तो वाड्यात जाऊन पाहतो तों काय! सर्वत्र उदासीनता! हाःहाःकार! रडारड!

याचा अर्थ काय?—असें आपल्या मनाला विचारीत कर्णाजी किंकर्तव्यमूढ स्थितींत आत जाऊ लागला, तों तारा त्याला भेटली. तीही रडत स्फुदत होती.

"काय झालें?" कर्णाजीनें विचारलें.

"धाकट्या बाईसाहेबाचा खून झाला!" तारा उत्तरली.

"खून झाला? खून कोणीं केला."

"कोणा एका नवख्या स्त्रीनें." असें तारा उत्तरते, तोंच लक्ष्मी केंस पिंजारलेली व अंगावरील वस्त्रही अ ताव्यस्त विखुरलें आहे अशी पुढें आली. तिच्याकडे बोट दाखवून दासी म्हणाली, "ह्याच—ह्याच बाईनें बाईसाहेबाचा घात केला." आणि बोलता बोलता ती दासी लक्ष्मीवर तुटून पडली.

"उगी राहा, वेडी कुठची!" असा तारेचा सौम्य वृत्तीनें प्रतिकार करीत लक्ष्मी कर्णाजीकडे निरखून पाहू लागली. कांहीं क्षणानंतर ओळख पटल्यासारखें करून एकदम विस्मयपूर्वक ती म्हणाली, "कोण, कर्णाजी!" तिनें ताडकन् आपल्या कपाळावर हात मारून घेत म्हटलें, "एकूण दैवानें माझ्याप्रमाणेंच तुमच्यावरदेखील पुरा सूड घेण्याचा विडाच उचललेला दिसतो.—तुम्हीं मला ओळखलीत? ह्या तुमच्या मेहुणीला ओळखलीत?"

"कोण तू—लक्ष्मी?"

"होय. आता माझी तुम्हाला दोन्ही हात जोडून इतकीच प्रार्थना आहे कीं तुम्ही माघारे जा कसे!"

"अगोदर मला सांग, चांडाळणी! धाकट्या बाईसाहेबाचा खून तूच केलास का?"

"होय. मींच केला."

"कां?"

"तें कृपा करून तुम्ही मला विचारू नये आणि मीं तुम्हाला सांगू नये. त्यांना यापुढें जगात जगण्यासारखें काही उरलें नाहीं म्हणून. त्याची इहलोकींच्या यमयातनातून व विटबनेंतून मुक्तता करण्यासाठीं मीं त्याच्याच विनतीवरून त्याना परलोकचा रस्ता मोकळा करून दिला.—"

"नीच! चांडाळीण! हरामखोर! ह्या आगळिकीची भरपाई तुला तुझ्या प्राणाच्या मोबदल्यानें करावी लागेल."

" भरपाई होण्याजोगी असती, तर कर्णाजी ! मी माझ्या अक्काच्या सुखासाठीं एकदा सोडून हजारदा माझे प्राण तिच्यावरून ओंवाळून टाकले असते.—" पुढें लक्ष्मीच्यानें बोलवेना.

" पण या वेळी हिनें आपल्या अक्काची आठवण का काढली?" तशा त्या खवळलेल्या मनोवृत्तींत व शारीरिक वेदनांच्या कहरातदेखील स्वतःच्या प्रिय पत्नीची आठवण त्याला मिणमिणता दिवा विझवून टाकणाऱ्या वाऱ्याच्या मद झुळकेसारखी वाटली. त्याचा पहिला आवेश अमळ ओसरला. तो लक्ष्मीला ठार मारावयाला उठला होता, तो जरा शात झाला.

तोंच आतून एक क्षीण कापरी हाक त्याला ऐकू आली, " लक्ष्मी !"

" अक्का !" अशी हाक मारीत लक्ष्मी धावतच आत गेली.

" अक्का ?" असा स्वतःला प्रश्न करीत कर्णाजीही लक्ष्मीमागोमाग हळू हळू पावलें टाकीत जाऊ लागला.

" काय अक्का ?" आसन्नमरण प्रभावती तळमळत पडली होती, छातींतून रक्त भळभळा वाहतच होतें, तशा स्थितींत तिच्या जवळ जाऊन लक्ष्मीनें विचारलें.

" मी तर आता जात्येंच. पण माझें एक मागणें तू पुरविलेंस—मरणाचा मार्ग दाखविलास, तसें अखेरचें एक मागणें तुझ्यापाशीं मागत्यें आहें. माझी खरी ओळख जर कुणाला देशील, तर तुला माझ्या गळयाची शपथ आहे उगाच सासर-माहेरचीं बेचाळीस कुळें कशाला नरकांत लोटू मी ?" एवढें बोलून तिनें राम म्हटला. तिनें कांहीं कर्णाजीला पाहिलें नाहीं, तो कर्नाळयाच्या वेढ्यांत जायां झाला अशीच तिची कल्पना होती. तोच कर्णाजी समोर उभा असलेला जर तिला दिसला असता, तर मरत्या क्षणाला जें सुख लाभतें तेंदेखील तिला लाभलें नसतें. कर्णाजीनें मात्र तिला पाहिलें, व ओळखलेंही. तेव्हा त्याला थोड्या वेळापूर्वींच्या सुभानरावाच्या भाषणातील खांचाखोंचा कळल्या, व लक्ष्मीनें आढेवेढे घेतले त्याचा अर्थ कळला.

तो धक्का त्याच्या अतःकरणाला साहवला नाहीं. आधींच शरिरा-

वरील ताज्या जखमानीं त्याच्या शरिराची चाळण करून त्याला अगदीं हैराण करून सोडलें होतें, त्या जखमेवर हें मिठाचें पाणी! त्याचें त्यालाच वारवार हसू येऊ लागलें. स्वतःची धर्मपत्नी धन्याची रखेली झालेली पाहण्याचें व तिला धन्याच्या शयनमदिरात सुरक्षित राखण्यासाठीं स्वतःचें रक्त साडण्याचें आपणाला कोणत्या पूर्वसचितामुळें सुचलें हेंच त्याला कळेना. अग्नीनें सर्व जाळून टाकल्यावर त्याचें थड राखेंत रूपातर व्हावें. याप्रमाणें आपल्या सर्वस्वाची धाताहात झाल्याबद्दल विकट हास्यपूर्वक स्वतःचाच उपहास करता करता त्यानें जें ग्लानीच्या भरात जमिनीवर अग टाकलें तेंच अखेरचें.

राहता राहिल्या तारा व लक्ष्मी. पण एवढा प्रळय झाला, त्यात त्या दोन कस्पटाची कोण पर्वा करतें! गेल्या असतील कुठें तरी, नाही तर झालें असेल त्याचें काहीं तरी भूकपाच्या आघातात देऊळ कोसळून पडल्यावर व देवमूर्ति भग पावल्यावर त्या देवळाच्या तुटक्या फुटक्या पायऱ्याना कोण विचारतो! कोणी त्याचा नव्या देवळाला तरी उपयोग करील, कोणी घराला उपयोग करील तर कोणी वाटेला उपयोग करील.—जाऊद्या तें! सोन्यासारखा देह वाया गेल्यावर त्याच्यावरच्या चिरगुटाची कसली किंमत?

× × ×

यःकश्चित एक गोरा शिपाई कॅप्टन फोर्बस् नागवी तरवार उगारून मराठ्याना किल्ल्यात घुसतांना प्रतिकार करण्यासाठीं उभा राहिला. पण तो सर्व मराठ्याना दहशत घालण्याला पुरून उरला. त्याला लोटून आत प्रवेश करण्याची मराठ्याची छाती झाली नाहीं.

त्यावेळीं जर मराठ्याना चीड आली असती कीं "मराठी साम्राज्य आमचें, सरखेल आमचे, विजयदुर्ग आमचा आम्हाला आत जाण्याला प्रतिबध करणारा हा पाढऱ्या पायाचा फोर्बस् कोण?" आणि त्या गोऱ्या शिपायाला हातानें अथवा तरवारीनें दूर लोटून आंत जाण्याचें मराठ्यानीं मनात आणलें असतें, तर त्या चिलटाला चिरडून पुढें जाणें त्याना काय अशक्य होतें? असें असताना मराठ्यापैकीं कोणाला

तसें करण्याचा धीर झाला नाही. याचें कारण त्याचें मन त्याना तेव्हा सागत असलें पाहिजे कीं, "आम्हीं आंग्र्याना परके मानलें आणि त्याना रसातळाला नेण्यासाठीं इंग्रजाशीं मैत्री केली. तेही लुटारू लूट करणार व आपणही लूट करणार. मग लूट त्यानीं स्वपराक्रमावर मिळविली, ती ते आपल्या हातीं कशी लागू देतील?"

आणि परिणामही तसाच झाला. ज्याच्या हातीं ससा तो पारधी ठरला. मराठ्याना तरी किल्ल्यात लूटमार करण्यासाठींच जावयाचें होतें. पण इंग्रजानीं त्याना तसें करू दिलें नाहीं. त्यानीं स्वतः किल्ल्यात शिरून तेथील सपत्ति लुटली, आणखी काय काय अत्याचार करावयाचे ते केले, आणि किल्ल्यावर आपला अमल बसविला.

"तहाचें काय झालें?" असें गवळी व माणकर सुभेदाराला विचारू लागले. पण आधीच लांचेचा अपार पैसा चघळता चघळता सुभेदाराचें तोंड जड झालें होतें, त्यामुळें त्या तोंडानें उत्तर निघेना. त्याला इंग्रजाचें हें कृत्य विश्वासघातकीपणाचें वाटलें खरें. पण मागाहून वाटून उपयोग काय?

त्यातल्या त्यात मराठ्यानीं एकच केलें, तुळाजी सरखेलाला इंग्रज आपल्या ताब्यात मागत असताना त्यानीं त्याला त्याच्या ताब्यात दिलें नाहीं. मराठ्याना सशय आला असेल कीं, "तुळाजी आणि इंग्रज पुन्हा एक होऊन आम्हा मराठ्याचीं हाडें घुसळणार नाहींत कशावरून? त्यापेक्षा तो आमच्याच कैदेंत मरेतों कुजत पडलेला बरा!"

या बाबतींत त्या वेळीं लढ्यात प्रत्यक्ष हजर असलेल्या कमांडर होपच्या दैनंदिनींतील मजकूर बराच उद्बोधक आहे. "..ता. १५ रोजीं रामाजीपत वॅाटसनच्या भेटीस आला. इंग्रजाच्या निशाणाबरोबर पेशव्याचेंही निशाण किल्ल्यावर लागावें आणि आपली फौज आत घ्यावी अशी मागणी रामाजीपतानें केली. निशाण लावण्याची गोष्ट आम्हीं कबूल केली. परतु तुम्हीं लढाईत यत्किंचित् मदत केली नाहीं, आणि तुळाजीशीं सधान ठेवून झालेला करार मोडला, सबब तुमची फौज आम्ही किल्ल्यांत घेत नाहीं, असा जबाब आम्हीं रामाजी-

पतास दिला. रामाजीपतानें हरतऱ्हा केल्या. लाचही देऊ केला. पेशव्यांच्या फौजेवर खड्ूजी माणकर हा मुख्य सरदार होता. त्याच्या स्वाधीन तुळाजी आंग्रे झाला. इंग्रजानीं तुळाजीस ताब्यात घेण्याविषयीं हरतऱ्हा केल्या. पण त्याचा बेत सिद्धीस गेला नाहीं. इंग्रजानीं किल्ल्यात दररोज उकराउकरी केली, त्यात पुष्कळ धनसचय त्यास सापडला. तें धन त्यानीं अधिकारी लोकास वाटून दिलें. . ”

विजयदुर्ग पुन्हा इंग्रजाकडून पूर्वकरारानुसार मिळविण्यासाठीं पेशव्याना कशा दीर्घकाळ नाकदुऱ्या काढाव्या लागल्या, साम दाम-दड भेदादि सर्व उपाय कसे योजावे लागले, हें विवेचन अर्थातच ह्या कथानकाच्या कक्षेबाहेरचें होय.

परतु तुळाजी मात्र जो एकदा मराठ्याचा कैदी झाला, तो पुढें जन्मभर त्याचा कैदीच राहिला गडावरील त्याच्या बायकामुलांना स्व-सरक्षणासाठीं असहाय स्थितींत गोऱ्या लोकाचे पाय धरावे लागले.

याप्रमाणें आंग्र्याच्या पूर्वापार वैभवाची चिता धडधड पेटू लागली. पण तें कोणाच्या ध्यानीं येतें? पेशव्याना तो आपल्या वैभवश्रीचा वाढता विलास आहे असें वाटलें. त्या चितेचा प्रकाश हें **पेशवाईचे दिव्य तेज** आहे, पेशव्याचा वैभवसूर्य आता वाढत्या निष्कलक तेजानें तळपू लागला आहे अशी पेशव्याची समजूत झाली.

त्याचा परिणाम?

× × ×

ती इतिहासाची भयाण साक्ष आपणाला पुढें क्रमानें ऐकावयाला मिळणारच आहे.

**समाप्त**

## या कथानकाचीं ऐतिहासिक पाळेंमुळें

पेशवे व आग्रे याच्यातील कटकट, व आग्र्याच्या घरातील भाऊबदकी ह्या भानगडी बाळाजी विश्वनाथ पेशवे याच्या वेळेपासूनच्या होत्या त्या थोरले बाजीराव पेशवे याच्या कारकीर्दीत अधिक तीव्र होऊ लागल्या रामाजीपत बिवलकर हा महाकारस्थानी पुरुष या वेळेपासूनच पेशव्याचा कोकणप्रातातील सुभेदार होता, व आग्र्याच्या भानगडीत त्याचा प्रमुख हात होता 'पेशवाईतील पश्चिम दिग्विजय' ह्या कादबरीत वर्णन केलेला प्रसग हा पेशवे–आग्रे याच्या भानगडीचा पूर्वरग, व प्रस्तुतची कादबरी हा उत्तररग शोभतो

प्रस्तुत कथानकातील लहानमोठ्या व्यक्तीच्या हालचालीचा व ऐतिहासिक घडामोडीचा पडताळा पाहावयाच्या कामी पुढील मार्गदर्शन उपयोगी पडेल

---

## पेशवे दप्तर भाग २४ मधील पत्रांतील निवडक मुद्दे

**पत्र न १६ व १७** पनवेलजवळील किल्ले माणिकगड एथील फितुरी

**पत्र नं. १८:** रामाजी महादेव बिवलकर याचे माणिकगड जिकून घेण्याविषयी सल्ला, व गड घेतल्याचे वृत्त

**पत्र नं ६०** धोडजी शिदे कर्नाळा एथील वेढयाचा व माणिकगड जिकून घेतल्याचा वृत्तान्त कथन करतो

**पत्र नं ७७** पेशव्याचा तुळाजी आग्र्याला साह्य न करण्याविषयी हुकूम.

**पत्र नं ८०.** मानाजी आग्रे व पेशवे याच्यात थळ एथील चकमक.

**पत्र न ९५.** बिवलकराने इग्रजाची मदत घेऊन आग्र्यावर हल्ला केल्याचे वृत्त

**पत्र नं. १११:** आग्र्याचा एक प्रमुख सरदार रुद्राजी धुळप याचा खारेपाटण एथे पराजय व कैद

**पत्र नं ११९:** आग्र्याविरुद्ध चढाई करण्यात ढिलाई चालविल्याबद्दल बिवलकराची माणकराला तबी.

**पत्र नं १२२ :** तुळाजी आंग्र्याचे रत्नागिरी व विजयदुर्ग याखेरीज बाकीचे गडकोट जिकल्याबद्दलचे व विजयदुर्गावर इग्रजी आरमार पाठविण्याची व्यवस्था केल्याबद्दलचे पत्र

**पत्र नं. १४२** रुद्राजी धुळप व त्याचा मेहुणा दुल्लभजी माने याना पकडल्याबद्दल जावजी गवळी याचे खारेपाटणहून पेशव्याना पत्र

**पत्र न ·४५** तुळाजी आग्रे याला पेशव्याचा हुकूम ( सुभानजी सोडकर हुजरातीचा नोकर याची कुणबीण पळोन तळच्याचे पेठेत गेली आहे तिचा धाक लाविला असे तरी येविसी पत्र द्यावे की ज्याची कुणबीण त्याचे स्वाधीन करणे )

**पत्र नं १५२,'५३ :** म्हालोजी गवळी हा आनदराव बर्गे यासह तुळाजी आंग्र्याला राजापुरात आणण्याविषयी व पेशवे आणि आग्रे याची भेट करून देण्याविषयी खटपट करतो

**पत्र न. १'५६ :** तुळाजी आंग्र्याशी चालू असलेले तहाचे बोलणे टाकून एकदम विजयदुर्गावर हल्ला करण्याविषयी नानासाहेब पेशव्याचे जावजी गवळ्याला पत्र

**पत्र नं १५९** विजयदुर्गचा पाडाव व तुळाजी आंग्र्याला कैद करण्याची बिवलकराची तयारी

**पत्र नं १६१ .** आपण इग्रजाकडून विजयदुर्ग मिळविण्याची खटपट मोठ्या युक्तीने करीत आहो, व त्याच्यापासून बराच लाभ करून घ्यावयाचा असल्याने त्याच्याशी बेबनाव आणता कामा नये, अशा आशयाचे बिवलकराचे पेशव्याला पत्र

**पत्र नं. १६४ ·** विजयदुर्गावर इग्रजाचा हल्ला व मराठा सेनापतीची विजयदुर्ग मिळविण्याची खटपट.

**पत्र नं. १७३ :** विजयदुर्ग इग्रजाकडून मिळविण्याची मराठ्याची खटपट, व इग्रजानी मराठ्याच्या तोडाला पाने पुसली

**पत्र नं. २१५ :** विजयदुर्गाच्या बाबतीत इग्रज सेनापतीची उद्दामपणाची वागणूक व विजयदुर्ग परत देण्यास इग्रजाची नाकबुली.

---